# नागरिकनीति

लेखक

श्रीकृष्ण वेंकटेश पुणतांबेकर, एम्. ए. (आक्सफोर्ड), बार-ॲट-लॉ
इतिहास, राज्यशास्त्र व नागरिकशास्त्राचे अध्यापक;
हिंदु विश्वविद्यालय, बनारस.

नवभारत ग्रंथमाला कार्यालय
इ. स. १९३४) नागपूर (शके १८५६

जें खळांची वांकुडै मोडे ।
  तेयां सत्संगीं रति वाढे ॥
भूतां परस्परें पडे ।
  मैत्र जीवाचें ॥

दुरिताचें तिमिर जाओ ।
  विश्वा स्वधर्मसूर्यो पाहो ॥
वांछिल तें तें लाहो ।
  प्राणिजात ॥

**ज्ञानेश्वर**

सकळ लोक सुखावे ।
  तो कसा काळ पावे ॥

**रामदास**

# अनुक्रमणिका

## ह्या ग्रंथातील गृहीत कल्पना

१. आस्तिक्यबुद्धि.

२. ऐहिक दृष्टि

३. प्रगतिमान्यता

४. संघटनेची व नियंत्रणाची आवश्यकता

५. मनुष्याची समाजशीलता व सेवाभाव

६. मनुष्याची स्वातंत्र्येच्छा व समतेच्छा

७. परंपरा व परिस्थिति यांचें महत्त्व

८. ध्येयशीलता

९. न्यायशीलता

१०. मनुष्याचे स्वार्थभाव, परार्थभाव व परमार्थभाव

११. स्वदेशप्रेम

१२. मानवजातीची एकात्मता

१३. प्रयत्नवाद

१४. नीतीची आवश्यकता

# प्रस्तावना

आपल्या भोवतालचें जग आज झपाट्याने पालटत आहे. त्याचप्रमाणें आपलें मन हें आज हळूहळू बदलत आहे. नवी परिस्थिति व जुन्या परंपरा, नवी नीति व जुन्या रीति यांच्या संयोगाने अथवा कलहाने उत्पन्न झालेल्या नव्या कल्पना व नवे मेळ यांचा संचार आपणांस चोहीकडे झालेला दिसतो. या कालामध्यें गतानुगतिकांची फारच त्रेधा उडत आहे. परंपराप्रियांना कसेंनसेंच वाटत आहे. रूढिभक्तांना बदल व प्रगति नको आहे. ध्येयवाद्यांना सर्वच एकदम पाहिजे. मध्यम वृत्तीचे लोक संकोच व संशय ह्यामुळें कर्तव्यमूढ झाले आहेत. स्वार्थीजन तर जिकडे फायदा तिकडे कायदा असें आचरणानें दाखवीत आहेत.

ह्या नव्या कालांतील प्रवर्तक गोष्टी व कल्पना पाश्चात्य लोकांनी आणल्या. त्यांमध्यें मुख्यतः व्यक्तिस्वातंत्र्य, राष्ट्रीयता व लोकसत्ता ह्या प्रथम आल्या व नंतर व्यक्तिसमता, समाजसत्ता व मानवी हित ह्या आल्या. त्यायोगें देशांतील प्रत्येक व्यक्तीला स्वातंत्र्य, समता व सुख आणि जगांतील प्रत्येक राष्ट्राला सत्ता, स्वातंत्र्य व सामर्थ्य हीं प्राप्त होण्याला साहाय्य झालें. याच कल्पनांचें आज प्राबल्य आहे. त्यामुळें आज समाजांतील उच्च व नीच, धनवान व धनरहित, शिक्षित व अशिक्षित, अग्रज व अंत्यज ह्या कल्पनांचें स्तोम कमी होऊन त्या ठिकाणीं प्रयेक मनुष्याच्या श्रमाचें, सुखसोयीचें व निर्वाहाचें प्रमाण त्याच्या शरीराच्या व मनाच्या शक्तीनुसार व आवश्यकतेनुसार ठरविलें जात आहे. त्याच्या बालपणांतील सर्व आवश्यक गोष्टी—अन्नवस्त्र, औषधपाणी, व्यायाम, शिक्षण इत्यादि—समाजाकडून पुरविल्या जात आहेत. त्याचप्रमाणें त्याच्या गृहस्थाश्रमांतील उदरनिर्वाहाचीं सर्व साधनें, त्याचे राजकीय अधिकार व कर्तव्यें, आणि त्याच्या वृद्धावस्थेची व आरोग्याची तरतूद, ह्यांचीही पूर्णपणें व्यवस्था करण्याची कल्पना रूढ होत आहे. पाश्चात्यांच्या ह्या नव्या कल्पना व तदनुरूप घटना ह्यांच्यामुळें आपल्या पूर्वीच्या कौटुंबिक, जातीय, आर्थिक, राजकीय व धार्मिक संस्था व समजुती हळूहळू नाश पावत आहेत.

अशा या नव्या मनूंत सामान्य मनुष्यापुढे योग्य वर्तन कोणतें व योग्य व्यवहार कोणता याबद्दलचे प्रश्न साहजिकपणें उभे रहातात हे प्रश्न सोडविणें सामान्य मनुष्याला जड जातें. तेव्हा त्यांचें सांगोपांग विवेचन झालें पाहिजे. खरें पाहिलें असतां प्रत्येक मनुष्यापुढे उत्तम वर्तन व उत्तम व्यवहार कसा असावा हा नित्याचा प्रश्न आहे. तेव्हा सामान्य मनुष्याच्या सर्वसाधारण जीवनाला मार्गदर्शक होणारें शास्त्र पाहिजे. ह्यालाच आपण लोकनीतिशास्त्र अथवा नागरिकनीतिशास्त्र असें संबोधूं या. त्याच्या योग्य अभ्यासाने व तदनुसार आचरणाने प्रत्येक नागरिकाचें जीवन उत्तम व सुखकर झालें पाहिजे.

नागरिकनीति ही सामान्य मनुष्याचें स्वास्थ्य व हित साधण्याकरितां व त्याचे समाजांतील अधिकार आणि कर्तव्यें यांचें पूर्णपणें आकलन करून घेण्याकरतां प्रवृत्त झाली आहे. तिच्यामध्यें मनुष्याच्या विशेष पदाचा, प्राप्तीचा अथवा प्राप्तव्याचा, त्याच्या विशेष अंगांचा, कलाकौशल्याचा अथवा संस्कृतीचा, त्याच्या अंतिम कार्यक्षमतेचा, सामर्थ्याचा अथवा गुणांचा विचार केला जात नाही. तर त्याच्या सामान्य व्यावहारिक जीवनामध्यें दिसून येणारे सामाजिक गुण व त्या जीवनास साहाय्य करणाऱ्या संस्था यांचें स्वरूप निश्चित करून त्यांची आवश्यकता, त्यांचे प्रकार व उपयोग ह्यांचें विवेचन त्यामध्यें केलें जातें. ह्या विवेचनामध्यें विशेष प्रकारचे अधिकारी, गुणी, ज्ञानी अथवा व्यवसायी अशा मनुष्यांचें कार्य, अधिकार व कर्तव्यें यांचा विचार केला जात नाही. तर प्रत्येक मनुष्याचें सामान्य जीवन सुखी, सुसंस्कृत व कार्यक्षम होण्याला लागणाऱ्या गोष्टींचा त्यामध्यें विचार करावा लागतो. त्यायोगें सामान्य मनुष्याचें जीवन सुखकर व परोपकारी होण्याला मदत होते. समाजांतील विशेष गुणांचे, अधिकारांचे व व्यवसायांचे लोक सोडून दिले तर, बाकीचा बहुजनसमाज कोणत्या प्रकारें नांदावा, त्याचे अधिकार व त्याचीं कर्तव्यें काय असावीं, त्याला समाजसत्तेंत व समाजनियंत्रणांत कोणतें स्थान मिळावें, व समाजकृत स्वातंत्र्यांत त्याचा किती भाग असावा, ह्या गोष्टींचें विवेचन व व्यवस्थित मांडणूक आजच्या लोकसत्तायुगाच्या काळांत फार आवश्यक आहे. कारण लोकसत्तेचा उपयोग मनुष्याच्या सुखाच्या व उन्नतीच्या

दृष्टीनें व्हावयाचा असल्यास सामान्य मनुष्य हा लोकसमुदायाचें सार्वजनिक हित राखण्याची जबाबदारी घेण्याइतपत नीतिदृष्ट्या व ज्ञानदृष्ट्या उन्नत व अधिकारी झाला पाहिजे. लोकसत्तावादी हे प्रत्येक सामान्य मनुष्याला समाजाच्या सर्व व्यवहारांत व कारभारांत स्थान असावें हें योग्य समजतात. त्याला ते त्या कामाला असमर्थ अथवा अपुरा समजत नाहीत. उलट त्याला त्यांमध्यें वाटा दिल्याने तो अनुभवानें व जबाबदारीनें अधिक उत्साही, कार्यक्षम व समाजशील होतो, असें त्यांचें मत आहे.

सामान्य मनुष्य हा मुख्यत: गृहस्थवृत्तीचा असून तो व्यवसायी व सामुदायिक जीवनामध्यें वावरणारा असतो. तो समाज सोडणारा साधु अथवा संन्यासी नसतो. प्रत्येक देशांत अशाच लोकांची मोठी संख्या असते. तेव्हा ह्या बहुजनसमाजाच्या हिताच्या व लोकयात्रेच्या दृष्टीने आपणास सर्व प्रश्नांचा विचार करावयाचा आहे.

सध्याच्या अधिक गुंतागुंतीच्या व्यवहारामध्यें व संघटनेमध्यें सामान्य मनुष्याच्या जीवनाचे प्रश्न बिकट झाले आहेत. ते योग्य प्रकारें सोडविले नाहीत तर देशामध्यें अधिक दु:ख व दारिद्र्य, अस्वस्थता व असमाधान वाढेल. तेव्हा ते योग्यप्रकारें सहकारितेने व सलोख्याने सोडविण्यास सामान्य मनुष्याला व जनतेला कांही समाजनीतीचे, समाजमानसशास्त्राचे, सामाजिक समजुतींचे व संस्थांचे आणि समाजाच्या आवश्यकतांचे व शीलतेचे धडे दिले पाहिजेत. त्यायोगें त्याला समाजहिताकरितां समाजाचा एक पालक, घटक अथवा सेवक या नात्याने कसें वर्तावें हें समजेल. म्हणजेच सामान्य मनुष्याच्या बुद्धिमत्तेच्या, नीतिमत्तेच्या व समाजशीलतेच्या आधारावर रचलेली आधुनिक सामाजिक व्यवस्था व कारभार हीं योग्य प्रकारें पार पडतील. सामान्य मनुष्यामध्यें कांही प्रतीची बुद्धिमत्ता व नीतिमत्ता, समाजशीलता व न्यायशीलता, सार्वजनिक हितपालनबुद्धि व लोकसेवाभाव नसला तर, किंवा शिक्षणानें व अनुभवानें उत्पन्न होऊं शकला नाही तर, लोकसत्तेची व्यवस्था व कारभार समाजाला घातक व दु:खावह होईल. सामाजिक सत्ता व व्यवहार हीं अज्ञानी व असमर्थ लोकांच्या हातीं जाणें हें फार धोक्याचें आहे व तें समाजाच्या ऱ्हासाला व नाशाला कारण होतें.

तेव्हा सामान्य मनुष्याच्या व्यवहारांत व कारभारांत घोटाळा व गोंधळ उत्पन्न होऊं नये, त्याचा समाज सुव्यवस्थित राहावा व सर्वांना संमत होतील असे त्याला कांही अधिकार व कर्तव्यें, कांही सत्ता व स्वातंत्र्य आखून द्यावें, व त्याच्याकडून समाजाच्या पालनपोषणाचीं व सेवेचीं कांही कामें करून घ्यावीं असा या शास्त्राचा उद्देश आहे; आणि

बहुजनसमाजामध्यें समतेची व सेवेची भावना उत्पन्न करून ती अंगवळणीं पाडणें हें त्याचें कार्य आहे.

सामान्य मनुष्य हा सामाजिक वृत्तीचा असला पाहिजे. तो कोणाचा द्रोह न करणारा, मित्रभावाने व सहकारितेने राहणारा, स्वतःच्या प्राप्तीचा समाजहितबुद्धीने उपयोग करणारा व स्वतःमध्यें संयम, दया, सेवाभाव व सद्‌गृहस्थभाव ठेवणारा पाहिजे.

नागरिकनीतिशास्त्र हें समाजासंबंधीं सर्व प्रकारचें ज्ञान मिळवितें व सामान्य मनुष्याच्या सामुदायिक हिताच्या दृष्टीने त्याचा उपयोग करतें. तें त्याचें जीवन व त्याच्या संस्था यांची सुधारणा करण्याचे मार्ग दाखवितें. समाजाचीं पालनात्मक कार्यें तें न्याय व नीति, निर्बन्ध व नियंत्रण यांच्या रूपाने दाखवितें आणि त्याचीं पोषणात्मक कार्यें तें धर्म, अर्थ, शिक्षण, आरोग्य व स्वास्थ्य यांचें वर्धन होईल अशा उपायांनी दर्शवितें.

नागरिकनीतीच्या मूलभूत कल्पनेमध्यें समाजाच्या प्रगतीच्या दृष्टीने सामान्य नागरिकाची आपल्या शेजाऱ्यांशीं व देशबांधवांशीं मैत्री व सहकारिता कशी घडेल हा विचार येतो व तो पार पाडण्याकरतां नागरिकाला त्याचे अधिकार व कर्तव्यें यांच्या मर्यादा घालून दिल्या जातात. त्याच्या शीलाला व बुद्धीला वळण दिलें जातें आणि त्याच्यामध्यें संयम व शिस्त, सेवाभाव व त्यागवृत्ति हीं उत्पन केलीं जातात.

याच्या उलट, राज्यनीतीच्या मूलभूत कल्पनेमध्यें समाजरक्षणाच्या दृष्टीने समाजाच्या अधिसत्तेचा अधिकार व नियंत्रण आणि नागरिकाचें स्वातंत्र्य व कर्तव्य यांचा मेळ कसा बसेल याकडे लक्ष दिलें जातें आणि त्याकरतां राज्यतंत्राचे निग्रहानुग्रहात्मक निर्बंध व कार्यें, त्याच्या नियामक, शासक व निर्णयिक अंगांची व्यवस्था व परस्पर संबंध आणि त्याच्या शांततेच्या, सुव्यवस्थेच्या व भरभराटीच्या कल्पना हीं सर्व ठरविलीं जातात.

प्रगतीच्या दृष्टीने मैत्री, सहकारिता, स्वातंत्र्य, कर्तव्यें, शिक्षण व सेवा हीं पाहिजेत. रक्षणाच्या दृष्टीने निर्बंध, नियंत्रण, अधिकार व शासन हीं पाहिजेत. म्हणजेच दुष्टांचें निर्दळण व साधूंचा व सामान्य जनतेचा सांभाळ होईल. असा या दोन्ही शास्त्रांचा दुहेरी उपयोग आहे. त्यांतल्या त्यांत प्रगतीचा मार्ग दर्शविणाऱ्या लोकनीतिशास्त्राचें महत्त्व आजच्या आचार-विचार-स्वातंत्र्याच्या काळांत विशेषच आहे.

---

# नागरिकनीति

## प्रकरण पहिलें

## विषयप्रवेश

आधुनिक जगांत मनुष्याचें मन अधिक स्वावलंबी व स्वतंत्र आणि त्याचे व्यवहार अधिक परावलंबी व अन्योन्याश्रयी झाले आहेत. त्यामुळें त्याची प्रगति म्हणजे नुसती त्याची स्वतःची मानसिक परिणति व पारमार्थिक कल्याण हीं नव्हेत, तर त्यामध्यें त्याच्या सामुदायिक जीवनाची वाढ व उच्चता आणि त्याच्या सामाजिक व्यवहाराचा प्रसार हीं येतात. आज आपल्या व्यवसायांचें, व्यापारांचें व सहवासाचें क्षेत्र फार वाढलें आहे. आपले परस्पर संबंध नुसते कुटुंबांतर्गत अथवा ग्रामांतर्गतच राहिले नाहीत, तर त्यांचा प्रसार आपलें कुल, जातगोत व ग्राम यांच्या पलीकडे जाऊन ते अन्य जातींशीं व लोकांशीं निगडित झाले आहेत आणि नगर, प्रांत व देश यांमधून पसरले आहेत. सध्या तर ते जगांतील अनेक राष्ट्रांच्या जीवनप्रवाहांत मिसळत आहेत. ते विशेष गुंतागुंतीचे व सूक्ष्म प्रकारचे झाले आहेत. ते बारकाव्याचे व निकट होत आहेत.

आपल्या देशांतील नगरांत व प्रांतांप्रांतांत निरनिराळ्या लोकांचे व लोकसमूहांचे परस्परांशीं संबंध अधिक वाढल्यामुळें व आपल्या देशाचें इतर देशांशीं अधिक दळणवळण सुरू झाल्यामुळें, ते संबंध व दळणवळण सुरळीत चालण्यास, टिकण्यास व त्यांचें योग्य पोषण होण्यास कांही नियमांची, कांही ध्येयांची व कर्तव्यांची आवश्यकता भासत आहे. त्याशिवाय मनुष्याचें सामाजिक जीवन अन्योन्याश्रयी व उत्तम प्रतीचें होण्यास कांही नीतिबंधनांची आवश्यकता आहे. असे हे नियम, ध्येयें व बंधनें संकलित करून त्यांना राष्टनीति व परराष्ट्रनीति असें शास्त्रकार म्हणतात.

प्रत्येक लोकसमुदायाच्या बाल्यावस्थेपासून अशा प्रकारची नीति त्यांच्यामध्यें प्रचलित असते व ती त्यांच्या कुलांतील, जातींतील, ग्रामांतील व नगरांतील आचारामध्यें व व्यवहारामध्यें अंतर्भूत झालेली असते. त्यामुळें त्या लोकांना त्यांच्या स्वभावाप्रमाणें, आवश्यकतेप्रमाणें व परिस्थितीप्रमाणें एक नैतिक परंपरा व एक प्रकारचा स्वभावविशेष हीं प्राप्त होतात. सामान्य लोकांनी परस्परांशीं कसें वर्तावें, समाजहितदृष्टया सन्मान्य वर्तन कोणतें, तसेंच समाजांतील शासकांचें व सत्ताधाऱ्यांचें वर्तन व त्यांचे अधिकार कसे असावेत, याविषयींचे नियम त्यांच्यामध्यें हळूहळू निर्माण होतात. लोकांचे अधिकार व कर्तव्यें, त्यांच्या मर्यादा व स्वातंत्र्य, ह्यांचा योग्य मेळ घालून देणें हाच त्या नीतिनियमांचा मुख्य उद्देश असतो.

जेव्हा हे संबंध व व्यवहार नव्या परिस्थितीमुळें बदलतात अथवा नव्या लोकसमूहांशीं होणाऱ्या संघटनामुळें वाढतात, तेव्हा त्या नियमांचें स्वरूप, मर्यादा व क्षेत्र हीं बदलावीं व वाढवावीं लागतात. त्यामुळें समाजाच्या वाढत्या संबंधाला कोणतें वळण द्यावें, त्याचें नियमन कसें करावें, ह्याचा विचार प्रत्येक समाजशास्त्रकोविदास करावा लागतो; व अशा कारणांमुळें एक प्रकारचें नवें लोकनीतिशास्त्र उत्पन्न होतें.

आज आपल्या देशांतील लोकांचा परस्परांशीं होणारा व्यवहार व वर्तन आणि आपले परदेशांतील लोकांशीं येणारे संबंध, हीं योग्य तऱ्हेने, गुण्यागोविंदाने व सुखासमाधानाने चाललीं पाहिजेत; कारण आपले एकमेकांचे संबंध गुंतलेले आहेत. त्याकरितां आपले परस्परांचे प्रेमभाव, साहचर्य व दळणवळण हीं वाढलीं पाहिजेत; आणि आपसांतील द्रोहबुद्धि कमी झाली पाहिजे. ह्या दृष्टीनेच आपल्या लोकांना लागणाऱ्या नव्या संस्थांची रचना आणि शासक, सत्ताधारी व अधिकारी ह्यांचें वर्तन व अधिकारक्षेत्र हीं ठरविलीं गेलीं पाहिजेत.

पूर्वी आपले लोक धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांनी घालून दिलेल्या नियमांप्रमाणें चालत असत. आणि त्या प्राचीन परंपरेस अनुसरून आपण तेच नियम बऱ्याच अंशाने आजही पाळीत आहोंत आपले आचार विचार, आपले आहार, विहार व व्यवहार त्याच

नियमांवर आजपर्यंत अनेक प्रकारें अवलंबून होते. हे नियम ठरवितांना आपल्या धर्मव्यवस्थापकांनी व नीतिनिपुणांनी मनुष्याचीं पारमार्थिक, सामाजिक व वैयक्तिक ध्येयें म्हणून चार पुरुषार्थ व त्या ध्येयप्राप्तीचे मार्ग म्हणून चार वर्ण व चार आश्रम कल्पिले व प्रतिपादिले आहेत. त्या ध्येयांना धरून वागणें, त्या वर्णाश्रमव्यवस्थेचा संकर होऊं न देतां प्रत्येक व्यक्तीने व जातीने आपल्या स्वभाव-(जन्म)-प्राप्त वर्णधर्माप्रमाणें व कालानुरूप आश्रमधर्माप्रमाणें वर्तन करणें, अशी त्यांनी लोकनीति सांगितली आहे. ह्या ध्येयामध्यें, धर्मामध्यें व नीतीमध्यें त्यांनी एकसूत्रीपणा ठेविला आहे. धर्म, अर्थ, काम व मोक्ष; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र; ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी, ह्यांच्यामध्यें परस्पर विरोध नसून ते विभाग व ती व्यवस्था एकाच अंतिम ध्येयाकडे नेणाऱ्या पायऱ्या व उपाय आहेत. त्यांच्यामध्यें योग्य सुस्थिति राखणें, पूर्वोत्तर संबंध ठेवणें व विरोध उत्पन्न होऊं न देणें, हेंच समाजसंरक्षकांचें काम आहे.

आपल्या देशांतील प्राचीन काळच्या समाजनियामकांनी संसार-नीतीचे प्रवृत्ति व निवृत्ति असे दोन मार्ग ठरवून त्याबद्दलचीं दोन मुख्य शास्त्रें रचलीं आहेत. प्रत्येक मनुष्याने ह्या दोन्ही मार्गांच्या नीति पाळून पार पडलें पाहिजे. त्यांपैकी, **नीतिशास्त्र** हें प्रवृत्तिमार्गाचें शास्त्र आहे व **मोक्षशास्त्र** हें निवृत्तिमार्गाचें आहे. आपणास या ठिकाणीं मोक्ष-शास्त्राचें अवलोकन करावयाचें नाही, कारण तें संसारापासून निवृत्त होण्याचें शास्त्र आहे. आपणास नीतिशास्त्राची आवश्यकता आहे, कारण त्याचे मार्ग व नियम हे संसाराकरितां व ऐहिक लोकयात्रेकरितां आहेत. समाज व कुटुंब, वर्ण व जाति, ह्यांच्या सुखासंबंधींचे नियम त्यांत दिले आहेत. त्यामध्यें सांगितलेले आचार, व्यवहार व दंड हे समाजाच्या रोजच्या जीवनाकरतां, त्याचें संरक्षण व पोषण करण्याकरतां आहेत. नीतिशास्त्रा-मध्यें धर्मशास्त्र, अर्थशास्त्र व कामशास्त्र या तीन शास्त्रांचा अंतर्भाव होतो. धर्म, अर्थ व काम हा त्रिवर्ग समाजाच्या स्थैर्याला व लोकांच्या व्यवहा-राला आवश्यक आहे. त्या शास्त्रांमध्यें प्रत्येक मनुष्याला त्याच्या गुण, कर्म, काल, जाति, वृत्ति व वय यांना अनुरूप असे धर्म सांगितले आहेत. त्यांच्यामध्यें प्रामुख्याने पुढे दिलेले विषय येतातः—

१. कुल व कुटुंब यांचे धर्म अथवा आचार.
२. वर्ण व आश्रम यांना अनुसरून सामान्य व विशेष समाजधर्म.
३. राजा व प्रजा यांचे धर्म.
४. व्यवहारधर्म, दंड व प्रायश्चित्त.
५. उत्तम ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचे धर्म.
६. उत्तम ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी यांचे धर्म.
७. उत्तम भर्ता, भार्या व भृत्य यांचे धर्म.
८. वृत्तिधर्म.
९. देशकालधर्म.
१०. अरि-मित्र-उदासीन धर्म; साम, दाम, दंड, भेदादि उपाय.
११. यज्ञ, स्वाध्याय, व्रत व तपस्या अशा प्रकारचे पारलौकिक धर्म.
१२. सामान्य मनुष्यधर्म अथवा नीति.
१३. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या पुरुषार्थांचें पृथक् महत्त्व व परस्पर संबंध.

हीं शास्त्रें रचणारे शास्त्रकार आपल्या देशांत पुष्कळ झाले आहेत. उदाहरणार्थ, मनु व याज्ञवल्क्य हे धर्मशास्त्रकार, शुक्र, बृहस्पति व कौटिल्य हे अर्थशास्त्रकार आणि वात्स्यायनासारखे कामशास्त्रकार होऊन गेले आहेत. त्यांनी घालून दिलेल्या नियमांनुसार थोड्या बहुत अंशाने आपलें वैयक्तिक व सामाजिक जीवन चालू आहे. तथापि ज्या मूलभूत तत्त्वांनुसार त्यांनी आपलीं शास्त्रें रचलीं आहेत त्याबद्दल आज मत-विरोध उत्पन्न झाले आहेत हें येथें लक्षांत घेणें अवश्य आहे.

अशा विरोधकांच्या मतें सृष्टिरचनेंत मूलतः जरी विधात्याचा हात असला तरी मानवसमाजाच्या उन्नतींत व व्यवहारांत तो विशेष-रूपाने नाही. मनुष्य हा आपलें सुखदुःख कल्पिण्यास व ठरविण्यास अनेक प्रकारें स्वतंत्र आहे. त्याच्या स्वतंत्रतेला कांही निसर्गाच्या व जड-सृष्टीच्या सीमा आणि अंतर्भूत शक्तीच्या स्वाभाविक मर्यादा असल्या तरी त्याचें स्वतंत्रतेचें क्षेत्र मोठें आहे. आपल्या स्थितीचा, सुखदुःखाचा व कर्माचा तो धनी व धन्वंतरी आहे. त्याचें मनुष्यसमाजांतील स्थान ठराविक, एका वृत्तीचें, एका व्यवसायाचें अथवा एका दर्जाचें नाही. समाजांत त्याला पुढे मागे जाण्याचें, उन्नति अवनति करून घेण्याचें,

सुखदुःख ठरविण्याचें, कुल व व्यवसाय यांची परंपरा बदलण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आहे व असावें. प्रगतीचें आधुनिक तत्त्व ह्याच मानवस्वभावाच्या सिद्धांतावर आरूढ झालें आहे. सर्व मानवसमाज पुढे उन्नतीच्या शिखराकडे जात आहे व ती उन्नति अनेक प्रकारची व अनेक अंगांची असून दिवसेंदिवस तिची व्याप्ति वाढत आहे. हें सर्व मनुष्याच्या स्वसामर्थ्यानें व स्वातंत्र्यानें होत आहे. त्याला परमेश्वरानें सीमा घातलेल्या नाहीत. असतील तर त्या मनुष्ययोनीच्या वाट्यास आलेल्या स्वभावांत व अंतर्गत शक्तींत आहेत. मनुष्यसमाजानेच पूर्वी जें बरें वाईट केलें असेल तेंच त्याच्या आजच्या बऱ्या वाईट स्थितीला व नीतीला कारण झालें आहे.

तेव्हा पूर्वीच्या समाजाबद्दलच्या कल्पनेमध्यें व आजच्या त्याच्याबद्दलच्या स्थितिगतीच्या कल्पनेमध्यें बरेंच अंतर आहे. आणि त्यामुळें मनुष्याच्या श्रमाला व पराक्रमाला, धोरणाला व ध्येयाला नवें वळण लागत आहे. त्यामुळें त्याचें सामर्थ्य, स्वातंत्र्य व व्यवहारक्षेत्र वाढलें आहे. तदनुसार त्याच्या नीतीचें स्वरूप बदललें आहे. तेव्हा आजचें लोकनीतिशास्त्र नव्या वळणाचें आहे. पूर्वी लोकनीतीचा विचार विशेषतः ऐहिक व पारलौकिक दृष्टीनें होत असे. समाजाच्या ऐहिक लोकयात्रेंत देखील देवधर्माच्या कल्पनांचें प्राबल्य असे. त्यामुळें, लोकनीतीचा रोख धार्मिक वळणावर जात असे. समाजाचे सर्व घटक, रक्षक, पोषक व नियंते हे त्या ध्येयाला अनुसरून वागत व श्रद्धायुक्त मनानें बंधनें पाळीत. आजच्या समाजांत पारलौकिक कल्पनेचें प्राबल्य कमी आहे. त्या जागीं आज राजसत्ता, राष्ट्र, समाज ह्यांचें प्राबल्य विशेष आहे. जें पूर्वी धर्मकल्पनेच्या पारलौकिक प्रोत्साहनानें होत असे तें आज राष्ट्रकल्पनेच्या ऐहिक प्रेरणेनें होत आहे. तेव्हा आधुनिक लोकनीतीचा विचार राष्ट्रसमाज, राजसत्ता, राजनीति, राज्यव्यवस्था व मानवसमाज यांच्या धोरणानें मोठमोठे लेखक करीत आहेत.

समाजाचे अनेक प्रकार आहेत व अनेक अंगें आहेत. कुटुंब व कुल, ग्राम व नगर, जाति व वृत्ति, समाज, देश, राष्ट्र व मानवसमाज हे त्याचे लहान मोठे प्रकार होत. धर्म, अर्थ, काम व राजकारण हीं त्यांची प्रधान अंगें होत. तेव्हा या दृष्टीनें लोकनीतीचे अनेक प्रकार व अनेक अंगें संभवतात. त्यांची मांडणी ह्या शास्त्रामध्यें स्थल, काल, कार्य

परंपरा व परिस्थिति यांस अनुसरून केलेली आहे. त्याचा मुख्य उद्देश सामान्य मनुष्याचें सामुदायिक व सार्वत्रिक जीवन उत्तम व सुखकर कसें होईल हा आहे.

राज्य हेंच मनुष्याचा धर्म, अर्थ व काम यांचें मूळ व आधार आहे असें कौटिल्याप्रमाणें धरून अथवा धर्म, अर्थ व काम हीं राज्याश्रयामुळेंच यशस्वी होतात असें मानून, आधुनिक ग्रंथकार राज्यशासनशास्त्राच्या अनुरोधाने ह्या लोकनीतिशास्त्राची मांडणी करतात व समाजाच्या बाकीच्या अंगांकडे दुर्लक्ष करतात. म्हणजे प्रत्येक मनुष्य हा राज्यघटक आहे असें कल्पून त्याचे राजकीय अधिकार व कर्तव्यें काय आहेत, त्याच्या राष्ट्राची राज्यव्यवस्था व शासनपद्धति काय आहे, व त्यापासून समाजाचें कोणकोणतें कार्य व्हावयास पाहिजे, ह्या सार्वजनिक विषयांचा ऊहापोह व मांडणी ते मुख्यत्वेंकरून करतात. पण जरी राज्य ही शासनसंस्था असली व त्यामुळें तिच्यामध्यें दंडशक्ति व बल असलें व त्यायोगें ती अनेक कामें करूं शकली तरी लोकनीतिशास्त्राचें स्वरूप राजनीतिशास्त्राच्या क्षेत्राहून अधिक व्यापक आहे. राजनीतिशास्त्र हें राजसत्तेच्या अनेक अंगांचें, तिच्या उदयाचें, स्वभावाचें, वर्चस्वाचें, व्यवस्थेचें, कार्याचें, अधिकाराचें व उद्देशाचें वर्णन व विवेचन करतें. पण राजसत्ता ही समाजसंरक्षणाची महत्त्वाची पण एकच बाजू आहे. तिचें क्षेत्र मनुष्याचे सर्व व्यवहार व आचार यांचें नियमन करण्याचें नाही. मनुष्याचे वैयक्तिक व सामुदायिक आचार व व्यवहार अनेक असतात. लोकनीतिशास्त्र हें सामान्य मनुष्याच्या कर्तव्याचा सर्व अंगांनी व सर्व प्रकारांनी विचार करतें, व त्याचें जीवन नीतिमय, सुखकारक व पूर्ण कसें होईल हें दाखवितें. मनुष्य हा नुसता कुटुंबवत्सल अथवा नुसता राष्ट्रघटक नाही. तर तो ग्रामघटक, नगरघटक आहे व तसाच मानवही आहे. तेव्हा त्यास अनुसरून त्या त्या क्षेत्रामध्यें घडणारें त्याचें जीवन व होणारें त्याचें कार्य याबद्दलची नीति त्याला समजली पाहिजे व शिकविली पाहिजे. राजकारणाशिवाय त्याचे जे इतर सामाजिक संबंध व संबंधी आहेत, त्यांच्याशीं त्याचें वर्तन कसें असावें, याचेंही त्याला पूर्ण ज्ञान झालें पाहिजे. लोकनीतिशास्त्र हें लोकांच्या अनेकविध व अंगांचें प्रकारांचें

द्योतक व नियामक आहे. तेव्हा त्या शास्त्राचें नवीन तऱ्हेने अध्ययन सुरू करणें हें आपलें कर्तव्य आहे.

'नीति' हा शब्द 'नी—नेणें' ह्या धातूपासून झालेला आहे. 'नयनान्नीतिः' अथवा 'जी नेते ती नीति.' जी परिणत स्थितीकडे अथवा ध्येयाकडे अथवा अभ्युदयाकडे नेणारी ती नीति. तिचें कार्य म्हणजे प्रत्येक मनुष्यास विशिष्ट परिस्थितीच्या, परंपरेच्या व स्वभावाच्या बंधनापलीकडचा कल्याणाचा मार्ग सामाजिक स्वरूपाचे नियम घालून दाखविणें हें होय. शास्त्र हें अशा नीतिनियमांची मीमांसा करतें व त्यांचें पूर्ण ज्ञान करून देतें. तें सांगोपांग व यथोचित असलें पाहिजे. त्याची मांडणी सयुक्तिक व आधुनिक शास्त्रीय पद्धतीने झाली पाहिजे. त्यायोगें मनुष्यस्वभावाची व समाजस्वरूपाची ओळख उत्तम झाली पाहिजे.

या शास्त्राचे मुख्य आधार ( Sources ) इतिहासाने मिळणारा अनुभव, मानसशास्त्राचे समाज व व्यक्ति यांच्या संबंधाचे मूल सिद्धांत, परिस्थितीची व परंपरेची मर्यादा, संस्था व समाज यांची उपयुक्तता, हे आहेत. आपणास मनुष्यस्वभाव जर उत्तम समजला व त्याच्या अनेकविध कर्तृत्वाची जर पूर्ण ओळख झाली तर त्याचें सामाजिक वर्तन आणि त्याला लागणारें धोरण व नियम हे उत्तम मांडतां येतील. हें ज्ञान आपणास अझून पूर्ण प्राप्त झालें नाही.

हें शास्त्र लोकांच्या सुस्थितीकरतां व हिताकरतां रचिलें आहे. त्याच्या योगें धर्म, अर्थ, काम हा त्रिवर्ग प्राप्त होतो व पुढला मोक्ष म्हणजे अंतिम कल्याण हा सुलभ होतो. राजाने व प्रजेने त्याचा उत्तम अभ्यास व त्याच्या नियमांचें योग्य पालन केलें पाहिजे. कारण नीतीवाचून लोकांच्या व्यवहाराला सुस्थिति व स्थैर्य नाही. त्याच्या योगाने कार्याकार्य, सुखदुःख व शुभाशुभ कळतें, आणि मनुष्याचें व समाजाचें जीवन अभीष्टकर व सुखकर होतें.

आजच्या भौतिक शास्त्राच्या प्रगतीमुळें मनुष्याच्या पौराणिक समजुतींमध्यें बराच फरक झाला आहे. आजच्या मानवी इतिहासाच्या विस्तृत अध्ययनाने निरनिराळ्या लोकांचें अनेक प्रकारचें जीवन व त्यांच्या सुखसोयींच्या समजुती ह्याबद्दलचें ज्ञान चोहीकडे पसरलें आहे.

भौतिक उन्नतिवादाचीं तत्त्वें व दृष्टि यांच्या अनुरोधाने मनुष्याच्या नीति, धर्म, समाज यासंबंधाच्या कल्पनांचा विकास व प्रगति होत आहे व होणार आहे, असे दृढ भाव लोकांमध्यें पसरत आहेत. आणि शिक्षणाच्या योगाने मनुष्याचें मन, बुद्धि, ध्येय, हीं एका स्थितीपासून दुसऱ्या इच्छित स्थितीकडे एकाच जन्मांत व एकाच युगांत नेतां येतात, हें मत कांही अंशीं प्रचीती, कांही अंशीं अनुभव व कांही अंशीं मानसशास्त्राचे सिद्धांत, यांच्या अनुरोधाने पत्करलें गेलें आहे. सर्व धर्मांच्या व धार्मिक कल्पनांच्या तुलनात्मक व ऐतिहासिक अभ्यासाने त्यांच्या सुस्थितीची, प्रगतीची व मूलभूत उच्च तत्त्वांची योग्य माहिती मिळून त्यांत देश-काल-परिस्थितीस व परंपरेस काय अनुसरून आहे व मानवाच्या दैवी व दानवी स्वभावास काय अनुसरून आहे, हें सर्व कळूं लागलें आहे. त्यामुळें धार्मिक द्वेष कमी होऊन धर्माचें समाजाच्या जीवनांत योग्य स्थान कोणतें हें आज आपणास कळत आहे. धर्माचा अट्टाहास, मूढपणा, वेडेपणा व अंधश्रद्धा जाऊन त्याला विचाराचें व खऱ्या साधुहृदयाचें वळण मिळत आहे, आणि लोकसत्तेच्या नव्या लौकिक ध्येयाने प्रत्येक मनुष्यामध्यें स्वातंत्र्याची, समतेची व स्वार्थोन्नतीची उत्कट भावना उत्पन्न झाली आहे. असें हें आजचें नवें वातावरण व नवी वावरणारी शक्ति आहे.

तेव्हा ह्या नव्या वातावरणास, नूतनोद्भूत शक्तीस व उत्साहास अनुसरून समाजाची नवी नीतिसृष्टि निर्माण झाली पाहिजे. जुने धर्म आज अधर्म मानले जात आहेत. जुने अर्थ आज अनर्थ मानले जात आहेत. याचा अर्थ असा नाही की, मानवसमाजामध्यें आज खरा धर्म नाही किंवा खरी नीति नाही. पण धर्माची व नीतीची संकुचित धारणा व क्षेत्र जाऊन आज त्याचें क्षेत्र अखिल मानवसमाजामध्यें 'वसुधैव कुटुंबकम्' या तत्त्वानुसार एकी, भ्रातृभाव व दळणवळण उत्पन्न करण्याच्या दिशेने वाढत आहे. तेव्हा ज्यायोगें मानवसमाजाच्या एकहिताचे प्रश्न पुढे येतील त्या गोष्टी करणें व त्यांना महत्त्व देणें आवश्यक होतें, आणि ज्यायोगें त्याच्यामधील भेदभाव व विरोध वाढतात त्या गोष्टींकडे दुर्लक्ष करणें प्राप्त होतें.

आज आर्थिक व राजकीय दृष्टया मानवसमाजाचे हितसंबंध निकट आहेत, कारण ते बव्हंशीं परस्पराच्या मदतीवर, देवघेवीवर व आकांक्षा-

वर अवलंबून आहेत. आज जगामध्यें सर्व समाजांची आर्थिक भरभराट व राजकीय शांतता व लोकसत्तेची प्रगति आंतरराष्ट्रीय सहानुभूतीवर, मैत्रीवर व मदतीवर अवलंबून आहे. तेव्हा ह्या आर्थिक व राजकीय संबंधांना अनुसरून समाजाची नीति, आकांक्षा व ध्येयें हीं आखावीं लागत आहेत. आणि मनुष्यसमाजाच्या कांही धार्मिक व सांस्कृतिक अंगांमध्यें जरी विशेष भेद अथवा विरोध असला तरी त्याला दुय्यम दर्जाचें स्थान देऊन व त्यांतील मानवी हितास व मैत्रीस पोषक अशीं जीं अंगें असतील त्यांनाच प्रोत्साहन देऊन त्यांचें पालन करावें लागत आहे. आज सर्व मानवी समाज व त्याचें ऐहिक सुख ह्यांकडेच लोकनीतिनिपुणांचें लक्ष आहे. त्या ऐहिक सुखाची व्याख्या फार व्यापक आहे. त्यामध्यें उच्च नीतिमत्ता उच्च राहणी, करुणा, मैत्री, सेवा, संस्कृति, अहिंसा, समता, स्वातंत्र्य, वगैरे गोष्टींचा अंतर्भाव होतो. त्यामध्यें पारलौकिकत्वाचें जरी ध्येय नाही तरी आध्यात्मिक वृत्तीच्या कांही उच्चतर पायऱ्या आहेत आणि मनुष्या-मनुष्यांतील विरोध व भेद कमी करण्याची वृत्ति आहे. दुःखी व दरिद्री, दास व दग्ध, रंजित व गांजित ह्यांना आपले म्हणून त्यांची सेवा, त्यांचें दुःखहरण करण्याची व त्यांना हृदयीं धरण्याची अहमहमिका चालू आहे; आणि दंडेल व दंडनीय ह्यांना यथाशास्त्र शासन होत आहे. लोकां-मध्यें खऱ्या दयेचीं, सत्पात्रीं दानाचीं व सत्कार्यीं झिजण्याची वृत्ति वाढत आहे. पूर्वीचे अंधश्रद्धेने अथवा पारलौकिक भीतीने पत्करलेले नियम आज उच्च मानव्याच्या व उपयुक्ततेच्या दृष्टीने समजून उमजून विश्वास-पूर्वक आनंदाने पाळले जात आहेत. तेव्हा अशा नव्या काळांत लोकनी-तीचे नियम व त्यांचें शास्त्र ह्या काळाच्या ध्येयाला, स्वभावाला व प्रकृतीला अनुसरून मांडणें व त्यांचें अध्ययन करणें फार आवश्यक आहे.

(ह्या शास्त्राची व्यापकता लोकांचें पूर्ण व आदर्श जीवन कोणतें ह्या प्रश्नावर अवलंबून राहील.

लोकांच्या सामाजिक जीवनाचे आध्यात्मिक, सामुदायिक, वैयक्तिक व स्थलकालसंबद्ध असे चार भाग केले तर त्याला अनुसरून लोकनीति-शास्त्रामध्यें पुढील विषयांची चर्चा झाली पाहिजेः—

१. व्यक्तीच्या जीवनाचे गुणदोष, तिचे अधिकार व कर्तव्यें.

२. व्यक्तींचें समाजाच्या नियमनापासून कोणत्या बाबतींत स्वातंत्र्य असावें व समाजाशीं कोणत्या बाबतींत सहकार्य असावें?

३. व्यक्तींचे समाजवाचक परस्पर संबंध व सहचारित्व. यामध्यें कुटुंब, कुल, जाति व समाज यांचे धर्म व नीतिनियम येतील. हे मनुष्याचे संस्कृतिपोषक समूह होत.

४. व्यक्तींचे स्थलवाचक परस्पर संबंध व सन्निधत्व. त्यामध्यें गृह, ग्राम, नगर, प्रांत व देश यांचे धर्म व नीति, धोरण व नियम येतील.

५. व्यक्ति व समाज यांचें देव-धर्म-दृष्टया नियमन. त्यामध्यें प्रत्येक धर्माचे विधिनिषेध, त्याच्या उच्च स्वरूपाचें ज्ञान आणि त्याला अनुसरून ठरविलेलीं कर्तव्यें, हीं येतील.

६. व्यक्तिमात्राचीं आर्थिक कार्यें व व्यवसाय. त्यामध्यें वर्ण, वृत्ति व श्रेणी यांचे धर्म व नीति, नियम व संबंध येतील. त्यामध्यें शेतकी, उद्योगधंदे, व्यापार व कला ह्या येतात.

७. व्यक्ति व समाज यांची गत स्थिति. त्यामध्यें त्यांच्या प्राचीन इतिहासाचें, परंपरेचें, संस्कृतीचें व संस्थांचें व समजुतींचें ज्ञान येईल.

८. व्यक्ति व समाज यांची वर्तमान स्थिति. त्यामध्यें जाति, स्थल, काल, संस्कृति व कार्य यांना अनुसरून जी सध्याची परिस्थिति तिची पाहणी होईल, आणखी त्याच्या व्याधि, विघ्नें, व्यसनें, उणीवा इत्यादींचा विचार होईल.

९. व्यक्ति व समाज यांची भावी गति. त्यामध्यें त्याच्या नव्या आकांक्षा व आवश्यकता, नवें वळण व धोरण, नवे आदर्श व ध्येयें यांचें परीक्षण होईल व त्याला अनुसरून कांही नवी नीति व समाजसेवा सुचविली जाईल.

१०. समाजाच्या भिन्न व्यापारांचे परस्पर संबंध. त्यामध्यें धर्म व राजकारण, राजकारण व व्यवसाय, स्वदेश व परदेश, जाति व देश, कुटुंब व जाति, जाति व संप्रदाय, ह्यांच्या परस्पर संबंधाचे विधिनिषेध दाखविले जातील.

ह्या वर सांगितलेल्या विषयांचें सांगोपांग विवेचन करणें व त्यासंबंधींची योग्य नीति मांडणें हें आधुनिक लोकनीतिशास्त्राचें कर्तव्य आहे.

आपल्या प्राचीन ग्रंथांत व आजच्या परंपरेंत सुद्धा ह्या प्रत्येक भागासंबंधीं थोडें बहुत विवेचन व त्याबद्दलची नीति दिलेली आहे. त्यासंबंधींचें येथे थोडेंसें दिग्दर्शन करतों.

१. मनूने व इतर ग्रंथकारांनी दिलेले मनुष्याचे सामासिक व दशलक्षणक धर्म. ते पाळल्यावाचून कोणत्याही प्रकारचें उच्च मानवी जीवन व समाजस्थैर्य शक्य नाही.

२. कुलधर्म, आश्रमधर्म, वर्णधर्म, देशधर्म, जातिधर्म, श्रेणिधर्म, गणधर्म, पौरजानपदधर्म, राजधर्म, मंडल-योनि-धर्म, ऐहिक व पारलौकिक धर्म ह्यांच्या द्वारें समाजाच्या अनेक अंगांचे, भागांचे व व्यवहाराचे नीतिनियम सांगितले आहेत आणि मनुष्याच्या ऐहिक जीवनांत व पारलौकिक यात्रेंत उत्पन्न होणाऱ्या परस्पर संबंधांची त्या त्या काळांतील कल्पनेप्रमाणें मांडणी केली आहे.

३. स्वार्थ, परार्थ व परमार्थ हे तीन्ही अर्थ चार पुरुषार्थांच्या ध्येयाला अनुसरून ठरविले आहेत.

आधुनिक युगामध्यें लोकनीतीची मांडणी जरी नव्या पद्धतीने व नव्या ज्ञानाला अनुसरून होत आहे तरी त्यामध्यें सर्वच नियम व सिद्धांत नवे नाहीत. आजची मांडणी व्यक्तिस्वातंत्र्याच्या, समतेच्या व हक्काच्या दृष्टीनें विशेष होत आहे. ती सामाजिक नियंत्रणाच्या, कर्तव्याच्या व हिताच्या दृष्टीने तितकी होत नाही. यामध्यें मनुष्याचे राजकीय, सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक व राष्ट्रीय हक्क काय आणि त्या दृष्टीने सामुदायिक संघटनेचें नीतिशास्त्र काय, याचा विशेष विचार केला जातो. जीवन, पोषण, आचार, विचार, व्यवहार या सर्व बाबतींतील नागरिकांचें स्वातंत्र्य, शिक्षण, कुटुंबपोषण, व्यवसाय, राज्यकारभार या बाबतींतले त्यांचे हक्क, आणि ह्या स्वातंत्र्याचें व हक्कांचें रक्षण करीत असतांना दुसऱ्यांच्या समान स्वातंत्र्याचा व हक्कांचा विचार व त्याला अनुकूल होणारी सर्वोत्कृष्ट समाजव्यवस्था, व राज्यघटना यांचा विचार केला जातो.

असें हें ह्या आधुनिक लोकनीतिशास्त्राचें स्वरूप व महत्त्व आहे. त्याला पाश्चात्य लेखक "Science of *Civics*" ( civis म्हणजे नागरिक असा लॅटिन शब्द आहे ) अथवा 'नागरिकशास्त्र' या नांवाने

संबोधितात. त्याला ' लोकनीतिशास्त्र ' ही संज्ञा अधिक अन्वर्थक होईल, कारण मनुष्य हा नुसता एखाद्या नगराचा घटक नाही. ग्रीक लोकांची समाजाची नगररूपी संकुचित कल्पना परंपरेप्रमाणें व आजच्या राष्ट्रीय व मानवी संघांच्या दृष्टीने पाहतां कोती ठरते. ग्रामें व नगरें, प्रांत व देश, ह्या अनेक स्थलांच्या आश्रयाने मनुष्य वास करीत असतो. मनुष्याचें विविध व विस्तृत जीवन नुसत्या नगरामध्येंच व्यतीत होत नाही. तें अनेकांगी व व्यापक आहे. त्याची रचना मनुष्याच्या भिन्न रुचीस व प्रकृतीस आणि त्याच्या समूहशील स्वभावास धरून केली पाहिजे. तथापि मूळ इंग्रजी नांवास धरून ' नागरिकनीतिशास्त्र ' हेंच नांव आजवर मराठींत वापरण्यांत आलें आहे व प्रत्येक देशांतील लोक हे प्रधानतः ग्रामवासी अथवा नगरवासी असतात या दृष्टीने पाहतां तेंच नांव पुढे चालू ठेवण्यासही खरोखर कांही हरकत नाही. असो.

ग्रामवासी लोक हे साध्या रहाणीचे असून त्यांचे व्यवहार, व्यापार, व्यवसाय व संबंध हे थोडके व संकुचित स्वरूपाचे असतात. त्यांचें वळण व वर्तन, नीति व नियम साधारणतः एकमार्गी व एकांगी असतात. याच्या उलट, नगरवासीयांमध्यें नाना जातींचे व धर्मांचे, अनेक उद्योगधंद्यांचे व आकांक्षांचे, अनियत वृत्तीचे व अर्थकामप्रधान लोक एकत्रित झालेले असून त्यांचे व्यवहार, व्यापार, व्यवसाय, संबंध व रहाणी हीं विविध, व्यापक व विशिष्ट प्रकारचीं असतात. त्यामुळें त्यांचें वर्तन व वळण, आणि नीति व नियम, हीं अनेकांगी व अनेकरूपी होतात. त्यांच्यामध्यें प्रेम, सलोखा, आदरभाव व एकोपा राहणें हें अधिक बिकट पण समाजाच्या सुस्थितीला अधिक आवश्यक असतें. ग्रामवासीयांच्या सुखाचा व व्यवहाराचा प्रश्न हा नगरवासीयांच्या प्रश्नाच्या मानाने तितका कठीण नसतो. नगरवासीयांचें जीवन अधिक विविध, बहुरंगी व व्यापक स्वरूपाचें असल्यामुळें तें व्यावहारिक दृष्ट्या पूर्ण व उन्नत होऊं शकतें. तेव्हा समाजधुरीणांनी नगरजीवनाचा विचार प्रामुख्येंकरून हातीं घेतला आहे. पण आज ग्रामवासी व नगरवासी जीवनाचा प्रवाह आपापल्या स्थलात्मक सीमेच्या बाहेर वाहात जाऊन तो राष्ट्ररूपाने पसरला आहे. त्यामुळें हें नागरिकनीतीचें शास्त्र खरोखर राष्ट्रीय नीतीचें व दृष्टीचें झालें आहे. आपल्या जीवनाच्या

मर्यादा व आकांक्षा आज पुष्कळ अंशीं राष्ट्रीय स्वरूपाच्या आणि व्यापक व विविध आहेत. सध्या तर त्या राष्ट्राच्याही पलीकडे जाऊन उल्हासानें व उत्कर्षानें विश्वकुटुंबत्वाकडे वाहत जात आहेत. तेव्हा आपलें नागरिक-नीतिशास्त्र राष्ट्रीय विचाराचें व वाढतें असलें पाहिजे.

आज राष्ट्र ही कल्पना मुख्यतः देशवाचक व सांस्कृतिक दृष्टीची आहे. त्यामध्यें राहणाऱ्या लोकांची प्राचीन परंपरा, अर्वाचीन परिस्थिति, आणि भावी आकांक्षा व प्रेरणा ह्या सर्वसाधारण समानस्वरूपी असतात, मग ते लोक कोणत्याही वंशाचे, वर्णाचे, धर्माचें व भाषेचे असोत. मात्र त्यांचें राजकीय नियमन व आर्थिक नियंत्रण एकाच सूत्रानें बद्ध असें असलें पाहिजे.

तरीपण लेखक 'राष्ट्रनीतिशास्त्र' हा प्रयोग फारसा वापरीत नाहीत; कारण बहुजनसमाजाचें जीवन ग्रामामध्यें व नगरामध्येंच व्यतीत होत असतें आणि तेथील संस्था व व्यवहार यांमध्येंच त्याची कार्यशक्ति बहुतांशीं खर्च होते. तरीपण आजचें लोकनीतिशास्त्र राष्ट्रीय दृष्टीनें प्रत्येक व्यक्तीचे सामाजिक व राजकीय अधिकार व कर्तव्यें काय, व्यक्तीची सत्ता व स्वातंत्र्य काय, तिचे विधिनिबंध कोणते, ह्यांचें विवेचन करतें. तेव्हा ह्या शास्त्राच्या दृष्टीनें 'नागरिक' या शब्दाचा अर्थ ग्राम अथवा नगर ह्यामध्यें राहणारा राष्ट्राचा घटक असा होय व 'नागरिकता' ह्याचा अर्थ त्याचे अधिकार व कर्तव्यें, सत्ता व स्वातंत्र्य ह्यांचें स्वरूप व व्याप्ति हा होय.

मनुष्य जर समाजशील व नीतिप्रवण नसला, तो शिक्षणानें, विनयोपदेशानें उन्नत होऊं शकला नाही आणि त्याची स्थिति बदलणारी नसली तर हें शास्त्र निरुपयोगी होईल. पण मनुष्य हा प्रगमनशील आहे, नीतिप्रवण आहे, समाजनिष्ठ आहे, असें आपले अनुभव व ज्ञान आपणास सांगत आहेत व या त्याच्या प्रवृत्ति स्वाभाविक व स्वतंत्र आहेत. तेव्हा या त्याच्या प्रवृत्तींस आधारभूत मानून आपणास हें नीतिशास्त्र रचणें व मांडणें शक्य आहे. असो.

प्रत्येक समाजाच्या स्थैर्याचा, हिताचा व प्रगतीचा विचार करतांना त्याच्या स्वरूपाचा व घटनेचा, त्याच्यांतील शासित व शासक

वर्गांच्या अधिकारकर्तव्यांचा, सत्तास्वातंत्र्याचा व त्याच्या इतर अंतर्गत जीवनाचा विचार करावा लागतो. तो विचार या आधुनिक लोकनीतिशास्त्राच्या रूपाने आपणास कर्तव्य आहे. अशा ह्या महत्त्वपूर्ण विषयाचें विवेचन करण्याचे अगोदर कांही शब्दयोजनांचा व संज्ञांचा अर्थनीट समजून घेतला पाहिजे.

आपल्याकडे ' नीति ' व ' धर्म ' हे शब्द कांही अंशीं समानार्थी योजले जातात. पूर्वी नीतीचा व्यवहाराशीं व प्रपंचाशीं आणि धर्माचा परमार्थाशीं विशेष संबंध धरला जात असे; तरी त्या दोहींनी सांगितलेले नियम वर्णाश्रमयुक्त ऐहिक जीवनाचें नियंत्रण करीत असत. नीतीचें अधिष्ठान पुष्कळ अंशीं मनुष्याच्या अन्तःकरणप्रवृत्तीवर व बुद्धिस्वातंत्र्यावर बसलेलें आहे. धर्माचें अधिष्ठान श्रुतिस्मृत्यादि प्रमाणग्रंथवचनांवर बसलेलें आहे.

आज धर्म हा शब्द परमार्थप्राप्तीच्या ज्ञान, भक्ति व कर्म या मार्गांसंबंधीं योजिला जातो आणि नीति हा प्रापंचिक व व्यावहारिक सदाचरण याबद्दल योजिला जातो. नीतीसंबंधीं आपल्या प्राचीन वाङ्मयामध्यें विदुरनीति, नारदनीति, चाणक्यनीति, कामंदकनीति, शुक्रनीति, नीतिवाक्यामृत असे अनेक ग्रंथ व निरूपणें आहेत. त्यामध्यें कुलनीति, समाजनीति, लोकनीति, राजनीति व सामान्यनीति ह्या भिन्नभिन्न प्रसंग, परिस्थिति व पुरुषार्थ यांना पोषक होतील अशा रूपाने सांगितल्या आहेत. त्यांच्यामध्यें प्रजेला व राजाला आवश्यक असणाऱ्या गुणांचें व नीतींचें स्वरूप व उपयोग हीं दाखविलीं आहेत. त्यामध्यें चांगल्या व वाईट परिस्थितींत, सामान्य मनुष्याने स्वधर्मानुसार कसें वागावें, कोणते गुण चांगले, कोणतें आचरण उत्तम, ह्यांचें विस्तृत प्रतिपादन केलें आहे. त्याचप्रमाणें त्याचें कौटुंबिक व सामाजिक उत्तम आचरण कोणतें, सत्पुरुष, सद्‌गृहस्थ, व सन्मित्र, उत्तम राजा व उत्तम नागरिक कोणाला म्हणावें, याबद्दलचें वर्णन त्यांत आहे. शिवाय, त्यांत यमनियम, उत्तमशील, सद्वर्तन याबद्दलचीं विधानें सांपडतात. तेव्हा नीति म्हणजे नुसती राजनीति नव्हे किंवा तात्त्विक नीतिविचार नव्हे. नीतिशास्त्रांत लोकनीति हा मुख्य विषय आहे. तिच्या योगें लोकरक्षण, लोकसंग्रह व लोकहित कसें होईल ह्याचें ज्ञान आपणास होतें.

धर्म हा पारमार्थिक दृष्टया पवित्र वृत्तीचें व आचरणाचें तत्त्वज्ञान व विधि सांगतो. त्यामध्यें पापपुण्याचे नियम निर्बन्ध व ते मोडल्यास त्याचीं प्रायश्चित्तें येतात. त्यांना प्रमाणवचनाचें स्वरूप असल्यामुळें विशेषत्व येतें. तेथे विवेकबुद्धीला, अन्त:करणप्रवृत्तीला व स्वातंत्र्याला विशेष जागा नाही. त्यामध्यें श्रद्धेला महत्त्व आहे, आत्मनिरीक्षणाला आणि वैयक्तिक व लौकिक अनुभवाला स्थान नाही. एखाद्या धर्माचें प्रतिपादन नैतिकदृष्ट्या पूर्ण उन्नत झालेल्या सत्पुरुषाने केलें असलें तरी एकदा तें प्रतिपादन त्याच्या अनुयायांनी मान्य केलें की त्याव्यतिरिक्त दुसऱ्या त्यासारख्या सत्पुरुषाने प्रतिपादिलेल्या भिन्न धर्माला ते अनुयायी मानीत नाहीत. त्यांच्यामध्यें पंथ व संप्रदाय दृष्टि उत्पन्न होते, आणि इतर धर्मनियम प्रमाणरूप न मानतां ते त्याज्य समजतात. धर्माची अंतिम प्रेरणा जरी अध्यात्माची, आस्तिक्यबुद्धीची, सत्यनिष्ठेची व परमानंदप्राप्तीची असली तरी त्याचें व्यावहारिक स्वरूप संप्रदायामुळें व अंधश्रद्धेमुळें एकांगी व संकुचित होतें. व्यावहारिक नीतिनियमांना प्रामाण्य-बंधन घालून चालत नाही. प्रत्येक बंधनाचें परीक्षण बाह्याचरणाच्या व अंत:करणप्रवृत्तीच्या दृष्टीने सदैव करावें लागतें. असा हा धर्म व नीति यांचा खरा अर्थ व भेद आहे. पण पुष्कळ वेळां लेखक धर्म शब्दाचा उपयोग नीतीच्या अर्थाने करीत असतात.

सध्या संस्कृति व सभ्यता ह्या शब्दांचा बराच उपयोग केला जातो. समाजाच्या उत्तम कृतींना, मग त्या संस्था व समजुती, आचार व विचार अथवा चाली व रीती असोत, आपण संस्कृति म्हणतों. तिच्या योगें तो समाज आपणांस प्रौढ व सुधारलेला समजतो. प्रत्येक समाज सामान्यत: आपल्या चालू असलेल्या कृतींना, मग त्या बऱ्या अथवा वाईट असोत, उत्तम समजतो. प्राथमिक अवस्थेंत राहणाऱ्या पाषाण-युगांतल्या रानटी लोकांच्या कृति व कल्पना ह्यापासून तों आधुनिक जगांत राहणाऱ्या प्रौढ लोकांच्या कृति व कल्पना पावेतों, संस्कृतीचीं निरनिराळीं रूपें व लक्षणें झालीं आहेत. ह्या ऐतिहासिक काळांत मनुष्याने बऱ्याच वस्तु, कला, विद्या व नीतिनियम हीं साध्य केलीं आहेत व वाढविलीं आहेत. त्यायोगें त्याचें चरित्र व इहलोकवास बराच

सुखकर झाला आहे. प्रत्येक काळाच्या व लोकांच्या संस्कृतींत आपणास विचाराचा व वर्तनाचा कांही फरक दिसतो. तो त्यांच्या भिन्न ध्येयामुळें व परिस्थितीमुळें झालेला असतो. तेव्हा संस्कृतीचीं मुख्यतः दोन अंगें धरलीं जातात : एक स्थितिवाचक व व्यक्त झालेलें व दुसरें गतिवाचक व व्यक्त होणारें. त्यांचीं भिन्न व कालस्थलक्रमवार स्वरूपें इतिहास आपणास दाखवितो.

सभ्यता अथवा शीलता ही मनुष्याच्या आंतरिक शक्तीची व वृत्तीची द्योतक आहे. तिच्यायोगें समाजाचें अंतरंग समजतें. संस्कृति ही बहिरंग दाखविते. आत्म्याची प्रवृत्ति व मनाचा कल, ह्याच्या योगें शीलता समजते. ती समाजशीलता, न्यायशीलता, उद्योगशीलता, सदसद्विवेकबुद्धि इत्यादींमध्यें दृष्टोत्पत्तीस येते.

सुसंस्कृत समाज व शीलवान मनुष्यें ह्यांच्या योगें मानव जातीची सुस्थिति व प्रगति चिरकाल टिकाऊ होईल. प्रौढ मानवसमाजाचीं लक्षणें त्याच्या संस्कृतींत व सभ्यतेंतच सापडतात. तेव्हा त्यांचें रक्षण व वर्धन हीं प्रत्येक समाजाने केलीं पाहिजेत.

---

## प्रकरण दुसरें

# समाजविषयक शास्त्रें

प्रत्येक सामान्य मनुष्यापुढे समाजांतील एक घटक या नात्याने व एक स्वतंत्र व जबाबदार व्यक्ति या नात्याने उत्तम व पूर्ण जीवन कसें घालवावयाचें हा मोठा प्रश्न आहे. आपल्या पूर्वजांनी ह्या संबंधांत मिळविलेल्या दीर्घकालीन अनुभवाचा आपलें आयुष्य उत्तम रीतीने घालविण्याच्या कामीं चांगला उपयोग होईल. मनुष्याचा सांप्रतचा जीवनक्रम दुःखाने व धडपडीने भरलेला आहे. तो उत्तम व सुखकर नाही. तो तसा राहूं नये आणि त्याला खऱ्या सुखाचा, नैतिक व आध्यात्मिक कल्याणाचा मार्ग दिसावा, अशी प्रत्येकाची इच्छा आहे. त्यासाठी

त्याचें सामाजिक जीवन सुसंघटित झालें पाहिजे. तें तसें व्हावयाला समाजाचीं विविध स्वरूपें व घटना ह्यांचें निरीक्षण व अभ्यास झाला पाहिजे आणि त्यावरून निघालेले सिद्धांत आपलें सामुदायिक जीवन सुधारण्यासाठी उपयोगांत आणले पाहिजेत व त्यायोगें आपली नीति व व्यवहार हीं सुधारलीं पाहिजेत.

नीतिमत्तेने सर्वोत्कृष्ट मनुष्य बनवावयाचा हें आपल्या संस्कृतीचें ध्येय आहे. त्याच्या पूर्तीसाठी सर्व वैयक्तिक, सामाजिक आणि आध्यात्मिक नियमनिर्बंधांची योजना आहे. समाज हा जगांतले अनुभव प्राप्त करून घेण्याचें एक साधन व आवश्यक संस्था आहे. मनुष्य हा समाजावाचून जगूं शकत नाही व त्याला त्यावाचून आपलें ध्येय व कल्याण हीं प्राप्त करून घेतां येत नाहीत. त्याचें स्वास्थ्य व त्याचा उत्कर्ष मुख्यत: सामाजिक जीवन व समाजव्यवस्था ह्यांच्यावर अवलंबून आहेत.

भ्रमणशील व मृगयाजीवी अवस्थेपासून कृषिप्रधान व उद्यमपर अवस्थेकडे मानवी सुधारणेची प्रगति होत गेली आहे. ह्या दीर्घकालांत मनुष्याने परस्परांशीं चिरस्थायी संबंध जोडले आहेत आणि देशात्मक संघ बनविले आहेत. त्यामुळें मनुष्याचा मनुष्याशीं असलेला संबंध अधिक सततचा, अधिक विस्तृत व अधिक गुंतागुंतीचा झाला आहे. हे संघ आणि संबंध परस्परपोषक व व्यवस्थित होण्यासाठी मनुष्याच्या जीविताचा सर्व अंगांनी अभ्यास झाला पाहिजे. ह्या अभ्यासाने सामाजिक संघटनेच्या तत्त्वांची व मनुष्याच्या स्वातंत्र्याच्या व उन्नतीच्या मार्गांची माहिती होईल. तेव्हा आपला अभ्यास, मनुष्याच्या गतकालांतील समाजपर कृती आणि वागणुकी, त्याची सांप्रतची सामाजिक संघटनेची स्थिति आणि रीति आणि त्याचा भविष्य काळांतील आयुष्याचा उद्देश व ध्येयें ह्या गोष्टींविषयीं झाला पाहिजे. ह्या सर्व विषयांची चर्चा व प्रतिपादन समाजशास्त्रें करतात. या समाजविषयक शास्त्रांचा अभ्यास व रचना सुरू होण्यापूर्वी समाजामध्यें सदाचारी जीवन व समाजस्वास्थ्य ह्याविषयीं कांहीं कल्पना अस्तित्वांत होत्या ह्यांत शंका नाही. पण समाजविषयक शास्त्रांनी समाजविषयक ज्ञान अधिक पद्धतशीर, तुलनात्मक व उपयुक्त केलें आहे. त्यांनी गतकालाचा अभ्यास करून भिन्नभिन्न समाज, त्यांची वाढ, त्यांचे उद्देश

आणि त्यांची रचना ह्याविषयीं सूक्ष्म माहिती संगृहीत केलेली आहे आणि त्याबरोबरच मनुष्याचें जीवित चांगलें आणि सुखी करण्याच्या उद्देशाने भविष्यकालीं मार्गदर्शक होणाऱ्या उपयुक्त सूचनाही केलेल्या आहेत. मनुष्य हा निसर्गतः आणि तत्त्वतः समाजपर आहे. तेव्हा समाजविषयक शास्त्रांत समूहाचा एक घटक ह्या नात्याने मनुष्याच्या हालचालींचा व आचारविचारांचा ऊहापोह केलेला असतो.

**शास्त्र** म्हणजे एखाद्या विशिष्ट विषयाचें अनुभवसिद्ध, प्रयोगसिद्ध व बुद्धिगम्य सांगोपांग ज्ञान. जगांतील सर्व स्थावरजंगमात्मक वस्तूंचें, सर्व व्यवहारांचें, घटनांचें व व्यापारांचें, त्यांच्यामधील साम्यांच्या व भेदांच्या आधारें, यथायोग्य वर्गीकरण, वर्णन, परीक्षण, तुलना व अर्थविवरण करून, त्या त्या विशिष्ट वर्गाच्या गुणधर्मांचें, व्यापारांचें, वैशिष्ट्याचें, संबंधाचें, स्वरूपाचें व उपयुक्ततेचें व्यवस्थित ज्ञान करून देणें, हा शास्त्राचा मुख्य उद्देश आहे. शास्त्र हें वस्तुस्थिति काय आहे, एवढेंच पाहतें व दाखवितें. त्यांतील घटना चांगल्या आहेत का वाईट आहेत हें पाहत नाही. तें एकाद्या विषयाची उपपत्ति, स्वरूप व कार्यकरण यांचा शोध व विवेचन करतें.

**तत्त्वज्ञान** हें सर्व वस्तूंच्या व घटनांच्या मुळाशीं असलेल्या अंतिम सत्याचा शोध करतें. त्यांची उत्पत्ति, स्थिति, गति व अंत यांचा ऊहापोह करून त्यांची खरी योग्यता, स्थान व महत्त्व यांचा तरतमभाव व इष्टानिष्टता ठरवितें. पदार्थांच्या, सृष्टशक्तींच्या व प्राण्यांच्या विशिष्ट घटना व व्यापार हीं ज्या अंतिम सत्यांत व वस्तूंत समाविष्ट झालीं आहेत त्यांच्या दृष्टीने त्या त्या विशिष्ट गोष्टींचें निरीक्षण करावयाचा व मूल्य ठरविण्याचा तें प्रयत्न करतें.

शास्त्राचे अभ्यासाच्या सोयीसाठी दोन मुख्य विभाग केलेले आहेत. एक भौतिकशास्त्रांचा व दुसरा सामाजिक शास्त्रांचा. भौतिकशास्त्रांचें ज्ञान प्रयोगसिद्ध व बुद्धिगम्य आहे व त्यांचे नियम हे निश्चित स्वरूपाचे आहेत. उदाहरणार्थ, गुरुत्वाकर्षणाचा नियम. हा निश्चित आहे. त्यामध्यें बदल होत नाही व तो निरंतर अनुभवाला येतो. भौतिकशास्त्रांतील वर्ण्य पदार्थांचे अंतर्भूत गुणधर्म व व्यापार हे ठरीव असतात. पण सामाजिक

शास्त्रांचें स्वरूप याहून निराळें आहे. त्यांचें ज्ञान अनुभवाच्या व विवेकाच्या आधारावर बसविलेलें असलें तरी तें सुलभ रीतीने प्रयोगसिद्ध होणारें नसतें. या शास्त्राचे वर्ण्य विषय मनुष्य, त्याचें सामुदायिक जीवन व त्याचे अनेकविध व्यवहार हे आहेत. मनुष्य हा अनेक वृत्तींचा बनलेला आहे. तो कधी गतानुगतिक, कधी स्थितिगतिप्रिय, कधी उच्च व वाढत्या आकांक्षांनी प्रेरित होणारा तर कधी विविध विकारांना वश होणारा असा चंचल व अनिश्चित स्वभावाचा प्राणी आहे. त्याचे गुणधर्म व मनोव्यापार, त्याचे सामाजिक व्यवहार व वर्तन हीं नुसतीं बुद्धिगम्य व स्थिर प्रकारचीं नाहीत. त्याच्या गतकालांत झालेल्या क्रिया व सांप्रत चालू असलेले व्यवहार, त्याने स्थापिलेल्या संस्था व रूढ केलेल्या समजुती आणि रीतीभाती, ह्यांच्या परीक्षणावरून त्याच्या पूर्ण व परिणत स्वभावाची निश्चित ओळख होत नाही. त्याची प्रेरक शक्ति व बुद्धि, त्याचे विचार व विकार, त्याचे भाव व आकांक्षा ह्यांचें क्षेत्र व सामर्थ्य अवाढव्य व अपरिमित असून, तें इतिहासाला, मानसशास्त्राला व तत्त्वज्ञानाला अजून पूर्णपणें अवगत झालेलें नाही. त्याचप्रमाणें त्याच्या सामुदायिक जीवनाचें स्वरूपही अवाढव्य आहे. तेव्हा त्यासंबंधीं केलेलीं अनुमानें व सिद्धांत अनेक आहेत, आणि मिळालेले अनुभव विविध आहेत. अर्थात् त्याच्या अभ्यासाने रचलेलीं मानसिक व सामाजिक शास्त्रेंही आज निश्चित स्वरूपाचीं व ठराविक पद्धतीचीं होऊं शकत नाहीत व त्यांनी दर्शविलेले सिद्धांत व नियम हे पुष्कळ अंशीं चालू प्रसंगास अनुसरणारे विशिष्ट परिस्थितीस लागू पडणारे व तात्पुरते असतात. त्यांना अबाधित व बंधक स्वरूप देतां येत नाही. अमका मनुष्य अथवा समाज अमक्या प्रसंगीं व परिस्थितीमध्यें अमक्या प्रकारें वागला किंवा अमक्या प्रकारें त्याने वागणें योग्य होतें, हें समाजशास्त्र सांगेल पण पुन्हा तो तशाच वेळीं तशाच प्रकारें वागेल किंवा वागण्याच्या संभव आहे हें समाजशास्त्र निश्चितपणें सांगूं शकणार नाही. मनुष्याचे व्यापार अगणित व अनेकविध आहेत. मनुष्यामनुष्यांमध्यें शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक दृष्टीने बरेंचसें मूलतः व अंतिमतः साम्य असलें तरी, इतर दृष्टीने त्याची प्रकृति, प्रसंगाशीं व परिस्थितीशीं झगडतांना, बराचसा भिन्नपणा दाखविते. मनुष्याची प्रकृति

अनेकरूपी व अनेकांगी आहे. प्रत्येक मनुष्याचें शरीर व मन आणि त्यांचें सामर्थ्य हीं स्वभावतःच सारखीं नसतात. त्यामुळें मनुष्याच्या वर्तनव्यवहारासंबंधाने एकच धोरण व एकच नीति बांधतां येत नाही.

यावरून असें अनुमान काढतां येतें की स्थल, काल, कार्य व समाज यांची भिन्नता लक्षांत घेतली असतां विशिष्ट नीतिनियम हे सर्वस्वीं बंधनकारक व प्रमाणभूत होऊं शकत नाहीत. त्यांची योग्यता व प्रमाणत्व ठरवितांना स्थल, काल, कार्य, परंपरा, प्राप्तव्य व समाज यांचा विचार केला पाहिजे. मनुष्याच्या अंतःस्फूर्तीचा, अंतर्विकासाचा व प्रगतीचा बराच मोठा अंश अशा नियमांमध्यें समाविष्ट झालेला असतो हें खरें. तथापि नैतिक भावना व कल्पना त्या त्या काळाच्या व स्थळाच्या सामाजिक अवस्थेला पोषक, हितकारक व सुखदायक झाल्या पाहिजेत. नीतिनियमांवर वैयक्तिक स्वातंत्र्याचा व सामाजिक अनुभवाचा परिणाम होतो. त्यामुळें त्यांना सार्वत्रिक व सार्वकालिक स्वरूप प्राप्त होत नाही. ऐतिहासिक दृष्टीने पाहिलें तर कोणतीही एक नीति सर्वमान्य व सार्वत्रिक असणारी सापडत नाही. तात्त्विक दृष्ट्या सुसंस्कृत मनुष्याच्या व सत्पुरुषाच्या स्वभावाचीं, गुणधर्माचीं आणि कर्तव्याकर्तव्याचीं लक्षणें जरी एक प्रकारचीं असलीं तरी या वैचित्र्यपूर्ण व प्रगतिनिष्ठ जगांत त्यांना अनेकत्व प्राप्त होतें.

**सामाजिक शास्त्रें** हीं सामाजिक घटना आणि समाजविषयक सिद्धांत ह्यांचा आणि त्यांच्या परस्पर संबंधाचा, तसेंच त्यांची उत्पत्ति, वाढ, रचना आणि परस्पर संबंध ह्यांमध्यें दिसून येणाऱ्या प्रवृत्ति ह्यांचा विचार करतात. **सामाजिक तत्त्वज्ञान** हें त्याच्या पलीकडे जाऊन व मानव जातीचें ऐक्य कल्पून, मानवी जीवनाच्या विशिष्ट अंगांचें महत्त्व व योग्यता ठरवावयाचा प्रयत्न करतें. त्याबरोबरच त्यांचा हेतु व ध्येय यांचा अभ्यास करतें आणि तो करण्यासाठी निरनिराळ्या सामाजिक शास्त्रांनी अभ्यासाने निश्चित केलेले सिद्धांत तें विचारांत घेतें. नुसत्या सामाजिक घटनांची माहिती मिळविणें, त्यांचें वर्गीकरण व वर्णन करणें, त्यांचें कार्य व कारण शोधणें हा त्याचा विचारविषय नसून सामाजिक शास्त्रांचा तो प्रांत आहे. समाजशास्त्रांनी वर्णिलेल्या व विवरिलेल्या घटना मान्य करून

त्यांचें खरें रहस्य व महत्त्व ठरवावयाचा व त्यांचा खरा अर्थ लावावयाचा तें प्रयत्न करतें.

सामाजिक अथवा समाजविषयक शास्त्रें अनेक आहेत. त्यांपैकी प्रत्येंकाचें क्षेत्र हें मनुष्याच्या पुरुषार्थाला व त्या त्या सामाजिक अंगाला अनुसरून ठरविलेलें आहे. पण त्या प्रत्येक शास्त्राचा इतर शास्त्रांशीं निकट संबंध येतो. कारण असें की त्यांचे विचारविषय जे मनुष्य व समाज ते सर्व प्रकारच्या गुणधर्मांनी परिप्लुत व मिश्रित आहेत. त्या शास्त्रांच्या स्वरूपांत व विविध अंगांत स्फूर्तीचें ऐक्य व अन्योन्याश्रयत्व आहे. पण विषयप्रतिपादनाच्या सोयीसाठी हीं शास्त्रें पृथक्पणें अभ्यासावीं लागतात. धर्मशास्त्र (Science of religion), अर्थशास्त्र (Economics), राज्यशास्त्र (Politics), नीतिशास्त्र (Ethics), न्यायशास्त्र (Equity), विधिनिर्बंधशास्त्र (Jurisprudence), व्यवहारशास्त्र (Common Law or legal science) आणि समाजशास्त्र (Sociology), हीं मनुष्याच्या सामुदायिक जीवनाचा विचार करणारीं शास्त्रें होत. आणि मानसशास्त्र (Psychology), शिक्षणशास्त्र (Pedagogy) व अध्यात्मशास्त्र, हीं त्याच्या वैयक्तिक जीवनाचा विचार करणारीं शास्त्रें होत. या सर्व शास्त्रांच्या अभ्यासाने मनुष्याच्या सर्वांगीण प्रकृतीचें व व्यवहाराचें ज्ञान होतें. या शास्त्रांचा तर्कशुद्ध पाया रचणें व त्याचें क्षेत्र व मर्यादा ठरविणें हीं फार महत्त्वाचीं कामें आहेत.

आज नाना मतांचा गलबला झाला आहे. अशा स्थितींत शास्त्रें हीं मार्गदर्शक होतात व अज्ञानमूलक समजुतींचा नाश करतात. सामान्य लोकांचीं मतें सुसंबद्ध, खोल व तर्कशुद्ध नसतात. सन्मान्य लोकांचीं व साधुसंतांचीं वचनें भिन्न असूं शकतात आणि तज्ज्ञांच्या विधानांमध्यें सुद्धा पुष्कळ प्रसंगीं एकवाक्यता आढळत नाही. तेव्हा या सर्व विविध व विचित्र मतांचा सांगोपांग विचार करणारें व सर्वमान्य पद्धतीने अवलोकन करणारें शास्त्र हें आवश्यक व उपयोगी आहे. त्याच्या योगें आपणास पुरुषार्थ, कर्तव्य, ध्येय, सुख दुःख, कार्य अकार्य, यांचें निश्चित व सुसंगत ज्ञान होण्यास मदत होते. तें आपल्यास, विवेकबुद्धीचा विकास करण्यास, आपली अंतःकरणशुद्धि करण्यास व आपल्याला बहुश्रुतपणा

आणण्यास मदत करतें आणि त्याबरोबरच स्वार्थ व परार्थ, श्रेष्ठाचरण व खरें हित इत्यादिकांचा मार्ग दाखवितें.

**समाजविषयक शास्त्रें** हीं समाजविषयक ज्ञानाला सुसंगति व निश्चितता आणतात आणि त्याचें निःपक्षपाताने, निर्विकार मनाने, साधक बाधक व यथासांग विवेचन करतात. तेव्हा त्यांच्या मर्यादा, क्षेत्र व उद्देश हीं आपणास ठरविलीं पाहिजेत. तसें केल्याने आपल्या समाजाविषयीं अनेक प्रधान व गौण सिद्धांत व समजुती यांचें ज्ञान होण्यास मदत होईल. शिवाय, प्रत्येक शास्त्राचें अंग व क्षेत्र हीं अलग असल्यामुळें आपणास समाजाच्या भिन्न अंगांच्या व पुरुषार्थाच्या दृष्टीने त्या प्रत्येकाने शोधलेल्या ज्ञानाचा एकमेकाशीं मेळ बसवून उपयोग करून घेतां येईल.

आज आपल्याला अनेक समाजांच्या राहणीची व संस्थांची, त्यांच्या रचनेची व उद्देशाची माहिती झाली आहे. आपल्या स्वतःच्या समाजव्यवस्थेचा उणेपणा आपणास दिसून येत आहे. तेव्हा आपल्या नवीन गरजा व वाढत्या आकांक्षा यांना अनुसरून आपलें सामाजिक जीवन उत्तम होण्यास कोणती समाजरचना, कोणती लोकनीति व कोणतीं सामाजिक ध्येयें अधिक अनुकूल व उपयोगी होतील हें पाहणें आपलें कर्तव्य आहे. त्याकरतां आपल्या समाजाची पाहणी करणें, आपल्या सामाजिक संस्थांचें, नीतीचें व एकंदर समाजव्यवस्थेचें परीक्षण करणें हें आपणास आवश्यक आहे.

समाजशास्त्रांचा अभ्यास करतांना ज्या गोष्टींचा अभ्यास करावा लागतो त्या स्थायी स्वरूपाच्या नसतात. त्यामुळें त्यावरून रचलेलीं अनुमानें प्रमाण स्वरूपाचीं असत नाहीत. त्या गोष्टी म्हटल्या म्हणजे मनुष्य ज्या स्थलीं रहातो, ज्या परंपरेंत वाढतो व जें कार्य करीत असतो त्या होत. प्रत्येक स्थलाची भौगोलिक रचना, त्यांतील हवापाणी, त्यांतील भूमीचे गुणदोष व साधनसंपत्ति हीं भिन्न असतात आणि त्यांचा परिणाम मनुष्याच्या सर्व व्यवहारांवर, कृत्यांवर व समाजरचनेवर होतो व त्यामुळें तीं सर्व विविध प्रकारचीं होतात. स्थलाच्या वैचित्र्यामुळें व त्यांतील विशिष्ट साधनसामग्रीमुळें मनुष्याची कार्यक्षमता कमी अधिक

होते व त्याच्या कर्तृत्वाला कमी अधिक वाव मिळतो. भूमीवाचून मनुष्यजीवन चालणें शक्य नाही आणि त्याच्या कर्तृत्वाला क्षेत्र नाही. त्याच्या स्वभावावर, बौद्धिक व सामाजिक वाढीवर स्थलाचा परिणाम होतो. त्याची कार्यदृष्टि स्थलाच्या नैसर्गिक शक्तीनुसार वळण घेते.

निरनिराळ्या प्रकारचीं माणसें एकत्र अथवा सन्निध राहूं लागलीं तर त्यांना स्थलप्रभावामुळें एक प्रकारचें वळण मिळून तीं कांही अंशीं स्वभावाने, दृष्टीने, कार्यक्षमतेने सारखीं बनत जातात व त्यांचें त्या स्थलीं सख्य व सहकार्य वाढतें.

त्याचप्रमाणें परंपरेच्या व कार्याच्या भिन्नत्वामुळें मनुष्याचे स्वभाव, दृष्टि, आचार व व्यवहार बदलतात, आणि त्याच्या समाजरचनेचे प्रकार निरनिराळे होतात. परंपरेमुळें नैतिक दृष्टीमध्यें, समाजस्वभावामध्यें व व्यवहारनियमामध्यें फरक पडतो. कार्यामुळें स्वभावगुणामध्यें, अवलोकनामध्यें आणि आचारामध्यें फरक पडतो.

तर्कशास्त्राला अनुसरून समाजविषयक शास्त्रांच्या दोन अभ्यासपद्धति आहेत. तर्कशास्त्र हें दोन प्रकाराने अनुमानें रचतें. एक अनुमान अनुभवसिद्ध अथवा प्रयोगसिद्ध असतें. दुसरें अनुमान स्वयंसिद्ध तत्त्वापासून अथवा अनुभवसिद्ध तत्त्वापासून तर्कपद्धतीने काढलेलें असतें. कांही शास्त्रांत अनुभवानुसारी अनुमानपद्धति उपयोगी पडते. समाजविषयक शास्त्रांमध्यें ह्या दोन्ही पद्धतींचा उपयोग करावा लागतो. एक पद्धत आपल्या घटक पदार्थासंबंधीं घडणाऱ्या गोष्टींचें व क्रियांचें अवलोकन करते, त्याबद्दलच्या अनुभवाचें परीक्षण करते व त्यांच्या साहाय्याने कांही अनुमानें काढते व कांही नियम व विधानें बसविते. दुसरी पद्धत कांही तात्त्विक सिद्धान्त मूलतः ग्राह्य धरते व त्यास अनुसरून आपले नियम बांधते. मानसिक व सामाजिक शास्त्रांच्या दृष्टीने पहिली अवलोकनात्मक व अनुभवात्मक पद्धति अधिक उपयोगी व खात्रीची धरली जाते. सामाजिक संघटना व व्यवहार हीं बहुश: मनुष्याच्या मनोव्यापारांवर अवलंबून असतात. तेव्हा त्याच्या अभ्यासावरून बसविलेल्या अनुमानाने त्या संघटनांचे व व्यवहारांचे प्रकार, त्यांची उत्पत्ति, वाढ व परिणति हीं ठरवावीं लागतात. ते मनोव्यापार कांही उपजत व कांही

परंपरेनें व परिस्थितीने तयार झालेले असतात. त्यामुळें ते समजण्यास मानसशास्त्राचें व इतिहासाचें अध्ययन करावें लागतें. निरनिराळ्या बाल व प्रौढ समाजांचें तुलनात्मक परीक्षण करणें व तें काल, स्थल व कार्य यांला अनुसरून करणें ह्यांचा उपयोग ह्या पद्धतीला चांगला होतो. दुसरी पद्धत स्वयंसिद्ध तात्त्विक कल्पनांवर बसविली असल्यामुळें ती कमी महत्वाची व कमी विश्वासयोग्य धरली जाते. कारण तिचा आधार ज्या कांही मूल कल्पनांवर आहे त्यांच्याच खरेपणाबद्दल शास्त्रकारांत एक मत नाही. शास्त्राची कोणतीही अभ्यासपद्धति तर्कशुद्ध शोधनाची व निर्विकार अवलोकनाची पाहिजे.

कोणत्याही सामाजिक शास्त्राचा अभ्यास करतांनात्याचा मुख्य विचारविषय आणि त्याचें मुख्य अंग, क्षेत्र व लक्षण यांचें प्रथम विवरण केलें पाहिजे. नंतर त्याचा उद्देश व उपयोग हे पाहिले पाहिजेत. आणि त्यानंतर त्याची ऐतिहासिक दृष्टया उपपत्ति, स्थलकालात्मक निरनिराळ्या अवस्था व स्वरूपें आणि सध्याची परिणति हीं पाहिलीं पाहिजेत.

**समाजशास्त्राला** (Sociology) समाजनिविष्ट मनुष्याच्या स्थितीचा अभ्यास सर्व अंगांनी साकल्याने करावयाचा असतो. सामाजिक घटनांचें व व्यवहारांचें तें सर्वसामान्य शास्त्र आहे. त्यांत मनुष्यांच्या समूहात्मक घटनांचा आणि सहवासी व सहकारी जीवनाचा विचार यथासांग होतो. मानवी समूहांचें मूळ, त्यांचे निरनिराळे प्रकार, त्यांच्यांतील निर्बंध, रूढी, चालीरीती, संस्था, समजुती, भाषा, भावना व पंथ ह्या सर्वांचा त्यांत विचार होतो. सामाजिक जीवनाविषयींचें सर्व ज्ञान समाजशास्त्राच्या क्षेत्रांत येतें व ह्या व्यापक अर्थानें धर्मशास्त्र, राज्यशास्त्र, नागरिकशास्त्र, अर्थशास्त्र, निर्बंधशास्त्र इत्यादि शास्त्रें स्थूल मानाने त्याच्या कक्षेंत येतात. आणि ह्या पृथक् शास्त्रांनी विशेष रूपाने अभ्यासलेले विषय जमेस धरून, समाजविषयक सर्व घटनांचा व व्यवहारांचा विचार साकल्याने व सामान्य रूपाने समाजशास्त्र हें करतें. तें नुसत्या विशिष्ट भागांचा अथवा अवशिष्ट भागांचा विचार करीत नाही. समाजाचे सामान्य नियम, मूलभूत तत्त्वें व लक्षणें काय आहेत हें तें पहातें.

**लोकनीतिशास्त्र** हें एक सामाजिक शास्त्र आहे. त्याचा संबंध

इतर सामाजिक शास्त्रांशीं निकट आहे. त्याचा विचारविषय म्हटला म्हणजे एके ठिकाणीं राहणाऱ्या मनुष्यांचा सहवास, व्यवहार व जीवन हीं सर्व प्रकारें उत्तम कशीं होतील हा होय. उत्तम शेजारधर्म व प्रजाधर्म कोणता, एकत्र कसें रहावयाचें, सामुदायिक जीवन कसें घालवावयाचें, इतर लोकसमूहांशीं कसें वागावयाचें इत्यादि प्रश्न हे लोकनीतिशास्त्राच्या कक्षेंत येतात. तेव्हा लोकनीतिशास्त्राच्या दृष्टीने मनुष्यापुढचा मोठा प्रश्न म्हणजे सुखाने व प्रेमाने मोठमोठ्या लोकसमूहांनी एकत्र सहवास व सहकार कसा करावयाचा हा आहे.

**इतिहास** हा समाजविषयक शास्त्रांला समाजांचीं निरनिराळीं स्वरूपें, संघटना व उद्देश, त्यांच्या हालचालीमुळें व विचारसरणीमुळें त्यांना आलेलें यश किंवा अपयश, ह्या गोष्टींची माहिती पुरवितो. इतिहासावाचून त्या गोष्टींचें ज्ञान होणें दुर्घट आहे, आणि गतकालांतील यशापयशामुळें, सुखसंकटांमुळें प्राप्त झालेला अनुभव व मिळालेला बोध समजणार नाही. मनुष्याच्या जीवनाबद्दलच्या अनेक कल्पनांचीं मुळें भूतकाळांत खोल गेलेलीं आहेत. त्या अनेक जीवनक्रमांच्या कल्पनांची फलश्रुति आणि प्रत्यक्ष घडलेल्या प्रकारांची वास्तविक माहिती ही इतिहासांतच साठविलेली आढळते. इतिहासाचा योग्य अभ्यास करून त्याने शिकविलेल्या धड्यांचें व सुचविलेल्या बोधांचें परीक्षण केलें पाहिजे व त्यांवरून चांगल्या जीविताचीं मूलभूत लक्षणें व नियम शोधून काढले पाहिजेत. मागील अनुभवाचें परीक्षण केल्यानें सम्यक्ज्ञानाचीं गमकें उपलब्ध होतात. तरी पण ऐतिहासिक अनुभव व ज्ञान यांचें महत्व मर्यादित आहे, कारण इतिहास हा गतकालांत मनुष्यें कशीं वागलीं एवढेंच सांगतो. इतिहासाने दिलेले धडे व सूचना ह्या सर्व कालीं, सर्व स्थलीं, सर्व लोकांसाठी, नवीन परिस्थितीमध्यें आणि पालटलेल्या ध्येयदृष्टीमध्यें अचूक मार्गदर्शक होणें शक्य नाही.

सामाजिक जीवनाचीं सर्व अंगें स्थलकालानुसार पालटतात व वाढतात आणि त्यांचीं लक्षणें स्थलकालाच्या नानाविध मर्यादांनी व बंधनांनी नियमित व निश्चित होतात. तीं सर्व इतिहासांत नमूद असतात. इतिहासाचा मुख्य बोध म्हटला म्हणजे एकाच प्रकारचीं ध्येयें, घटना व

हालचाली हीं सर्वकालीं व सर्व स्थलीं अनुसरलीं जात नाहीत व उपयोगी पडत नाहीत हा होय.

संरक्षण, शांतता, सुव्यवस्था व सुराज्य ह्यांच्या संबंधींचे नियम आणि त्यांना आवश्यक परिस्थिति शोधून काढण्याचा प्रयत्न **राजनीतिशास्त्र** करतें. मानवी जीविताच्या अनेक अंगांपैकी एका राजकीय अंगाचें व त्यांतील संस्था, संघटना, अधिकार, कर्तव्यें व सत्तास्वातंत्र्य ह्यांचें विवेचन त्या शास्त्रांत केलेलें असतें. तें राज्यसंस्थेची उत्पत्ति व आवश्यकता, तिचीं मूलतत्त्वें व व्यवहार, तिच्या सारभूत गोष्टी व लक्षणें, ह्यांचें योग्य परीक्षण करून तिचें ध्येय, तिच्या क्षेत्रमर्यादा, तिचीं कार्यें आणि तिची रचना ठरवितें.

बाहेरील संकटें व परचक्र यांपासून आणि आंतील विप्लव व क्रांति यापासून समाजाचें जीवित, स्वातंत्र्य, धर्म व वित्त यांचें संरक्षण व संगोपन करावयाचें हें राज्यसंस्थेचें मुख्य कार्य आहे. राजनीतिशास्त्र हें जर राज्यसंस्था व राज्यतंत्र ह्याचा विचार करतें, तर नागरिकनीतिशास्त्र हें राज्यसंस्थेचा घटक जो 'नागरिक' त्याचे अधिकार व कर्तव्यें, व त्याची सत्ता व स्वातंत्र्य, त्याचें नैतिक आचरण व व्यवहार ह्यांचा विचार करतें. मनुष्याच्या जीवनाच्या मानवी व सामाजिक अंगांशीं, भोवतालच्या परिस्थितीशीं व गुणदोषस्थानांशीं त्या शास्त्राचा संबंध येतो. श्रेष्ठ नैतिक व व्यावहारिक जीवनाला आवश्यक अशी बाह्य पालनपोषणात्मक परिस्थिति प्रस्थापित करणें हा राज्यसंस्थेचा उद्देश आहे, आणि त्या जीवनाला लागणारे नीतिनियम यांचें पालन करणें हें नागरिकाचें कर्तव्य आहे.

मनुष्याच्या शारीरिक जीवनाला आवश्यक असणाऱ्या भौतिक साधनांच्या व संपत्तीच्या स्वरूपाचा आणि ज्या नियमांनुसारत्यांचें उत्पादन, पुरवठा व वांटणी, विनिमय, व्यय व उपभोग होतो त्या नियमांचा राष्ट्रीय दृष्टीने विचार **अर्थशास्त्र** करतें. त्या विचाराला देशाच्या भौगोलिक परिस्थितीमुळें व लोकांच्या मानसिक स्वभावामुळें व शारीरिक शक्तीमुळें वळण मिळतें भौतिक संपत्तीचीं साधनें नागरिकनीतीने सुसंघटित झालेल्या लोकांच्या जीवनस्वास्थ्य साधणाऱ्या संस्थांवर व कल्पनांवर अवलंबून असतात. उलट समाधानकारक भौतिक जीवनावाचून वरच्या प्रतीचें नैतिक व आध्यात्मिक जीवन

शक्य नाही. श्रेष्ठ प्रतीच्या सामाजिक आणि नागरिक जीवनाचा विचार करतांना आयुष्याच्या भौतिक आवश्यकतांचा व आर्थिक समाधानाचा विचार करावा लागतो. त्यामुळें अर्थशास्त्राचा नागरिकशास्त्राशीं निकट संबंध येतो.

**निबंधशास्त्र** हें राजसत्तेने घालून दिलेल्या व मान्य केलेल्या दंडयुक्त निबंधांचा (कायद्यांचा) विचार करतें. दंडनीतिदृष्ट्या निबंधाचा उद्देश नियमन व शासन हीं आहेत. नीतिशास्त्रदृष्ट्या निबंधाचा आधार न्याय व नीति हीं आहेत. विधिनिषेधदृष्टया निबंध म्हणजे राजसत्तेची आज्ञा आहे. न्यायाचा व न्याय्य नियमांचा प्रश्न हा मुख्यत: शास्त्रापेक्षा तत्त्वज्ञानाचा प्रश्न आहे. समाजाच्या श्रेष्ठ जीवनक्रमासाठी केलेल्या निबंधांची प्रमाणभूतता लोकनीतिशास्त्र मान्य करतें पण न्यायत: प्रस्थापित झालेल्या राज्यसंस्थेच्या आज्ञा व शासनें पालन करण्याचें कर्तव्य मान्य करून सुद्धा, तें समाजाला पीडादायक व घातक अशा निबंधांना विरोध करण्याचा नागरिकाचा अधिकार मान्य करतें. निबंधशास्त्रांत सुराज्यव्यवस्थेच्या नैबंधिक किंवा नियमनात्मक स्वरूपावर भर दिलेला असतो, तर नागरिकनीतिशास्त्रांत नागरिकाच्या नैबंधिक व नैतिक आवश्यकतेच्या दृष्टीने सुव्यवस्था व प्रगति ह्यांचें महत्त्व ठरविलेलें असतें.

मनुष्यांमध्यें परमेश्वराची जाणीव व ओळख उत्पन्न करणें आणि त्यांचा परमार्थाशीं योग्य संबंध जोडून देणें हा **धर्मशास्त्राचा** पवित्र उद्देश आहे. त्यास अनुसरून तें मनुष्याच्या सदाचरणाचे नियम ठरवितें. मनुष्याचा सामान्यत: मनुष्यजातीशीं आणि विशेषत: त्याच्या शेजाऱ्यांशीं प्रेमाचा व ऐक्याचा संबंध जोडून देणें हा लोकनीतिशास्त्राचा उद्देश आहे. त्यास अनुसरून तें त्याच्या योग्य वर्तनाचे व व्यवहाराचे नियम ठरवितें. तें मनुष्या-मनुष्यांचा आणि मनुष्य व त्याची परिस्थिति ह्यांचा एकमेकांशीं येणारा संबंध आणि त्यांचा एकमेकांवर होणारा परिणाम हे विचारांत घेतें. हा परस्पर संबंध व परिणाम म्हणजेच मनुष्याचें सामाजिक व परिस्थितिनिबद्ध जीवन होय.

मनाचें अस्तित्व हें मनुष्याचें मुख्य लक्षण आहे. मन हेंच मनुष्यांच्या बंधमोक्षाचें, रागलोभाचें व आसक्तिप्रेमाचें कारण आहे. **मानसशास्त्र** हें वैयक्तिक व सामाजिक आचारव्यवहारांच्या रूपानें

व्यक्त होणाऱ्या मानसिक प्रवृत्तींचा, शक्तींचा, क्रियांचा व व्यापारांचा विचार करतें. त्यामध्यें नुसत्या बुद्धीचाच नाही तर उपजत भावना व गुण, सवयी व स्वभाव, ह्यांचाही विचार केलेला असतो. त्या शास्त्राच्या अभ्यासानें एकंदर जीवनाला व तसेंच सदाचारी जीवनाला वळण लावणाऱ्या हेतूंचें आणि शक्तींचें आपल्याला ज्ञान व्हावयाला साहाय्य होतें, आणि नागरिकनीतिशास्त्र हें आपल्या क्षेत्रांत ह्या ज्ञानाचा उपयोग करून घेतें.

मनुष्य हा प्रगतिशील व सुधारणाग्राहक प्राणी आहे ही गोष्ट **शिक्षणशास्त्र** गृहीत धरतें. अंशतः आपल्या स्वतःच्या आंतरिक प्रेरणेने आणि अंशतः इतरांच्या मार्गदर्शनाने तो समाजांतील एक जबाबदार गृहस्थ बनूं शकतो आणि त्यायोगें समाजांतील स्वेच्छाप्राप्त व नियमित कार्यें पार पाडणारा व सुखाची वृद्धि करणारा समाजाचा एक कार्यक्षम घटक होतो. शिक्षणशास्त्र हें वळण लावणारें व मार्गदर्शक शास्त्र आहे. शिक्षण हें नकळत सहज मार्गानें अथवा बुद्धिपूर्वक प्रयत्नानें प्राप्त होतें. मनुष्याचे भोवतालच्या वस्तूंशीं जे संबंध येतात त्यांच्या मनावर होणाऱ्या संस्कारांमुळें आणि शिक्षकाच्या साहाय्यानें बुद्धिपुरस्सर संपादन केलेल्या संस्कृतीमुळें त्याला प्रगल्भता प्राप्त होते. अशा रीतीनें मनुष्य हा स्वतःच्या व समाजाच्या कल्याणासाठी प्रसंगानुरूप साहस अथवा संयम करावयास शिकतो.

**नीतिशास्त्र** (Ethics) हें सदाचारी व सद्‌गुणी जीवनाच्या उद्देशांचें आणि साध्यांचें विवेचन करतें. आणि तात्विक दृष्टीने त्यांचें ध्येय, महत्व व उपयुक्तता ठरवितें. लोकनीतिशास्त्र हें व्यावहारिक दृष्ट्या सुदृढ व उज्ज्वल समाज निर्माण व्हावा, याकरतां नीतिशास्त्रानें प्रतिपादन केलेलीं साध्यें व उद्देश संपादण्याच्या पद्धति व नियम घालून देतें. खरी नीति व सद्वर्तन म्हणजे काय, सुख व सद्‌गुण म्हणजे काय, कर्तव्य व कल्याण म्हणजे काय, इत्यादि कल्पनांचें तात्त्विक दृष्ट्या नीतिशास्त्र परीक्षण करतें. नीतिशास्त्राला जर सदाचारी व सद्‌गुणी जीवनाचें तत्त्वज्ञान म्हटलें तर लोकनीतिशास्त्राला त्याचा व्यवहार व वर्तन म्हणतां येईल.

मानवी संसारांत आनुवंशिकतेच्या तत्त्वाला विशेष महत्त्व आहे. जातिसंस्थेंत त्याला प्राधान्य दिलें आहे. विवाह संस्थेंत त्याला मान आहे. वंशावंशाच्या वर्णविचारांत त्याला विशेष स्थान आहे. सध्या **सुप्रजननशास्त्र**

( Eugenics ) हें उत्तम प्रजा कशी निर्माण होईल आणि रोगी, बुद्धिहीन व बलहीन प्रजा कशी उत्पन्न होणार नाही याचा विचार करतें. त्यामध्यें जातीजातींच्या उत्तम गुणांचा, आनुवंशिकतेचा, विवाह-संस्थांचा, शरीरपोषणाचा, बल व बुद्धि यांच्या वर्धनाचा विशेष विचार केला जातो. त्यायोगें मिळालेल्या ज्ञानाचा, मनुष्य व त्याच्या जाती यांचे गुणधर्म सुधारण्याकडे उपयोग केला जातो. ह्या सुप्रजननशास्त्राला नुसती तात्त्विक दृष्टि नसून त्याला व्यावहारिक दृष्टीही आहे. तें प्रतिबंधात्मक व पोषणात्मक नियम सुचवितें. चांगल्या संततीची उत्पत्ति हीही लोकनीतिशास्त्राची एक आवश्यकता आहे, म्हणून त्याच्या अभ्यासामध्यें जाती व विवाह ह्या संस्थांचा अभ्यास करतांना सुप्रजननशास्त्राला महत्त्वाचें स्थान आहे

याप्रमाणें लोकनीतिशास्त्राचे इतर शास्त्रांशीं निकट संबंध आहेत.

हिंदूंनी दोन शास्त्रांच्या द्वारें समाजधर्माचें विवरण केलें आहे. ह्या विश्वांत मनुष्याचें स्थान कोणतें आणि त्याचें ध्येय काय ह्याचें विवेचन व निर्णय केला आहे. निश्रेयस म्हणजे आत्मिक शांति हें तें ध्येय असून मनुष्य आपल्या आसक्तींतून आणि बंधनांतून मुक्त झाल्याने त्याची प्राप्ति होते. ह्या शास्त्राला पराविद्या अथवा मोक्षशास्त्र म्हणतात. दुसरें जें नीतिशास्त्र त्यांत मनुष्यांच्या सद्वर्तणुकीचे नियम घालून दिले आहेत आणि अंतिम ध्येय साधण्यासाठी परस्परांमध्यें सहकार्य करण्याचा उपदेश करून मनुष्याच्या ऐहिक जीवनाकडे व त्याच्या स्वास्थ्याकडे लक्ष पुरविलें आहे. हें हिंदूंचें नीतिशास्त्र व्यापक आहे. पाश्चात्यांच्या नीतिशास्त्रा (Ethics) प्रमाणें त्याचें क्षेत्र संकुचित नाही. त्यामध्यें मनुष्याच्या ऐहिक जीवनाचा पारलौकिक दृष्टि न सोडतां विचार होतो. त्याचें उद्दिष्ट लोकयात्रा म्हणजे जगाचें कल्याण हें आहे. त्यांतील आचार-व्यवहारांचें मुख्य तत्व मनुष्याचा स्वभाव व स्वधर्म ह्या कल्पनांवर बसविलेलें आहे. एका विशिष्ट स्वभावाच्या व गुणधर्माच्या मनुष्याने तदनुरूप कर्म आचरिलें पाहिजे. एका विशिष्ट अवस्थेंत असतांना त्या संघाने तदनुरूप जीवनक्रम आक्रमिला पाहिजे. अशा रीतीने आचरिलेल्या कर्माने व साधलेल्या

पुरुषार्थाने त्याच्यांत व त्याच्या भोवतालच्या परिस्थितींत सुधारणा होईल आणि ती त्याला आपल्या ध्येयाच्या सन्निध घेऊन जाईल.

प्रत्येक व्यक्ति ही सर्व व्यक्तींनी बनलेल्या समाजाव्यतिरिक्त नाही आणि सर्व व्यक्ति ह्या परमेश्वराधीन आहेत. तेव्हा ह्या समाजशील मनुष्याच्या जीवनक्रमांत, कार्यांत व ध्येयांत गोंधळ व विपरीतपणा उत्पन्न होतां कामा नये. मनुष्याला अज्ञानांतून व दुःखांतून बाहेर निघतां यावें व आपल्या अनुभवाने व प्रयत्नाने श्रेयसाचें शिक्षण संपादतां यावें, आणि अशा रीतीने व्यक्ति व समाज यांची प्रगति व्हावी, असा ह्या शास्त्राचा प्रयत्न आहे. शासित व शास्ते, अधिकारी व जनता ह्यांनी राष्ट्राच्या कल्याणासाठी व मोठेपणासाठी प्रयत्न करण्याचे तें नियम घालून देतें. त्या दोघांनाही कर्तव्यें व मर्यादा, अधिकार व स्वातंत्र्य हीं आहेत, दोघांचे संबंध परस्परपूरक आहेत, अशी शिकवण तें देतें.

हिंदूंनी ह्या नीतिशास्त्राचा विचार धर्मशास्त्र, अर्थशास्त्र व कामशास्त्र ह्या तीन शास्त्रांमधून विभागला आहे, हें मागे पहिल्या प्रकरणांत दिग्दर्शित केलेंच आहे. त्यांचे पृथक् विषय, क्षेत्र, परस्पर संबंध व उद्देश हीं त्यांनी सर्व योग्य रीतीने ठरविलीं आहेत. अशा प्रकारचीं त्यांचीं समाजशास्त्रें आहेत.



## प्रकरण तिसरें

# नागरिक व लोकनीति

लोकनीतिशास्त्राचा उगम ग्रीस देशांतील नगरराज्यांत झाला. प्लेटोने व अरिस्टॉटलने आपल्या ग्रंथांत अनेक नगरांतील सामाजिक व राजकीय घटना आणि संस्था ह्यांचें शास्त्रीय निरीक्षण व वर्गीकरण करण्याला आणि त्यावरून नागरिक लोकनीतीचे सामान्य व विशेष नियम काढावयाला प्रारंभ केला. ह्या ग्रंथांत नगररूपी राज्यसंस्थेंत संघटित झालेल्या समाजाचें साकल्यानें विवेचन केलेलें आहे. त्यांनी राजनीति व लोकनीति, शास्त्र व कला, ह्यांमध्ये भेद न करतां त्यांचा आपल्या ग्रंथांत एकत्रित विचार केला आहे.

त्यामध्यें समाजरचना, नीतिशास्त्र, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, राजशास्त्र, शिक्षणशास्त्र, सुप्रजननशास्त्र, वित्तवाटणी व स्वामित्व, इत्यादि प्रश्नांचा थोडाबहुत विचार केलेला आहे. पण मुख्यतः नगरराज्यांतील प्रगल्भ जीवन, त्याचीं ध्येयें, संघटना व मूलतत्त्वें, त्याची उत्पत्ति, वाढ व नाश, ह्या दृष्टीने त्यांनी अभ्यास केला आहे, आणि नागर लोकनीतिशास्त्राला उत्तेजन दिलें आहे. ग्रीक लोक आपल्या नगरांतील लोकांना पुढारलेले व संस्कृतिसंपन्न समजत, ग्रामवासीयांना ते ग्राम्य लेखीत व व परकीयांना ते हीन संस्कृतीचे, मागासलेले व दास्ययोग्य समजत. ह्या समजुतीनुसार त्यांनी आपल्याला श्रेष्ठ वंशाचे कल्पून आपलें नैतिक व मानसिक श्रेष्ठत्व व आपलें स्वातंत्र्य अबाधित राखण्याच्या इच्छेने आपलें महत्त्व वाढविणारें व आपल्याला मार्गदर्शक होणारें असें नगरराज्यसंस्थेचें व नागरिकांच्या अधिकार-कर्तव्याचें सर्वांगीण शास्त्र निर्माण केलें.

नगरांतील जीवन हेंच ते नागर व प्रगल्भ जीवन समजूं लागले. सामान्य मनुष्याला उत्तम नागरिक बनविणें हेंच त्यांचें ध्येय झालें. उत्तम नागरिकता म्हणजे संस्कृतिसंपन्नता असें ते मानूं लागले. मनुष्यांमध्यें नगरांतील उच्च संस्कार व सभ्यता आणणें हेंच त्याच्या संस्कृतीचें ध्येय व आधार झाला. त्यांच्या दृष्टीने नगर म्हणजे ज्यांत मनुष्याच्या जीवनाचें पूर्णपणें आविष्करण होतें, ज्यांत त्याच्या शक्ती आणि कर्तृत्व पूर्णत्वेनें विकास पावतात व प्रतीत होतात, आणि ज्यांत त्याच्या अनेकांगी स्वभावाला अनुकूल परिस्थिति व स्वातंत्र्य मिळतें, असें सर्वश्रेष्ठ शीलाचें निवासस्थान होय. त्यामध्येंच समाजाची पूर्ण वाढ, व्यक्तीची पूर्ण परिणति, व राज्यसंस्थेची अंतिम सीमा होते. अरिस्टॉटलच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे मनुष्याच्या कल्याणसाधनाची नगरराज्य ही सर्वोच्च संस्था होय. त्यामध्यें सर्व अंगांनी कर्तृत्वशाली, वैभवशाली व सद्गुणी जीवनक्रम चालवावयाला पूर्ण वाव प्रोत्साहन मिळतें. अशा रीतीने कल्पिलेल्या नागरिक आयुष्यक्रमांत किंवा संस्कृतींत आपल्याला तीन प्रधान गोष्टी आढळून येतात. पहिली गोष्ट स्वयंपूर्ण जीविताची, दुसरी सर्वांगीण पराक्रमाची व प्रगतीची, आणि तिसरी अनुकूल परिस्थितीची.

नगरांतील जीवनक्रमाशीं व ध्येयाशीं संस्कृतीच्या कल्पनेची ग्रीकांनी घातलेली ही सांगड आज कालानुसार पालटली आहे. आतां आपल्याला दिसून येतें की मनुष्याच्या ग्रामिक व नागरिक जीवनापेक्षा त्याचें राष्ट्रीय व जागतिक जीवन श्रेष्ठ असून, त्याच्या कर्तृत्वाला, वैभवाला व व्यवसायाला तें अधिक पोषक व प्रोत्साहक आहे. नगर हा आज एक प्रादेशिक व लहान संघ आहे. संस्कृतीची कल्पना आज राष्ट्राच्या विस्तृत जीवनाइतकी व जगाच्या उच्च जीवनाइतकी वाढली आहे. तिचीं रूपें निरनिराळया राष्ट्रांच्या इतिहासास अनुसरून भिन्न आहेत. तीं सर्व आपणास अभ्यासिलीं पाहिजेत. संस्कृतीची प्रेरणा, दृष्टिकोण व रूपें हीं परिस्थिति, परंपरा, प्रकृति, व प्राप्तव्य ह्यांच्या परिणामामुळें निरनिराळीं होतात. तेव्हा संस्कृति ही निरनिराळया कालविभागांतील व्यवस्थित व प्रगतिशील जीवनाचें चित्र अथवा स्वरूप दाखविते. तिचीं स्थायी व चल अशीं दोन स्वरूपें आहेत. ती गतिप्रिय पण स्थितिपोषक आहे.

लोकनीति आणि संस्कृति व सभ्यता यांचा फार निकट संबंध आहे. उच्च लोकनीतीचें रूपांतर उच्च संस्कृति व सभ्यता यामध्यें झालें पाहिजे. संस्कृति ही उत्तम जीवनाची प्रगट स्वरूपें व प्रकार आहे. आणि सभ्यता ही सद्‌गुणी, सुंदर व श्रेयस्कर अशा अंतर्जीवनाची, नीतीची व स्वभावाची साक्ष आहे. प्रत्येक राष्ट्राला एक प्रकारचा इतिहासनिर्मित व देशनिर्मित आत्मा असतो. त्याचे गुण व स्वरूप यामध्यें कालानुक्रमें परिवर्तन होतें, आणि भिन्न परिस्थितींत तो विविध स्वरूपांनी नवीन तेज व नवीन ध्येयें धारण करून प्रगट होतो. राष्ट्रांतील जनतेला सचेतन वृत्ति असते आणि ती धाडसाचीं, शक्तीचीं व उत्साहाचीं नवीं कार्यें करूं शकते. तेव्हा आजची नागरिकत्वाची कल्पना राष्ट्रव्यापक व राष्ट्रपोषक पाहिजे.

प्रत्येक सामान्य मनुष्य हा भूमीच्या व इतर मनुष्यांच्या सान्निध्याने राहतो आणि त्यांच्या सहवासाचा व संगतीचा त्याच्यावर परिणाम होतो. पण उत्तम नागरिक होणें हें त्याच्या देशप्रेमापेक्षा मनुष्यत्वावर अधिक अवलंबून असतें, आणि उत्तम नागरिकता ही आपण ज्या संस्थांचे व समाजाचे घटक आहोंत त्यांच्यामध्यें उत्पन्न होणाऱ्या

व्यवहारांचा व प्रश्नांचा उद्देश व मर्यादा ह्या योग्यपणें समजून समाजशीलतेनें वागण्यावर अवलंबून आहे. उत्तम नागरिकतेचा उद्देश समाजाचें रक्षण, पोषण व वर्धन करणें हा असला पाहिजे. प्रत्येक समाजाच्या कांहीं संस्था, समजुती, परंपरा, चालीरीती व ध्येयें हीं असतातच. त्यांच्या योगें त्या समाजाचें रक्षण, पोषण व वर्धन होत असतें. तेव्हा त्यांचा वेळोवेळीं स्थल, काल व कार्य ह्यांना अनुसरून योग्य अभ्यास करणें हें प्रत्येक विवेकी व्यक्तीला व समजूतदार सुधारकाला आवश्यक आहे. त्या योगें समाजाची सुस्थिति ठेवतां येते व सुधारणा करतां येते.

नागरिकत्वाचीं लक्षणें सर्व देशांत सारखींच असूं शकत नाहींत. स्वतंत्र व परतंत्र देशांतल्या नागरिकांचीं लक्षणें भिन्न असतात. स्वतंत्र राज्यांतील नागरिक हा त्या राज्याचा सन्मान्य घटक असतो. ज्या अधिकारांनी त्याचा देश प्रतिष्ठा पावला असेल, ज्या आकांक्षांनी तो प्रेरित झाला असेल आणि ज्या कल्याणप्रद गोष्टींसाठी तो सुसंघटित झाला असेल त्या सर्वांचा तो नागरिक समभागी असतो. अशा प्राप्त झालेल्या निश्चित अधिकाराबरोबर त्याला निश्चित कर्तव्येंही करावीं लागतात. परतंत्र देशांतील नागरिकांना असे अधिकार व प्रतिष्ठा नसते. त्यांना नेमून दिलेलें विशिष्ट स्थान असतें व सांगितलेलीं कर्तव्यें करावीं लागतात. आजकाल कोणत्याही देशांतील नागरिकत्व वंश, पंथ, भाषा व संस्कृति या कल्पनांवर अवलंबून नसतें. आज नागरिक ह्या शब्दाचें मुख्य लक्षण ' राज्याचा घटक ' हें असून त्यामध्यें प्राप्त झालेले अधिकार व कर्तव्यें हें आहे.

राज्याच्या कारभारांत, शासनांत व मंत्रकार्यांत भाग घ्यावयाचा ज्याला अधिकार आहे तो नागरिक, अशी अरिस्टॉटलची व्याख्या आहे, आणि सामाजिक जीवनांतील सर्व कार्यें साधण्यासाठी पुरेसा होईल असा नागरिकांचा समूह म्हणजे तो राज्य समजे. ज्याला शासन, न्याय व निर्बंध करण्याचा अधिकार मिळूं शकतो व जो तदनुसार शासनानुकूल असतो, त्याला तो नागरिक म्हणतो. त्याच्या मताप्रमाणे समाजाची सुरक्षितता, स्वातंत्र्य, स्वास्थ्य राखणें व संपादणें हा नागरिकत्वाचा उद्देश आहे. प्रत्येक नागरिकाने स्वतंत्र मनुष्याप्रमाणें राज्यकारभार कसा करावा व तसेंच

राज्यशासनाचें पालन कसें करावें हें जाणिलें पाहिजे. अरिस्टॉटलने स्वतंत्र दृष्टीने सर्वोत्कृष्ट व सद्गुणी नागरिक कोण व सापेक्षदृष्टीने राजसत्ताक, अल्पजनसत्ताक व बहुजनसत्ताक अशा विशिष्ट राज्यघटनेंत उत्तम नागरिक कोण हें दाखविलें आहे.

अरिस्टॉटलची नागरिकाची व्याख्या मुख्यतः राजकीय स्वरूपाची व राज्यसंस्थासापेक्ष आहे. पण प्रौढ समाजाला दुसरीं अंगें, आकांक्षा अधिकार व कर्तव्यें यांचें क्षेत्र असतें. राज्यसंस्थेव्यतिरिक्त लोकांचे इतर सामाजिक समूह असतात. ते राज्यसंस्थेच्या कक्षेंत येत नाहींत. ते धार्मिक, आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक कार्यें करीत असतात. त्यामध्यें नागरिकाचें अनेकरूपी जीवन व्यतीत होतें. त्यामध्यें त्याला अधिकार व कर्तव्येंही असतात.

प्राचीन हिंदू ग्रंथकारांनी नागरिकाचीं लक्षणें, तो नुसता राज्यसंस्थेचा एक घटक, एवढ्याच दृष्टीने मांडलेलीं नाहीत. त्यांनी राज्यकर्त्यांचीं म्हणजे राजा, मंत्री व अधिकारी यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. प्रजेला आपलीं धर्मपालनाचीं कर्तव्यें सांगितलीं आहेत. धर्माला व दंडनीतीला अनुसरून असलेली राजाज्ञा पाळणें एवढेंच प्रजेला सांगितलें आहे. त्या धर्मामध्यें व नीतीमध्यें राज्याधिकारी व प्रजा यांचे अधिकार मर्यादित ठेवले आहेत व कर्तव्यें नियमित केलीं आहेत. त्यांच्या मतें धर्म हा मनुष्याचें सर्व जीवित संभाळणारा आहे. राजकीय जीवन हें त्याचें एक अंग आहे. तेव्हां नागरिकत्वाच्या कल्पनेंत त्यांनी धर्मास अनुसरून कर्तव्यपालन व गुणपोषण यांजवर विशेष भर दिला आहे. त्याच्या योगें प्रत्येक मनुष्य हा अनेक व्यवहारांत व कार्यांत उत्तम वागूं शकेल, असा त्यांचा समज आहे. मनुष्य हा सदाचारी व सद्गुणी असला पाहिजे. नुसत्या राज्यसंस्थेच्या दृष्टीने त्याच्या राजकीय सत्तास्वातंत्र्याकडे अथवा अधिकार-कर्तव्याकडे लक्ष पुरविलेलें नाही. त्यांनी नागरिकत्वाचे सर्व व्यवहार व अंगें ह्या दृष्टीने उत्तम अधिकारी व उत्तम नागरिक कोण ह्यांचें वर्णन व गुणविवरण केलें आहे. मानवी जीवनाचीं सर्व अंगें व पुरुषार्थ ह्यांमध्यें सुसंगति उत्पन्न करणें आणि त्यांच्या उच्चनीचतेप्रमाणें त्यांचा क्रम लावणें हा हिंदुनीतीचा विशेष आहे. प्रेयस् व श्रेयस्, अभ्युदय व कल्याण,

धर्म, अर्थ, काम व मोक्ष, ह्यांच्या सुस्थितीवर तिची उभारणी आहे. त्यांच्यामध्यें अंतर्भूत असणारे स्वार्थ, परार्थ व परमार्थ यांचा योग्य समन्वय करणें हा सांसारिक आयुष्याचा ते मुख्य नियम समजतात. ह्यावरून त्यांच्या कल्पनेप्रमाणें जो सर्व सामाजिक हालचालींत व आवश्यक व्यवहारांत योग्य भाग घेतो तो नागरिक असें आपणास अनुमान काढतां येतें. हा भाग तो स्वतःच्या उपयोगाच्या व समाजाच्या सेवेच्या दृष्टीने घेत असतो. त्याकरतां तो समाजाचे नियम पाळतो, त्याचीं कार्यें करतो, त्याच्या हितसंबंधाचें रक्षण करतो, आणि त्याच्या उद्देशप्राप्तीला साहाय्य करतो. सर्व मनुष्यांमध्यें न्याय्य व्यवहार घडावा, त्यांच्या अडीअडचणीमध्यें त्यांची सेवा घडावी आणि त्यांच्या प्रगतीला सहायभूत व्हावें असा नागरिकाचा उदात्त हेतु व कर्तव्य आहे.

उत्तम नागरिकाची आधुनिक कल्पना व्यापक आहे. तो नुसता सुसंघटित व स्वतंत्र राष्ट्राचा राजकीय घटक व त्याच्या निर्बंधांचें पालन करणारा मनुष्य असा समजला जात नाही. तर त्याबरोबर तो त्या राष्ट्रामध्यें असलेली सत्ता, समता व स्वातंत्र्य सर्व प्रकारें भोगणारा, कर्तव्यें पाळणारा, अधिकार जाणणारा, आणि सेवा व साहाय्य करणारा असा एक सभ्य मनुष्य समजला जातो. तो त्या राष्ट्राच्या भौगोलिक सीमेंत जन्म पावतो, तेथील कल्पनांचा व संस्थांचा स्वीकार करतो आणि तेथील अधिवासी होतो. आणि त्याशिवाय आपण स्वतः संस्कृतिसंपन्न होऊन आपल्या राष्ट्राला संस्कृतिसंपन्न करण्याचा प्रयत्न करतो.

उत्तम नागरिक हा निर्बंध पाळणारा असतो, कारण राज्यतंत्र व निर्बंध हीं त्याच्याच पालनपोषणाकरतां असतात व लोकसत्ताक राज्यव्यवस्थेमध्यें तीं त्यानेच निर्मिलेलीं असतात. त्याला राज्यकारभाराची हौस व राजकारणाची माहिती असते, त्याला सार्वजनिक हिताचें ज्ञान व काळजी असते, आणि समाजाच्या संस्कृतीची वाढ आपल्या आचरणाने व प्रोत्साहनाने तो करीत असतो. उत्तम नागरिक हा सर्व व्यवहारामध्यें उत्तम रीतीने वागणारा, श्रम व सेवा करणारा मनुष्य असतो. तो नुसते राजकीय अधिकार भोगणारा मनुष्य नसतो.

प्रत्येक नागरिकाला स्वतःच्या शरीरपोषणाच्या गरजा व मानसिक आकांक्षा ह्या असतात. त्या पुरविण्याचे उद्योग तो आपल्या मतानुसार करीत असतो व ते करीत असतांना इतरांना ते विरोधक न होतां सहाय्यक व्हावे अशी समाजाची अपेक्षा व आवश्यकता असते. याकरितां प्रत्येक नागरिकाला एक प्रकारची सामाजिक दृष्टि व धोरण पाहिजे आणि कांहीं सामाजिक ध्येयें व पद्धति पाहिजेत; त्याची विवेकबुद्धि जागृत पाहिजे. त्यांच्या योगें तो आपल्या रोजच्या कार्यक्रमाचें नियमन करूं शकतो, आणि रोजच्या अडचणी व गुंतागुंतीचे प्रश्न सोडवूं शकतो.

कुटुंब, कुल व जाति, सांप्रदाय, व्यवसाय व विद्यापीठें, राष्ट्र, नगर व ग्राम ह्या संस्थांच्या योगें नागरिकांचें सामाजिक व वैयक्तिक जीवन सुरळीत चालतें. तेव्हा त्या संस्था उत्तम स्थितींत असल्या पाहिजेत. एका दृष्टीने उत्तम नागरिकता ही त्यांच्या सुस्थितीवर अवलंबून असते. ती नुसत्या उत्कट देशभक्तीवर अथवा राजकारणपटुत्वावर अवलंबून नसते. दुसऱ्या दृष्टीने ती नागरिकाच्या अंगीं असलेल्या गुणावर अवलंबून असते. त्याच्या अंगीं समाजाचें खरें व पुरें हित समजण्याची पात्रता पाहिजे. सार्वजनिक हिताकरितां स्वार्थसंयमनाची व स्वार्थसमर्पणाची भावना पाहिजे, आणि सार्वजनिक दृष्टि, उत्साह व भाव पाहिजे. त्यायोगें तो आपल्या बांधवांच्या, शेजाऱ्यांच्या व देशाच्या सेवेमध्यें भाग घेतो व त्यांना साहाय्य करतो. देशाच्या रक्षणाकरतां व स्वातंत्र्याकरतां तो आपलें तनमनधन अर्पण करतो. प्रत्येक नागरिकामध्यें स्वातंत्र्याची व उदारत्वाची प्रखर भावना पाहिजे. त्यावाचून स्वराज्य टिकणें व सामाजिक सहकार्य व सेवा घडणें शक्य नाही.

त्याच प्रमाणें नागरिकामध्यें आळस, स्वार्थ व पक्षपात ह्या वृत्तीचे दोष नसले पाहिजेत. त्या जागीं उत्साह, परोपकार व सार्वजनिक हितबुद्धि असे गुण पाहिजेत. त्यामध्यें नीतिधैर्य असलें पाहिजे. देशावर संकट आलें तर त्याने लढलें पाहिजे. देशांत यादवी व अस्वस्थता माजली तर सुव्यवस्था व शांतता राखण्यास त्याने मदत केली पाहिजे.

प्रत्येक नागरिकाने आपल्या मतदानाचें कार्य व महत्त्व ओळखून आपला मताधिकार उपयोगांत आणला पाहिजे, म्हणजे त्याने योग्य प्रतिनिधि

निवडला पाहिजे. तरच तो नागरिक स्वराज्याला पात्र आहे. त्याने नागरिकाला आवश्यक असलेलीं नैर्बंधिक व नैतिक कर्तव्यें केलीं पाहिजेत. स्वार्थी व अधम लोकांच्या हातांत राजकारणाचीं सूत्रें जाऊं देतां उपयोगी नाहीं. प्रामाणिकपणा व सदाचार यांच्याकडे दुर्लक्ष करतां कामा नये.

स्वार्थी वृत्तीने देशाचें नुकसान होतें. सामान्य नागरिकाला स्वार्थ साधून परार्थ करतां आला पाहिजे, किंवा स्वार्थाचा व परार्थाचा योग्य मेळ बसवितां आला पाहिजे. असामान्य पुढारी व सन्मान्य नेते हेच 'परमार्थ हा स्वार्थ' धरून व्यवहार करूं शकतात. पण सामान्य नागरिकाला त्या दोहींचा योग्य मेळ घालणें आणि काल व कार्य यांना अनुसरून कनिष्ठ गोष्टींचा वरिष्ठ गोष्टींकरतां त्याग करणें शक्य आहे. परार्थाचा व परहिताचा विचार करण्याची पात्रता अथवा इच्छा नसली तर लोकसत्तात्मक स्वराज्य शक्य नाही. सत्ता हातीं घ्यावयाची ती सार्वजनिक हिताकरतां होय, स्वार्थाकरतां नाही. स्वार्थवशतेमुळें लाचलुचपत वाढते, आणि लोकहिताच्या दृष्टीने व्यवहार व कर्तव्यें बरोबर होत नाहीत व अधिकार पाळले जात नाहीत. असे लोक स्वतःला नोकऱ्या, मानमरातब, पैसा, देणग्या इत्यादि मिळण्याकरतां खटपट करतात. त्यामुळें सार्वजनिक हिताचा तोटा होतो आणि पोटभरू व नीतिहीन लोकांचा राष्ट्रांत भरणा होतो.

नागरिकांच्या पक्षपाती बुद्धीमुळें समाजाचें असेंच नुकसान होतें. कोणत्याही पक्षाला, मताला अथवा सांप्रदायाला अनुसरून जेव्हा नागरिक खऱ्या समाजहिताकडे दुर्लक्ष करूं लागतात, तेव्हा त्यांची अधोगति सुरू होते. स्वमत व स्वपक्ष असणें हा तात्त्विकदृष्टया व व्यवहारदृष्टया अपराध नाही, पण त्यांच्याकरतां अविवेकीपणाने वागणें व खऱ्या समाजहिताकडे दुर्लक्ष करणें योग्य नाही.

नागरिकांमध्यें समाजहिताबद्दल पालक बुद्धि विशेषप्रकारची असली पाहिजे. प्रत्येक गोष्टीमध्यें आणि व्यवहार–निर्णय–प्रसंगीं आपण सर्व लोकांचे विश्वस्त प्रतिनिधि व जबाबदार कार्यकर्ते आहोंत, असा नागरिकांचा दृढभाव व दृढप्रयत्न पाहिजे. त्यांनी आपले अधिकार व कर्तव्यें त्या लोकहितबुद्धीने चालविलीं पाहिजेत. त्यायोगें नागरिकतेचें उज्ज्वल स्वरूप दृग्गोचर होईल व राष्ट्राला बळकटी व भरभराट प्राप्त होईल.

ज्यांना राजकीय मतदानाचे, प्रतिनिधित्वाचे व सत्तेचे अधिकार नसत, असे लोक पूर्वीच्या काळीं प्रत्येक देशांत बरेच असत. धर्मसत्तात्मक, राजसत्तात्मक व अल्पजनसत्तात्मक राज्यांत खऱ्या नागरिकाची व त्याच्या स्वतंत्र किंवा प्रातिनिधिक अधिकारांची कल्पनाच नसे. सध्याच्या पुष्कळ बहुजनलोकसत्तात्मक राज्यांत वयांत आलेल्या सर्व लोकांना नागरिकत्वाचे पूर्ण अधिकार प्राप्त झाले आहेत. कांहींमध्यें अजून पूर्वीप्रमाणें स्त्रिया, वित्तहीन व हीनकुलोत्पन्न पुरुष आणि निरक्षर लोक यांना राजकीय अधिकार दिलेले नाहीत. वयांत न आलेले, अपराधी आणि शरीराने व मनाने अपात्र यांना राजकीय अधिकार कोठेंच दिलेले नसतात. ते मतदार, लोकप्रतिनिधि व अधिकारी होऊं शकत नाहीत. कांहीं ठिकाणीं मतदानाच्या अधिकारप्राप्तीकरतां व पात्रतेकरतां ठराविक कालापर्यंत त्या देशांत वास्तव्य करण्याची आवश्यकता असते.

नागरिकत्वाची प्राप्ति सामान्यतः दोन प्रकारांनी होते. एक प्रकार, त्या राज्यामध्यें मूळच्या नागरिकाच्या पोटीं जन्म झाल्यानें आणि दुसरा प्रकार, एखाद्या परकीय मनुष्यानें कांहीं निर्बंधानें घालून दिलेल्या विशिष्ट अटी पाळून प्रमाणपत्र मिळविल्याने. एकाला स्वाभाविक नागरिक व दुसऱ्याला कृत्रिम नागरिक म्हणतां येईल. प्रमाणपत्र मिळविण्याच्या अटीमध्यें मुख्यतः नव्या राज्याबद्दल निष्ठा व त्याबद्दलची शपथक्रिया, पहिल्या राज्यनिष्ठेचा त्याग, ठराविक काळ वास्तव्य आणि नागरिक होण्याची प्रतिज्ञा ह्या अटी असतात. कांहीं ठिकाणीं भाषा, धर्म, वर्ण, वंश व संस्कृति ह्यांचा विचार केला जातो. ह्याविषयींचे नियम ज्या त्या राज्याच्या निर्बंधांनी घालून दिलेले असतात. नागरिकाच्या राजद्रोहाने किंवा तो परदेशाचा नागरिक झाल्याने त्याची नागरिकता नष्ट होते.

प्रत्येक देशांत कांहीं परकीय लोकांची वसति असते. ते त्या देशाचे रहिवासी जरी असले तरी त्याचे खरे घटक अथवा नागरिक नसतात. ते त्या देशांत व्यापार, उद्योगधंदे, धार्मिक उद्देश व राजकीय व्यवहार यासाठी किंवा आपल्या राज्याच्या वतीने दूतरूपाने आलेले असतात. ज्या देशांत ते राहतात त्या देशाचे निर्बंध व न्याय त्यांना पाळावे लागतात व कर द्यावे लागतात. सामान्यतः राजकीय अधिकार सोडून

त्यांना नागरिकांचे सर्व व्यवहार करण्याचें स्वातंत्र्य असतें. त्यांना नागरिकांचीं सामान्य कर्तव्यें पाळावीं लागतात. बहुतेक गोष्टींमध्यें त्यांना समतेने वागविण्यांत येतें. मतदानाचे, प्रतिनिधित्वाचे व राज्यकारभाराचे त्यांना मुळीच अधिकार नसतात. युद्धाच्या काळांत ते जर शत्रुराष्ट्राचे नागरिक असतील तर त्यांना देशामध्यें स्थलबद्ध करून बंदी करण्यांत येते अथवा देशपार करण्यांत येतें. पण शांततेच्या व मैत्रीच्या काळांत त्यांचें स्वातंत्र्य, स्थान व बंधनें सामान्यतः इतर नागरिकांप्रमाणें असतात. त्यांचें हितरक्षण त्यांच्या देशाचे राज्यमंत्री व वकील करीत असतात.

मनुष्याच्या स्वातंत्र्याच्या व अधिकाराच्या दृष्टीने नागरिकतेचें मोठें महत्त्व आहे. तिच्या योगें त्याला सर्व गोष्टी आणि विशेषतः संरक्षण, स्वातंत्र्य व अधिकार सुलभ रीतीनें प्राप्त होतात. पण त्याबरोबरच त्याला समाजहिताची व समाजसेवेची जबाबदारी उत्पन्न होते. सामान्य मनुष्याला ह्या उच्च नागरिकतेच्या गोष्टी देणें व त्याकडून त्याबरोबरचीं कर्तव्यें करून घेणें हें लोकनीतिशास्त्राचें अथवा नागरिकनीतीचें प्रयोजन आहे. नागरिकाच्या जीवनाला लोकनीति ही अशा प्रकारची मदत करते.

लोकनीतिशास्त्र हें उत्तम प्रतीच्या सामाजिक जीवनाचें शास्त्र आहे. इतर सर्व शास्त्रें मनुष्याच्या व समाजाच्या सेवेला आपले निष्कर्ष सादर करतात. प्रत्यक्ष मनुष्याच्या जीवनाचा अभ्यास त्याच्या सामाजिक व भौतिक परिस्थितीच्या व हिताच्या दृष्टीने लोकनीतिशास्त्रच करतें. मनुष्याचा स्वभाव व वृत्ति काय आणि त्याचा आपल्या परिस्थितीशीं संबंध काय, एवढ्याच गोष्टींचा तें विचार करीत नाही. त्याचें क्षेत्र अधिक व्यापक आहे. मनुष्याने कसें असावयास पाहिजे आणि आपल्या भोवतालच्या मानवी व भौगोलिक परिस्थितीच्या साहाय्याने तो काय होऊं शकेल, हें शोधून काढण्याचें कार्यही तें हातांत घेतें.

ह्या शास्त्राचा अभ्यास करतांना प्रथम, मनुष्याच्या मूळच्या आणि सवयीने बनलेल्या स्वभावाच्या ज्ञानाला विशेष महत्त्व प्राप्त होतें. मनुष्याची आजची परिस्थिति आणि त्याचें आजपर्यंतचें चरित्र ह्यांवरून सिद्ध झालेला ‘ मनुष्य हा परिस्थितिनिबद्ध पण परिवर्तनशील प्राणी आहे ’ हा मूलभूत सिद्धांत मान्य करून, कोणत्या शक्ति त्याच्या

प्रगतीला व आकांक्षांना साहाय्य करतात आणि कोणत्या प्रभावी गोष्टी त्याचें स्वातंत्र्य व साहचर्य, त्याचा तुटकपणा व सहकार्य, ह्यांना मर्यादित करतात, ह्या सर्व गोष्टींचा अभ्यास करणें आवश्यक होतें.

ह्या शास्त्राच्या अभ्यासांतील दुसरा महत्त्वाचा विषय म्हणजे समाजाचा उद्भव आणि त्याने स्वभावतः समाजनिष्ठ असलेल्या मनुष्यांच्या नियमनासाठी निर्माण केलेल्या परंपरा व चालीरीती आणि मनुष्याच्या उत्साहाला अवसर देण्यासाठी पत्करलेलीं कामें व स्वीकारलेलीं ध्येयें, ह्यांच्या संबंधीचे प्रश्न होत. ह्या सर्वांना मनुष्याने संस्थांच्या व समजुतींच्या द्वाराने निर्माण केलेला सामाजिक प्रपंच असें म्हणतां येईल.

ह्यानंतर ह्या शास्त्रांत त्याच्या भौगोलिक परिस्थितीची पाहणी करावी लागते. त्याच्या योगाने मनुष्य हा कोठपर्यंत स्वतंत्र प्राणी आहे, बाह्य गोष्टी त्याच्या जीवनक्रमांतील अंतःशक्तींना व त्याच्या व्यक्तित्वाच्या आविष्कारांना कोठपर्यंत मर्यादित करतात आणि तो स्वतः आपल्या परिस्थितीला कोठपर्यंत कह्यांत ठेऊं शकतो किंवा वळण लावतो ह्यांची आपणास जाणीव होते.

शेवटीं, विशिष्ट परिस्थितींत असतांना मनुष्याचीं कर्तव्यें आणि तीं करावयाची पद्धति, त्याने स्वतः सुधारलेल्या परिस्थितीशीं ज्यांच्या योगानें त्याचा उत्तम मेळ बसेल अशा संस्था व सांप्रदाय; इत्यादि इतर प्रश्नांचाही लोकनीतिशास्त्रांत विचार केला असतो. तेव्हा सामान्य नागरिकाचीं देशाच्या व जगाच्या दृष्टीने कर्तव्यें व अधिकार काय आहेत, ह्यांचें प्राथमिक ज्ञान होण्यासाठीं प्राचीन इतिहास आणि विद्यमान संस्था व समजुती ह्यांची माहिती, मनुष्यनिर्मित व स्वाभाविक भौगोलिक विशेषांची माहिती आणि मनुष्याच्या जीवनावर परिणाम करणाऱ्या इतर गोष्टींची पाहणी, ह्यांची आवश्यकता असते.

सध्याच्या मताप्रमाणें लोकनीतिशास्त्राची कल्पना राष्ट्रापुरतीच मर्यादित केली तर, त्यांत त्या राष्ट्राची विशिष्ट संस्कृति व महती, तिची विद्यमान स्थिति आणि भविष्यकालीन कार्य व रूपांतर, ह्यांचा खोल अभ्यास करावा लागतो. ह्या राष्ट्रीय कल्पनेच्यामुळें त्या शास्त्रामध्यें

निरनिराळ्या लोकांच्या स्वतंत्र प्रवृत्तीच्या व विचाराच्या भेदांकडे त्यांच्या मानवी सद्‌गुणापेक्षा अधिक लक्ष दिलें जातें.

आपल्या देशाच्या विशिष्ट राष्ट्रीय संस्कृतीच्या दृष्टीने आम्ही ह्या विषयाचें प्रतिपादन केलें आहे. तरी त्यामध्यें आजच्या उच्च मानवी ध्येयांची व आकांक्षांची, सद्‌गुणांची व संस्थांची उपयुक्तता मान्य केली आहे. पाश्चात्य लेखक आपल्या स्वतःच्या इतिहासांतील व समाजांतील आणि ग्रीसच्या व रोमच्या प्राचीन इतिहासांतील व वाङमयांतील कल्पना उचलून घेऊन लोकनीतिशास्त्राचा अभ्यास करावयास लागतात. ग्रीस व रोम ह्यांच्या संस्कृतींनी व ख्रिस्ती धर्माच्या संस्थांनी पाश्चात्य लोकांचे विचार व समजुती, चालीरीती व परंपरा ह्यांच्यावर विशेष प्रभाव पाडला आहे. येथे आपण वैदिक संस्कृतीचे वारस व भोक्ते आहोंत. तिने आपल्या जीवनाला विशेष वळण दिलें आहे. म्हणून लोकनीति व राजनीति ह्या शास्त्रांचा आपण अभ्यास करीत असतांना, आजच्या ज्या निरनिराळ्या नवीन सामाजिक व राजकीय कल्पना आपल्या जीवनावर परिणाम करीत आहेत, त्यांचें मर्म व उपयोग पूर्णपणें समजण्यासाठी, आपल्या परंपराप्राप्त सामाजिक व राजकीय जीवनांचें व विचारांचें सामान्य स्वरूप आपणांस समजणें अवश्य आहे. आपली जुनी मनोवृत्ति व सामाजिक दृष्टिकोण आपणास माहीत पाहिजेत, आणि नव्या व जुन्या कल्पनांमध्यें मेळ बसवून आपलें भविष्यकाळचें जीवन सुखकर होण्यासाठी, त्यांचे विरोध नष्ट करून व दृष्टिकोण एकमेकांत मिसळून आपला एक सुधारलेला दृष्टिकोण तयार झाला पाहिजे.

स्थानिक हितसंबंधापासून राष्ट्रीय व जागतिक हितसंबंधापर्यंत नागरिकनीतिशास्त्राची व्याप्ति आहे. त्याचें उद्दिष्ट नीतिपर व संस्कृतिवर्धक आहे. त्याचा कार्यक्रम जनसेवेचा आहे. त्याचें ज्ञान अखंड अनुभव व शिक्षण यांजवर अवलंबून आहे. त्यामध्यें स्वतःसाठी, स्वतःच्या समाजासाठी आणि स्वतःच्या देशासाठी वस्तुतः उत्तम असलेल्या जीवनक्रमाचा अभ्यास केलेला असतो आणि स्वतःच्या पूर्व संस्कृतीशीं व सध्याच्या आवश्यकतेशीं व परिस्थितीशीं सुसंबद्ध अशा सर्वोत्कृष्ट जीवनमार्गाचें ज्ञान व प्रत्यक्ष आचरणाचे नियम दाखविलेले असतात.

इतर सर्व सामाजिक शास्त्रांचें पर्यवसान लोकनीतिशास्त्रांत होतें. एका अर्थानें तीं सारीं लोकनीतिशास्त्राचीं अंगभूत शास्त्रें आहेत. तीं यथार्थ ज्ञान गोळा करतात व आपले निष्कर्ष मानवी जीवनाच्या ह्या महाशास्त्रांत मार्गदर्शक होतील अशा तत्त्वांच्या व नियमांच्या स्वरूपांत सांगतात, आणि अनुसरावयाला योग्य अशा त्याबद्दलच्या कल्पना व कार्यक्रम दाखवून देतात. लोकनीतिशास्त्र हें निरनिराळ्या समाजशास्त्रांनीं काढलेल्या सिद्धांतांचा अभ्यास करून त्यांचा उपयोग निश्चित रीतीने व निश्चित स्थलीं व प्रसंगीं मनुष्याच्या सामाजिक जीवनाला करून घेतें आणि त्याकरतां कांही व्यवहारोपयोगी नीतिनिर्बंध रचतें. तें नागरिकाच्या सर्व हालचालींचें महत्व, मागचा अनुभव व पुढचें उद्दिष्ट यांच्या अनुरोधाने ठरवितें व त्यांना योग्य वळण लावतें.

लोकनीतिशास्त्राचें ध्येय मनुष्याच्या व समाजाच्या श्रेष्ठ ध्येयापासून भिन्न असूं शकत नाहीं. तें त्याला सुसंगतच असलें पाहिजे. श्रेष्ठतम हित साधण्यासाठीं मनुष्याच्या हालचालीमध्यें पद्धतशीरपणा आणून त्यांना योग्य नीतिनियमानें वळण देणें, हा त्याचा उद्देश आहे. त्याला सामाजिक जीवनांत सुस्थिति व प्रगति प्रस्थापित करावयाची आहे. ह्या संबंधांत पूर्वीच्या प्राप्त करून घेतलेल्या गोष्टींचें रक्षण करावयाचें आणि संस्कृतीच्या पुढील वाढीला सहाय्य करावयाचें हा त्याचा प्रयत्न आहे.

उच्च संस्कृतीचें मुख्य लक्षण परार्थबुद्धीनें स्वार्थबुद्धीवर मिळविलेला विजय होय. परार्थ हा ज्याचा स्वार्थ आहे त्याला आपण सत्पुरुषामध्यें अग्रणी धरतों. सत्पुरुष हे परार्थघटक असतात व स्वार्थाचा त्याग करतात. ते ममत्व व परहित, स्वार्थ, परार्थ व परमार्थ यांच्यामध्यें श्रेष्ठत्व व कनिष्ठत्व ह्या दृष्टीने क्रम लावून त्यांची उपयोगिता ठरवितात व मेळ घालतात. अशा वृत्तीने द्रवलेलें अन्तःकरण व चारित्र्य यास शील म्हणतां येईल व स्थापिलेल्या संस्था व समजुती यांस संस्कृति म्हणतां येईल. याकरतां मनुष्याने स्वतःला ओळखलें पाहिजे, स्वतःच्या उच्चवृत्ति समजून घेतल्या पाहिजेत, भोंवतालच्या परिस्थितीशीं असलेला संबंध नीट लक्षांत घेतला पाहिजे, आपलें योग्य कार्य शोधून तें केलें पाहिजे, आणि स्वतःचें व भोंवतालच्या परिस्थितीचें योग्य सहकार्य घडविलें पाहिजे. हें सर्व करण्याचा लोकनीतिशास्त्राचा उद्देश आहे.

## प्रकरण चवथें

# मनुष्य व समाज

मनुष्य हा जात्या अनेक गुणदोषांनी युक्त आहे. त्याच्या स्वभावाबद्दल अनेक मतें आहेत. तो जात्या पूर्ण नाही. त्यामध्यें कांही पशूचा व कांही परमेश्वराचा अंश आहे. नीच व उच्चभाव अनेक प्रमाणांत असणें हें त्याच्या स्वभावाचें वैशिष्टच आहे. तो शांतिप्रिय व युद्धप्रिय, उपकारी व अपकारी, परार्थी व स्वार्थी, स्वतंत्र व परतंत्र, अशा अनेक विरुद्ध वृत्तींनी प्रेरित आहे. त्याच्यामध्यें सत्व, रज व तम असे तीन प्रकारचे गुण आहेत. त्याच्यामध्यें दैवी व आसुरी भावना दिसून येतात. उन्नतीकडे व अवनतीकडे त्याची प्रवृत्ति आहे. तो स्वभावाने स्थिर व चंचल आहे. अशा प्रकारें त्याच्यामध्यें चांगल्या व वाईट प्रवृत्तींचें मिश्रण उपजतच असतें. तो चांगला वागला तर परोपकारी होतो, वाईट झाला तर धर्मांध, जात्यंध व पक्षांध होऊं शकतो. त्याचा उपजत स्वभाव सवयीनें, संस्काराने, शिक्षणाने व प्रेरणेने बदलूं शकतो. तो सामाजिक संघटनाने व व्यवहाराने नवें वळण घेऊं शकतो. नीच प्रकारच्या भावनांतून उच्च प्रकारच्या भावनांकडे जाण्यास तो समर्थ आहे. असत्यांतून सत्याकडे, अज्ञानांतून प्रकाशाकडे, जडजीवनांतून अध्यात्मिक जीवनाकडे, स्वार्थपरतेंतून परोपकाराकडे मनुष्याला घेऊन जाणें हा सुधारणेचा हेतु आहे, व त्यास मनुष्यस्वभाव अनुकूल आहे.

मनुष्याला सत्तेची हौस, कीर्तीची आवड, पराक्रमाची प्रीति, अर्थकामप्राप्तीची प्रखर इच्छा व स्वातंत्र्याची आवड आहे. तरी पण तो या बाबतींत पूर्ण स्वतंत्र नाही. बाह्य परिस्थिति आणि अंतःस्फूर्ति ह्यांनी तो नियंत्रित व मर्यादित आहे. पण बंधनें तोडावयाचें व परिस्थितीची आवडनिवड करण्याचें सामर्थ्य त्याच्यांत आहे. त्याला शिक्षणाने नवें वळण देतां येतें. त्याच्या भावना, त्याची बुद्धि, त्याची स्वतंत्र इच्छाशक्ति, त्याची निवड, शोध व तर्क करण्याची शक्ति, ह्यांच्या योगाने तो स्वतःची व आपल्या भोंवतालच्या परिस्थितीची पुनर्घटना करूं शकतो. फ्रेंच ग्रंथ-

कार रूसो मनुष्याला स्वभावत: सालस व सात्विक समजतो. इंग्रज ग्रंथकार हॉब्स् त्याला जात्याच भांडखोर व राजस ठरवितो. ख्रिस्ती धर्मशास्त्रकार त्याला जन्मत:च पापी व मूलत: तामसिक मानतात. आणि स्टोईक तत्वज्ञानी त्याला भावनाविरहित सत्पुरुष समजतात. हीं मतें एकांगी कशींही असलीं तरी त्याच्या स्वभावांतील महत्त्वाचा विशेष म्हणजे तो विकारी, विचारी व सुधारणाक्षम आहे. तो प्रयत्नवादी व प्रगतिशील आहे, नुसता प्रारब्धवादी व परंपराभक्त नाही. मनुष्याच्या स्वभावांत गतानुगतिकत्वाचा व परंपराप्रियतेचा जसा अंश आहे त्याचप्रमाणें नवीनत्वाचा अंकुर आहे. त्याच्यामध्यें जसें व्यक्तित्वाचें वैचित्र्य आहे तसें समाजशीलत्वाचें साम्य आहे. तो विवेकशील आहे, त्याचप्रमाणें भावनामय आहे. तो प्रारब्धवाद मानतो तसाच प्रयत्नवाद मानतो. त्याच्यामध्यें प्रामाण्यबुद्धि आहे, त्याचप्रमाणें इच्छास्वातंत्र्य आहे. त्याच्यामध्यें ज्ञानाची आवड, विद्येची गोडी, कर्तव्याची प्रेरणा, अधिकाराची लालसा व सुखाची लोलुपता आहे. त्याला भौतिक, नैतिक व आध्यात्मिक भावना आहेत. तो प्रपंच व परमार्थ, परंपरा व प्रगति यांचा भोक्ता आहे. तेव्हा त्याचा स्वभावविशेष ठरविणें हें कठीण आहे. प्रत्येक मनुष्यांत ह्या निरनिराळ्या गुणांचें भिन्न प्रमाणांत मिश्रण असतें.

मनुष्य हा स्वभावत: समाजशील व समाजनिष्ठ आहे. त्याच्यामध्यें सोबतीची व सहवासाची आवड आहे. मंडळींत बसून बोलावें, हसावें, खेळावें असें त्याला वाटतें. त्याच्यामध्यें स्नेहभाव असतो. ज्याप्रमाणें 'मी' इतरांहून भिन्न आहें ह्या जाणिवेमुळें मनुष्याचें वैयक्तिक स्वरूप नित्य राहतें, त्याचप्रमाणें 'मी' व 'इतर' ह्यांच्यांत दिसणाऱ्या सादृश्याच्या जाणिवेमुळें व उत्पन्न होणाऱ्या सहानुभूतीमुळें व्यक्तीच्या मनामध्यें पहिल्यानें समाजपर वृत्ति उत्पन्न होते, आणि इतरांचें सुखदु:ख पाहून स्वत:च्या अंत:करणांत सुखदु:खाची भावना उत्पन्न होते. आपल्याहून भिन्न अशा इतरांमध्यें स्वत:च्या प्रतिबिंबाची ओळख पटणें हें समाजपर वृत्तीचें आरंभस्थान होय. ही ओळख प्रथम मुलांमुलींमध्यें व आईबापांमध्यें वात्सल्यभावानें प्रगट होते. ती वैवाहिक व कौटुंबिक सहवासाने वाढते. सजातीयाबिषयीं सहानुभूति वाटणें हें सामाजिक घटनेचें मूळ कारण आहे. आपापल्या जाती-

ची जाणीव होणें हें समाजघटनेचा तदितर घटनेहून भेद दाखविणारें लक्षण आहे. स्वतः आपण आणि आपल्या जातीचे इतर ह्यांच्यामधील ह्या सहानुभूतीमुळें परस्परांमध्यें संबंध, सेवाभाव व सहकारिता उत्पन्न होते. व त्यांची आवश्यकता भासूं लागते. त्यांच्यावाचून समाजघटनेला अस्तित्व येत नाही. ज्या सामाजिक भावनेला आपण लोकनीतीची मूलभूत कल्पना म्हणून धरतों तिच्या मुळाशीं ही जातिसहानुभूतीची व जाति-सेवेची वृत्ति आहे. अरिस्टॉटलच्या म्हणण्याप्रमाणें मनुष्य हा स्वभावतःच समाजशील म्हणजे 'नागरिक' प्राणी आहे. आपलें जीवन परिपूर्ण करण्या-साठी कोणच्या तरी प्रकाराने एकत्र येणें व राहणें त्याला आवश्यक असतें. तेव्हा कोणच्या तरी प्रकारचा जनसमूह स्थापन करणें ही सामुदायिक व सुधारलेल्या जीवनाकडे घेऊन जाणारी पहिली पायरी आहे. रानटी लोकांमध्यें सामूहिक जीवन असतें. तें पुष्कळ संकुचित स्वरूपाचें असतें. सुसंस्कृत सामाजिक जीवनामध्यें परस्पर संबंध, सहकारित्व व संघटना हीं अधिक निकट असतात. बऱ्याचशा इतर प्राण्यांप्रमाणें मनुष्याला आपल्या एकट्यापुरतेंच जीवित घालवावयाचें हें स्वाभाविक व श्रेयस्कर वाटत नसून, स्वतःच्या व इतराच्या कल्याणासाठी तें इतरांच्या साहचर्यांत घालविणें त्याला स्वाभाविक व श्रेयस्कर वाटतें. इतर प्राण्यांच्या पुढें जाण्यास त्याला त्याची विचारशक्ति व वाचाशक्ति, योग्यायोग्यविवेक व महत्त्वाकांक्षा, नीतिपरता व अहंभाव ह्या गोष्टी सहाय्य करतात. ह्या गुणांचा उपयोग व कार्य हीं त्याच्या उच्चतर सामाजिक व आध्यात्मिक हेतुप्राप्तीसाठी आहेत.

मनुष्यामध्यें इतर मनुष्यांशीं समान आणि निगडित असें कांही आहे इतकेंच नाही तर परमेश्वराशीं समान व त्याच्या पासून प्राप्त झालेलें व त्याच्यावर अवलंबून असलेलें असें कांही तरी आद्यतत्त्व आहे म्हणूनच त्याच्या केवळ सामाजिक जीवनाच्याच सर्व अंगांचा विचार करून आणि त्याचें महत्त्व ठरवून भागत नाही, तर त्याला आध्यात्मिक जीवन व स्थान असते हें ओळखून त्यांनाही वळण लावावें लागतें. उत्तम जीविताच्या सर्व ध्येयांची प्रतीति व यशस्विता सामाजिक व

आध्यात्मिक जीवनमार्गामध्यें एकतानता उत्पन्न करण्यावर आणि समतोलपणा राखण्यावर अवलंबून आहे.

मानवी जीवनाला जरी सामाजिक अंग आहे तरी मनुष्य हा समाजबंधनापासून शेवटीं मुक्त होण्यासाठी जन्माला आला आहे, त्यामध्यें सदैव बद्ध राहण्यासाठी नाही, हें आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. समाजाने त्याला उन्नत, स्वतंत्र व मुक्त होण्यास सहाय्य केलें पाहिजे व बंधनाच्या आसक्तीपासून हळूहळू परावृत्त केलें पाहिजे. त्याच्यावर बंधनें घालावीं लागलीं तरी तीं त्याच्या वैयक्तिक व सामाजिक स्वतंत्रतेकरतांच घातलीं गेलीं पाहिजेत. तीं उच्च प्रतीचें जें सामाजिक स्वातंत्र्य त्याच्यासाठी खालच्या प्रतीचें जें वैयक्तिक स्वातंत्र्य त्याला आळा घालण्याकरतां लावून दिलेल्या संयमाच्या स्वरूपाचीं पाहिजेत. तीं अज्ञानाच्या संकुचित व स्वार्थपर दृष्टिकोनाच्या आवरणापासून मनुष्याच्या नैतिक स्फूर्तीची व स्वातंत्र्याची मुक्तता करण्यासाठी असतात. त्यांचा मनुष्याच्या स्वतःच्या व भोवतालच्या सामाजिक व भौतिक उन्नतिसाठी बुद्धिपूर्वक उपयोग करावयाचा असतो.

मनुष्य हा समाज निर्माण करणारा प्राणी आहे व समाज ही मनुष्याची रक्षक व पोषक घटना आहे. मनुष्याने आपलें स्वतःचें अस्तित्व शक्य करण्यासाठी व जीवन पूर्ण करण्यासाठी दुसऱ्या माणसांशीं सहवास व सहकार केला पाहिजे आणि तें जीवन कल्याणकारक होण्यासाठी स्थायी व प्रगतिपोषक समाजांत बरेंच आयुष्य घालविलें पाहिजे. अरिस्टॉटल म्हणतो " राष्ट्रसमाजाचें श्रेष्ठ स्वरूप हें मानवी जीवन शक्य करण्यासाठी अस्तित्वांत येतें आणि कल्याणकारक होण्यासाठी चालू राहतें." समाजविरहित मनुष्य पशुवत् बनतो, समाजनिष्ठ मनुष्य संस्कृतिसंपन्न देववत् होतो.

समाजशीलता ही मनुष्याच्या आहारविहाराच्या शारीरिक नडींत, वात्सल्यांत, रतिपुत्रप्रेमांत, मुलांच्या संगोपनांत आणि संरक्षणाच्या सोयींमध्यें उत्पन्न होते. त्यांच्या जाणिवेने ती टिकते आणि नव्या संबंधाने व सवयीने ती वाढते. ह्या सवयी व संबंध मनुष्याच्या विचारशक्तीनें दळणवळणाने, संगतीने, भाषेने, संस्काराने व शिक्षणाने वाढतात. बरें

वाईट ओळखण्याच्या, अनुभव पारखण्याच्या, नव्या सवयी व संस्था निर्माण करण्याच्या, संयमाच्या, साहसाच्या व कर्तृत्वाच्या ज्या अनेक शक्ति मनुष्यामध्यें आहेत त्यायोगें ही समाजशीलता अनेक प्रकारची होते. मनुष्य हा विद्या, कला, धर्म, नीति, निबंध, संघटना इत्यादि प्रकारची नवी मानससृष्टि उत्पन्न करतो व त्यास अनुसरून रहाण्याचे व वागण्याचे नवे प्रकार उत्पन्न करतो. तो नुसता भोगलोलुप प्राणी नाही, पण क्रियावान् व नवी व्यावहारिक व मानसिक सृष्टि निर्माण करणारा पुरुष आहे. मनुष्याच्या मनाने मानलेल्या सार्वजनिक व परस्परावलंबी संबंधाने समाज चालू राहतो. त्याच्या चालीरीती, परंपरा, संस्था, समजुती, संस्कृति, ध्येयें हीं सर्व मनुष्यांच्या मनोव्यापारावर व स्वभावावर अवलंबून आहेत. तेव्हा समाज ही मनुष्याची मानसिक संघटना आहे. ती त्यानें स्वत: उत्पन्न केलेल्या सामान्य समजुती व सवयी यामुळें टिकते व वाढते.

मनुष्याचे मुख्य समाज कुटुंब, कुल, जाति व राष्ट्र, ग्राम, नगर व राज्य हे आहेत. ते मनुष्याचें समाजशीलत्व राखतात व वाढवितात. आज्ञाधारकत्व, सहिष्णुता, सहानुभूति, देवघेव, सहवास व सहकार हीं ते शिकवितात. परंपरा व चालीरीती यांचें ते रक्षण करतात. भाषा, धर्म, नीति, समजुती, सवयी व संस्था हीं ते टिकवितात. कर्तव्यप्रियता, प्रेमभाव, सेवाभाव, स्वार्थत्याग, भ्रातृभाव, न्यायबुद्धि, परोपकार, एकी, समता, स्वातंत्र्य, मैत्री, करुणा व सार्वजनिक हितबुद्धि हीं सर्व ते शिकवितात.

ह्या समाजांची सुस्थिति राहण्यास त्यांच्यामध्यें सुव्यवस्था पाहिजे. म्हणजे त्यांचे व्यवहार व सहकार्य सुरळीत चालतील आणि वाढ व प्रगति व्यवस्थित होईल. ती व्यवस्था मात्र चालू व्यवहाराला व वाढत्या गरजा व आकांक्षा यांना पोषक असली पाहिजे. तेव्हा समाजहितदृष्ट्या नियंत्रण व व्यक्तिहितदृष्ट्या स्वातंत्र्य यांचा योग्य मेळ बसेल. सुस्थितीकरता व्यक्तीमध्यें व्यापक दृष्टि व जबाबदारीची भावना उत्पन्न केली पाहिजे. ती झाली तर तोच स्वत: आपलें स्वातंत्र्य व व्यवहार यांचें समाजहितदृष्टया नियंत्रण करील.

ह्या समाजसंस्थांचें मुख्य कार्य मनुष्यांना सुखी, स्वतंत्र, उन्नत, संस्कृतिसंपन्न व उदारचरित्र करणें हें आहे. समाज हा त्याचें आवश्यक

व स्वाभाविक साधन आहे. मनुष्याच्या हिताव्यतिरिक्त समाजाला मान नाही, आणि समाजविरहित मनुष्याला स्थान नाही. व्यक्ति व समाज हीं दोन्ही स्वाभाविक व परस्परपोषक आहेत. हें ओळखण्यांतच मनुष्याचें कल्याण आहे.

मनुष्यस्वभावाला व समाजाला वळण लावणाऱ्या अनेक शक्ति आहेत. त्यांपैकी मुख्य म्हणजे त्याची भौगोलिक परिस्थिति. तिच्यावर त्याचें अन्न, हवापाणी, आरोग्य व इतर संपत्ति हीं अवलंबून असतात. त्यानंतर त्याच्या आनुवंशिक उपजत शक्ति आणि नव्या मिळविलेल्या संवयी व समजुती. ह्या सर्वांवर त्याचे धार्मिक, नैतिक, सांस्कृतिक, नियम व उच्चता आणि विद्या व कला यांचें कौशल्य हीं अवलंबून आहेत.

समाजांत राहणाऱ्या मनुष्यांचे आचार, विचार व व्यवहार हे जसे एका दृष्टीनें त्याच्या स्वयंस्फूर्तीवर, संमतीवर अवलंबून असतात, तसे ते दुसऱ्या दृष्टीने दुसऱ्याच्या संगतीने व अनुकरणाने आणि परिस्थितीच्या व परंपरेच्या परिणामाने बनलेले असतात. मनुष्य व परिस्थिति ह्यांचा एकमेकांवर परिणाम घडत असतो. मानवी जीवनाला सामाजिक, सांस्कृतिक व नैसर्गिक परिस्थितीचें वेष्टन व मर्यादा असते त्यांच्यावाचून त्याच्या आयुष्याचा विचार योग्य रीतीने करतां येत नाही. मनुष्य हा मर्यादाबद्ध व परिस्थितिनियंत्रित आहे. त्याच्या इच्छा व आकांक्षा अमर्याद असल्या तरी व त्याचे संकल्प व निश्चय दृढ असले तरी, त्याच्या जवळचीं साधनें परिमित आहेत व त्याच्या भोंवतालची परिस्थिति त्याला बांधून टाकणारी आहे. त्याची सामाजिक व सांस्कृतिक, धार्मिक व व्यवसायात्मक पूर्वपरंपरा आणि त्याचे वर्तमान सोबती व समजुती ह्यांचें त्याच्यावर नियंत्रण आहे. आनुवंशिक व स्वयंसंपादित असलेलें त्याचें सामर्थ्य अथवा दौर्बल्य हें त्याच्या प्रयत्नांना व आकांक्षांना मर्यादा घालतें. तेव्हा मनुष्य हा सामान्यतः त्याच्या विद्यमान परिस्थितीविषयीं व पूर्वजप्राप्त मिळकतीविषयीं असंतुष्ट असतो. भूतकालाने व परिस्थितीने उत्पन्न केलेलीं बंधनें तोडावीं आणि निसर्गावर व इतर माणसांवर आपलें वर्चस्व ठेवावें अशी त्याची इच्छा असते. तरी पण त्याचा मुख्य उद्देश स्वतःचें रक्षण करावयाचें, स्वतःचा वंश राखावयाचा व स्वतःचें श्रेष्ठत्व प्रकट करायवाचें

तसेंच दुसऱ्यांशीं बंधुभावाने वागावयाचें व बरोबरी करावयाची आणि स्वतःचें स्वातंत्र्य ठेवावयाचें, हा असतो. सुव्यवस्था व प्रगति करून घेण्यासाठी तो आपल्या देशाच्या चालीरीतींचें व नगराच्या नीतिनिबंधांचें बंधन पत्करतो. तो स्वेच्छेने व समजून उमजून त्यांचें पालन करतो, कारण लोकसत्तात्मक समाजांत त्याने तें ठरविण्यांत भाग घेतलेला असतो. तो सुव्यवस्थेचें महत्त्व ओळखून सुधारणेसाठी उत्सुक असतो. भूतकाळाच्या ठेचा भविष्यकाळाला मार्गदर्शक धरून तो स्पृहणीय ठरलेल्या ध्येयांचें व वस्तूंचें संरक्षण व संपादन करणें, हा आपला धर्म आहे असा विश्वास बाळगतो.

मनुष्य हा सामान्यतः कुटुंबामध्यें जन्माला येतो, आणि त्यामुळें त्याचें कांही तरी कुल, जात व पंथ हीं असतात. तो कोणत्या तरी गावामध्यें जन्म घेतो आणि त्यामुळें तो विशिष्ट प्रदेशाशीं निष्ठाबद्ध होतो. त्याचा जन्म त्याच्या देशाच्या स्थानिक व राष्ट्रीय इतिहासांतल्या विशिष्ट, काळीं झालेला असतो. मनुष्याची ही परिस्थिति व आनुवंशिक गुणधर्म ध्यानांत ठेवले तर मनुष्य हा जन्मतः स्वतंत्र व स्वयंपूर्ण आहे काय, त्याला त्याच्या मातापितरांवर कोठवर अवलंबून राहिलें पाहिजे त्याच्या जातीचें, संघाचें, धर्माचें व राज्याचें त्याच्यावर किती ऋण आहे, परिस्थिति, देहस्वभाव, परंपरा आणि सामाजिक ध्येयें, सत्यें ह्यांचा त्याच्या मानसिक सिद्धतेवर व स्वातंत्र्यावर कोठपर्यंत परिणाम होतो, ह्या प्रश्नाकडे आपणास लक्ष दिलें पाहिजे

समाजाची उपपत्ति लावणारा प्रत्येक शास्त्रज्ञ हा मनुष्याचा मर्यादितपणा आणि त्याच्या परिस्थितीने व शिक्षणाने त्याला लावलेलें विशिष्ट वळण व प्रवीणता हीं मान्य करतो. आणि त्याबरोबरच त्याला प्राप्त झालेल्या गोष्टींत व संस्कारांत परिवर्तन करावयाला आणि स्वतःला व आपल्या परिस्थितीला नवीन व योग्य स्वरूप द्यावयाला त्याला स्वातंत्र्य व सामर्थ्य असतें असें तो मानतो.

मनुष्य हा जरी सामान्यपणें जन्मतः अपूर्ण, अज्ञानी, परावलंबी स्वार्थी व हेकेखोर वृत्तीचा असला आणि त्याच्या सामान्य आयुष्यक्रमांत उपद्व्यापी, उच्छृंखल व धाडसी वृत्तीचे अंश दिसले तरी त्याचबरोबर

त्याच्यामध्यें चांगलें व थोर होण्याची मानसिक प्रेरणा व आकांक्षा असते. ह्यावरून त्याच्यामध्यें जुन्या शृंखला आणि परंपरागत गोष्टी व परिस्थिति फेकून देण्याचें मनःस्वातंत्र्य व सामर्थ्य स्वाभाविकपणें असतें असें दिसून येतें. म्हणून तो आपल्या भोवतालच्या परिस्थितीशीं व स्वतःच्या अपूर्णतेशीं जखडला गेलेला नाही. त्याला जन्मतः कर्मस्वातंत्र्य व कर्मसामर्थ्य मिळालेलें आहे. परिवर्तन करून घ्यावयाचा व वरच्या प्रतीच्या भौतिक, नैतिक आणि आध्यात्मिक अवस्थेकडे चढून जाण्याचा त्याचा जन्मसिद्ध अधिकार व स्वभाव आहे. त्याला समाजसंस्था उलथून पाडावयाची नसते, तर ती अधिक श्रेष्ठप्रतीची करावयाची असते व तसें करण्याचा आपला अधिकार व स्वातंत्र्य हीं प्रस्थापित करावयाचीं असतात. गतानुगतिक व वर्तमान गोष्टींना विरोध करावयाचा त्याचा हा अधिकार शास्त्रज्ञांनी मान्य केलेला आहे. त्या गोष्टी स्वयंसिद्ध किंवा दैवाधीन नसून त्यांपैकी बहुतेक त्यानेच कालकार्यानुसार निर्माण केलेल्या असतात. तेव्हा त्या कृत्रिम असतात व निर्दोषी नसतात.

मनुष्य हा जन्मतः शरीरानें दुबळा असेल, त्याला पोषणाची आवश्यकता असेल, त्याची समजशक्ति, अनुभव व ज्ञान हीं अपूर्ण असतील, पण त्या गोष्टी शाश्वत नाहीत. त्यांच्यामध्यें पालट घडवून आणतां येतो. मनुष्यावर मर्यादा घालणारें असें जें कांही आहे त्याच्या विरुद्ध केलेल्या उठावानें समाजामध्यें परिवर्तन होतें. स्थितिनिष्ठ समाज पूर्णत्वाला गेलेला आढळत नाही. गतिप्रिय समाज उन्नत होऊं शकतो. प्रथमपासून समाजाचे निरनिराळे प्रकार अस्तित्वांत आले आहेत. त्या सर्वांचा आरंभ व वाढ एकाच मार्गानें झालेली नाही. समाजाच्या ह्या भिन्न प्रकारांत व वारंवार पालटण्यांत मुख्य चालकशक्ति मनुष्याचा कर्तेपणा हीच आहे. समाजाचीं भिन्न स्वरूपें त्याच्याच स्वातंत्र्यामुळें व सामर्थ्यामुळें उत्पन्न होतात, टिकतात व लय पावतात. त्यावरून मनुष्य हा स्वभावप्रकृतीनेंच उत्पादक व संग्राहक वृत्तीचा, भावनात्मक, बुद्धिशाली, अनुकरणपर, परिवर्तनाकांक्षी व प्रगतिशील आहे असें मानावें लागतें.

महर्षि मनूंनी मनुष्याचा समाजप्रवण स्वभाव ओळखूनच आपला दशलक्षणक व सामासिक नीतिधर्म नियमांच्या रूपानें सांगितला आहे.

त्याच्यावाचून कोणत्याही प्रकारचें सामाजिक जीवन चालणें शक्य नाही. समाजाच्या रक्षणाला व सुस्थितीला यमनियमांची आवश्यकता आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह (निर्लोभता) हे पांच यम आहेत. त्यांमध्यें जीवित, वित्त, काया, वाचा व मन यांच्या संरक्षणाला व सुख संपादनाला ज्या पवित्र गुणांची आवश्यकता आहे ते सांगितले आहेत. समाज हा स्वाभाविक व आवश्यक असल्यामुळें त्याच्या सुस्थितीला व संवर्धनाला सहाय्यक असे गुण कोणते हें शोधून काढणें समाजशास्त्रकारांना आवश्यक आहे. हिंदुसमाजशास्त्रकारांनी पूर्वीचा अनुभव व मानवी जीवनाचें विस्तृत निरीक्षण ह्यांच्या आधारावर आपल्या उपदेशाची व आदेशाची मांडणी केली आणि चांगल्या समाजाचें अस्तित्व व स्थैर्य त्यांनी उपदेशिलेल्या दशलाक्षणिक नीतीच्या आचरणानेंच शक्य आहे असा सिद्धांत स्थापित केला. शौच (शुद्धता), अक्रोध, गुरुशुश्रूषा (वडिलांची सेवा), आहारलाघव (मिताहार), अप्रमाद (व्यवस्थित राहणें), अहिंसा, सत्य, अस्तेय (चोरी न करणें), ब्रह्मचर्य (अव्यभिचार) आणि अपरिग्रह (निर्लोभता) ह्या दहा गुणांपैकी पहिल्या पांचांना नियम व पुढल्या पांचांना यम अशा संज्ञा आहेत. समाजांतील व्यक्तीमध्यें हीं लक्षणें जितक्या उत्तम स्वरूपांत अस्तित्वांत असतील तितका तो समाज सुव्यवस्थित होतो आणि अधिक उच्च व अधिक परिपूर्ण असें वैयक्तिक व सामाजिक जीवन घालविण्याची त्यास पात्रता येते. ब्राह्मणवर्णांत हीं लक्षणें पूर्णपणें असावयास पाहिजेत. तीं असल्यास तो वर्ण इतर वर्णांपेक्षा श्रेष्ठ आणि समाजाचा पवित्रपणा, सौख्य व सुस्थिति राखण्यांत अत्यंत उपयुक्त समजला जाईल. क्षत्रियांना अहिंसा व अपरिग्रह पूर्णपणें करतां येत नाही. वैश्यांना सत्य व अस्तेय पूर्णपणें पाळतां येईना. शूद्रांना ब्रह्मचर्याचें व अंत्यजांना शौचाचें पूर्णपणें पालन करतां येईना. म्हणून त्यांच्या आचरणावरून प्रत्येक वर्णाचें श्रेष्ठत्व व कनिष्ठत्व ठरविण्यांत आलें. पांच यम हे मुख्यतः उत्तम सामाजिक जीवनासाठी आवश्यक असलेल्या मानसिक संयमाच्या व निबंधाच्या स्वरूपाचे आहेत, आणि पांच नियम हे उत्तम वैयक्तिक जीवनाला आवश्यक असलेल्या शारीरिक निग्रहांच्या व नियमांच्या

स्वरूपाचे आहेत. उत्तम पुरुष व्हावयाला हीं सारीं दहाही लक्षणें आवश्यक आहेत. तीं मोडणारा अनाचारी व अपराधी समजला जात असे.

मनुस्मृति अध्याय १० श्लोक ६३ मध्यें अहिंसा, सत्य, अस्तेय, शौच व इंद्रियनिग्रह ह्या गुणांचें पालन हा सामासिक म्हणजे सर्वसामान्य धर्म सांगितला आहे. हे सामाजिक सद्गुण आहेत व समाजाच्या प्रत्यक्ष अस्तित्वालाच त्यांची आवश्यकता आहे. तसेंच मनुस्मृति अ. ६ श्लो. ९२ मध्यें दशलक्षणक धर्म सांगितला आहे. धृति (धैर्य), क्षमा, दम (संयमन), अस्तेय, शौच (पवित्रता), इंद्रियनिग्रह, धी (आकलन शक्ति), विद्या, सत्य आणि अक्रोध; ह्या गुणांमध्यें अधिक सांगितलेल्या पांच गुणांची गुणसंपन्न व सुसंस्कृत समाजाला आवश्यकता असते. ह्या दहा गुणांच्या कसोटीनुसार वर्ण, जाति, व्यवसाय, व्यवहार, आश्रम व पुरुषार्थ ह्यांचें वर्गीकरण व श्रेष्ठत्व कनिष्ठत्व ठरविलेलें असे. मन, शरीर व आत्मा ह्यांच्या पावित्र्यावर व दोषनिग्रहावर ह्या गुणांची उभारणी आहे. पावित्र्य व निग्रह ह्याच दोन गोष्टी उच्चतम सद्गुणांचा उदय होण्यासाठी आणि काम, क्रोध, लोभ, मद, मोह व मत्सर ह्या अधम विकारांना दाबून टाकण्यासाठीं आवश्यक मानल्या होत्या आणि त्यांच्यायोगेंच उत्तम सामाजिक जीवन शक्य समजलें जात असे.

---

## प्रकरण पांचवें

# मानवी जीवनाचीं उच्च ध्येयें व अंगें

मनुष्यसमाजांत निरनिराळ्या प्रकारचें जीवन दिसून येतें. त्यामध्यें श्रेष्ठ व कनिष्ठ प्रकार सांपडतात. अशा प्रकारच्या जीवनवैचित्र्यांत कोणत्या वळणाचें जीवन उत्तम ह्याची जाणीव आपणांस करून घेणें इष्ट आहे, कारण आपल्याला ज्या प्रकारें समाजाचें जीवन उत्कृष्ट

होईल ते प्रकार व त्यांतील तत्त्वें शोधून काढावयाचीं आहेत. ज्यायोगें समाजाचें सामर्थ्य वाढेल व त्याचा उपयोग समाजाच्या कल्याणाकरतां व प्रगतीकरतां होईल तें केलें पाहिजे.

उत्तम व सुखमय जीवनाच्या कल्पना जुन्या परंपरा, वर्तमान गरजा व पुढील ध्येयें ह्यांच्यावर अवलंबून असतात आणि त्या प्रत्येक लोकांच्या संस्कृतींत ग्रथित झालेल्या सापडतात. त्यामध्यें स्थल, काल व कार्य ह्यांना अनुसरून वाढ व बदल होतात. सध्या आपण ठोकळ मानानें पौर्वात्य व पाश्चात्य असा त्यांचा विभाग करतों, व अधिक विशद रीतीनें हिंदी, चिनी, मुसलमानी, ग्रीक, ख्रिस्ती व युरोपीय अशा प्रकारचें त्यांचें वर्गीकरण करतों. त्या प्रत्येक संस्कृतीचा मनुष्याचें अंतिम सुख व व सामाजिक संघटना, प्रपंच व परमार्थ याविषयीं विशेष प्रकारचा दृष्टिकोण व मार्ग असतो. त्या प्रत्येकांनी मानवी जीवनाच्या अनेक अंगांची व प्राप्तव्यांची लावलेली संगति व केलेली योजना यामध्यें बरेच भेद दिसून येतात. त्यांचीं ध्येयें व आवश्यकता, संस्कार, परिस्थिति व परंपरा हीं सारखीं नसल्यामुळें व त्यांच्या थोर पुरुषांच्या चारित्र्यवैचित्र्यामुळें त्यांच्या स्वभावाला व संस्कृतीला भिन्न वळण लागलेलें आढळतें.

येथे प्रथम हिंदी संस्कृतीचीं मुख्य लक्षणें सांगून नंतर आपणांस उच्च मानवी जीवनाला व संस्कृतीला आधुनिक काळांत पोषक होणाऱ्या कल्पनांचा विचार करावयाचा आहे.

जगांतील सुधारलेल्या मानववंशांत आर्यवंश हा प्रगतीच्या अग्रभागीं आहे. आर्यांचा इतिहास व संस्कृति फार प्राचीन असून त्यांची सर्वोत्कृष्ट वाढ झाली आहे. त्यांचें तत्त्वज्ञान हें जीवनाला वीर्यशाली, सद्गुणी आणि उपयोगी करणारें असून, त्यांचें मन नवीन विचार ग्रहण करणारें आहे. ह्या आर्यवंशाची " हिंदी आर्य " ही मोठी शाखा असून त्यांचा वेदाच्या काळापासून गेल्या सुमारें ७००० वर्षांचा मननीय इतिहास आहे. त्यांनी ठरविलेल्या जीवनाच्या ध्येयांना, तत्त्वांना जगाच्या जीवनविषयक विचारांत व आचारांत फार उच्च स्थान मिळालें आहे. त्यांनी व्यक्तीच्या व समाजाच्या उत्कृष्ट जीवनक्रमाचीं तत्त्वें व

उद्देश ठरविण्याचा आणि त्यांना व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी कनिष्ठ, मध्यम व उत्तम अशा जीवनोद्देशांची संगति लावून, त्यांच्यांत समतोलपणा आणून आणि क्रमाने त्याच्या उच्च नीच पायऱ्या ठरवून, मनुष्याच्या ऐहिक व पारलौकिक जीवनांत एकसूत्रता व व्यवस्थितपणा आणला आहे. त्यांनी जीवनाच्या सर्व अंगांचें, त्यांच्या आचारांचें, व्यवहारांचें व आवश्यकतांचें निरीक्षण केलें आहे. मनुष्याला उत्तम वैयक्तिक, सामाजिक आणि आध्यात्मिक जीवनक्रम व्यतीत करावयाला पात्र करावयाचें आणि अशा रीतीने त्याला त्याच्या अंतिम परिणत स्वरूपाकडे घेऊन जावयाचें हा त्यांच्या जीवनशास्त्राचा आणि तद्विषयक तत्त्वज्ञानाचा उच्च हेतु आहे. मनुष्यांना सामाजिक व वैयक्तिक ध्येयें लावून देऊन तद्विषयक अनुभव त्याला प्राप्त होतील असे आचार घालून दिले आहेत. चार वर्ण, चार आश्रम, चार पुरुषार्थ व चार युगें, तीन लोक, तीन अवस्था, तीन गुण व तीन दंड, कर्म व पुनर्जन्म, पुरुष व प्रकृति, ह्या प्रमेयांचा, समजुतींचा व संस्थांचा आश्रय करून त्यांनी आपलें समाजशास्त्र रचिलें आहे व समाजाची संघटना केली आहे. ह्या कल्पनांच्या आधारें त्यांनी आपला ऐहिक व पारलौकिक जीवनक्रम रचला आहे व त्याच्या आवश्यकतेनुसार निर्बंध घालून दिले आहेत. ह्या यमनियमादिकांमध्यें त्यांनी मनुष्य ही एक स्वतंत्र व्यक्ति आणि समाजाचा एक घटक ह्या दोन्ही दृष्टींनी त्याचे आचार, व्यवहार व दंड मांडले आहेत. त्यामध्यें त्यांनी मनुष्यांतील आदितत्त्व, त्याचा स्वभाव, त्याचीं कर्में व कर्मांचीं फळें, त्याच्या जीवनांतील भिन्न अवस्था व त्याच्या स्वभावानुसार त्यांचे भेद, त्याचीं नानाविध साध्यें, त्याच्यावरील बंधनें, त्याचा काल व सृष्टि ह्यांच्याशीं संबंध, त्याचें विश्वांतील अंतिम स्थान आणि त्याचें अंतिम ध्येय, इत्यादि गोष्टी ग्रथित केलेल्या आपल्याला आढळून येतात.

हिंदू शास्त्रकारांनी हें जग व त्यांतील जीवनक्रम ह्यांची उपेक्षा केली नाही. जगांतल्या व्यवहारांत व जीवनक्रमांत प्रत्यक्ष अनुभवावरच त्यांनी भर ठेवला आहे. त्यांनी जीवनाचीं सर्व अंगें, त्याच्या अवस्था व कार्यें ह्यांची योग्य आखणी व अभ्यास करून मनुष्यजीवन संघटित केलें आहे,

व मनुष्याच्या परम ध्येयाशीं त्याचा संबंध उत्तम रीतीनें बसवून दिला आहे. मनुष्याच्या संपूर्ण जीवनाची अंतिम संगति लावतांना मनुष्याच्या सामाजिक अंगांना मानवी अस्तित्वाचें जें मुख्य साध्य त्याच्यापेक्षा कनिष्ठ स्थान दिलें आहे. मानवी जीवनाचीं ध्येयें, हेतु व कार्यें, त्यांचे वास्तविक परस्पर संबंध सापेक्ष उच्चनीचत्व, ह्याचा समन्वय करणें, हें तत्त्व हिंदुसंस्कृतीच्या मुळाशीं अनुस्यूत आहे. मनुष्यांतील प्रत्येक स्वभावविशेष, मनुष्याच्या आयुष्यांतील प्रत्येक अवस्था, मनुष्याच्या जीविताचा प्रत्येक वैयक्तिक व सामाजिक हेतु, हीं सर्व परस्परांशीं संबद्ध आहेत, असें त्यांनी धरलें आहे. त्यांच्यापैकी प्रत्येकाचा आचार व अनुभव इतरांच्या साहचर्यानें व योग्य प्रमाणांतच झाला व घेतला पाहिजे. त्यांपैकी एकालाच प्राधान्य दिलें किंवा एकाचेंच अनुसरण केलें तर त्यामुळें जीवनाला अपूर्णता, स्वार्थपरता व विपर्यस्तता येते. तें पूर्ण समाजपर रहात नाही. म्हणून, एकाच अंगाचें गुणाचें, स्थितीचें अथवा हेतूचें प्राबल्य होणार नाही, अशा रीतीनें योग्य प्रमाणांत त्यांचा समन्वय झाला पाहिजे आणि त्याच्याहून श्रेष्ठ असलेल्या प्रकाराशीं व ध्येयाशीं त्याचें कनिष्ठत्व राख लेंगेलें पाहिजे.

प्रत्येक मनुष्याला त्याचें स्वतःचें असें एक विशिष्ट कार्य व तें करावयाचा काल हीं नेमून दिलीं आहेत. त्याच्या आयुष्यांतील प्रत्येक अवस्थेला तदनुरूप कसोटीचे प्रसंग व स्वभावविशेष लावून दिले आहेत चार वर्ण, चार आश्रम, चार पुरुषार्थ ह्या योजनेचें मूळ, कामाची वर्गवारी करून आणि साध्य करावयाचीं ध्येयें ठरवून, निरनिराळ्या व्यक्तींना त्यांच्या गुणकर्माप्रमाणें कामें वाटून द्यावयाचीं आणि श्रमविभाग करावयाचा, ह्या कल्पनेंत आहे. पण हें सर्व ठरवितांना मनुष्याला सद्गुणी जीवन कसें घालवितां येईल व परलोकांत आध्यात्मिक जीवन कसें प्राप्त करून घेतां येईल, हीच मुख्य दृष्टि त्यांनी ठेवली आहे. मनुष्याला आयुष्याच्या सर्व अवस्थांतून जावें लागावें, अनुभवाचे सर्व प्रसंग त्याच्यावर यावे, सर्व भोगोपचार त्याला प्राप्त व्हावे आणि अशा रीतीने जगांत प्रवृत्तिमार्ग आचरीत असतां, ज्याच्या योगाने सर्व अशाश्वत पदार्थांविषयीं व आकांक्षांविषयीं त्याची आसक्ति सुटून, तो पूल मुरडून मोक्षाला नेणाऱ्या निवृत्तिमार्गाकडे येईल असा

अनुभव त्याला प्राप्त व्हावा, अशी योजना त्यांनी केली आहे. मनुष्याच्या आयुष्यांतील प्रत्येक क्षण व प्रत्येक हालचाल ही उच्चतर ध्येय प्राप्त करून घेण्याच्या दृष्टीने संघटित करतां येते, असा त्यांचा विश्वास आहे. हें ध्येय योग्य कां तें ध्येय योग्य, ही उपासना श्रेष्ठ कां ती उपासना श्रेष्ठ, असले विरोध ते उत्पन्न करीत नाहीत. तर प्रत्येकाने आपलें विशिष्ट कार्य व कार्यक्षेत्र निवडावें आणि त्याच्या मागे लागावें असें ते सांगतात. मात्र त्या निवडलेल्या आयुष्यक्रमाचा इतर व उच्चतर जीवनाच्या अंगांशीं असलेला सापेक्ष संबंध आपण नेहमी दृष्टीसमोर ठेंवला पाहिजे आणि आपल्या गुणकर्मस्वभावाच्या योगाने इतर कार्यांची अधोगति होणार नाही अशी काळजी घेतली पाहिजे.

जगांतलें आयुष्य मुख्यत: साहचर्य व स्वानुभव ह्यांचें आयुष्य आहे. इतरांशीं साहचर्य करावयाचें व स्वानुभव मिळवावयाचा. ह्या जगांत राहणाऱ्या अनेक व्यक्तींपैकी आपण एक असून त्या अनेकांशीं आपला योग्य व्यवहार व्हावयास पाहिजे म्हणून प्रत्येक वर्णाचे, प्रत्येक आश्रमाचे प्रत्येक पुरुषार्थाचे वागण्याचे नियम, शिक्षणाचे विषय व अनुशासनें हीं ठरविलीं आहेत. धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या विषयांच्या शास्त्रांत त्या सर्वांचा समावेश केलेला आहे. त्यामध्यें उत्तम ब्रह्मचारी, उत्तम गृहस्थ, उत्तम वानप्रस्थ व उत्तम संन्यासी; त्याचप्रमाणें उत्तम ब्राह्मण, उत्तम क्षत्रिय, उत्तम वैश्य व उत्तम शूद्र; तसेंच उत्तम राजा, राज्य, मंत्री, प्रजा, राष्ट्र इत्यादिकांचा जीवनक्रम, अधिकार व कर्तव्यें हीं आखून दिलेलीं आहेत: आणि त्यामध्यें आदर्शभूत धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या पुरुषार्थांचें विवेचन केलें आहे. तसेंच त्या सर्वांचा सामान्य धर्म सांगून, त्यांचे आपद्धर्म, गुणधर्म व स्वभावधर्मही वर्णिलेले आहेत. शेवटीं दुर्वृत्ताच्या म्हणजे आपल्या स्थानापासून व नियत कर्मापासून पतित झालेल्या मनुष्याच्या जीवनक्रमाचें दिग्दर्शन करून, अधर्म्य व अयोग्य रीतीने आयुष्य घालविल्याने येणाऱ्या सामाजिक आपत्ति व होणारे दुष्परिणाम दाखवून दिलेले आहेत.

आपल्या अनेक समाजिक कर्तव्यांचा योग्य क्रम लावून देणें अशी नागरिकत्वाची एक व्याख्या आहे. जीवनाच्या निरनिराळ्या अंगांसंबंधी

आपल्या कर्तव्यांचें व कार्यांचें सापेक्ष महत्त्व ठरवून तीं पार पाडणें हा नागरिकत्वाचा उद्देश आहे. आपल्याला साधावयाचा उद्देश आणि आपण ज्यांचे घटक आहोंत त्या संस्था ह्यांच्या क्रमवार महत्त्वाची तुलना करून संगति लावून घ्यावी लागतें आणि नंतर भिन्न कर्तव्यांचा क्रम लावण्याचें काम हातांत घ्यावें लागतें. हिंदूंनी आपल्या सामाजिक संस्था व ध्येयें ह्यांची संगति व योग्य क्रम ठरविण्याचें कार्य केलें आहे. चार पुरुषार्थ, चार वर्ण व चार आश्रम ह्यांच्यामध्यें त्यांनी संगति लावून, श्रेष्ठकनिष्ठत्वाचा योग्य क्रम घालून दिला आहे. त्यायोगें प्रत्येक नागरिकाला भिन्न ध्येयें, भिन्न संस्था व भिन्न समजुती ह्यांच्यांत विरोध उत्पन्न झाला असतां कोणत्या प्रसंगीं कोणतें कार्य अधिक महत्त्वाचें मानलें पाहिजे हें साधारणपणें समजतें. याबद्दल त्यांनी एक सामान्य नीतिनियम सांगितला आहे, तो असा.

त्यजेद्देहं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् ।
ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥

आपल्या कुलाच्या हितासाठी देह अर्पण करावा, आपल्या ग्रामाच्या हितासाठी कुलाचें हित सोडावें, देशाच्या हितासाठी आपल्या गांवाचें हित सोडावें आणि आपल्या आत्म्याच्या कल्याणासाठी संसाराचा त्याग करावा. ह्या वचनांत लहान संघाचा त्याहून मोठ्या संघाशीं योग्य संबंध दाखवून निरनिराळ्या संघांची लोकहिताच्या दृष्टीने उच्चनीचता ठरविली आहे. तसेंच आपल्या भिन्न हितसंबंधांत व कर्तव्यांत विरोध आला असतां ग्राह्य काय व त्याज्य काय हेंही दाखविलें आहे. आत्म्याची मुक्ति हें त्यांनी सर्वांत उच्च ध्येय धरलें आहे. पण संसारांतील व्यवहारामध्यें स्थानिक हितसंबंधांना राष्ट्रीय व मानवी हितसंबंधापेक्षा कमी लेखलें आहे. आधिभौतिक जीवन आध्यात्मिक जीवनापेक्षा आणि स्थानिक जीवन लोककल्याणकारक जीवनापेक्षा कनिष्ट ठरविलें आहे. तरीपण हिंदू नीतिशास्त्रकारांनी मानवी जीवनाच्या सर्व प्रकारांचें काळजीपूर्वक परिशीलन केलें आहे, त्याच्या सर्व शक्तींना व उत्साहांना प्रकट व्हावयाला संधि दिली आहे आणि जीवनाच्या नियमबद्ध योजनेंत त्यांचा चांगला उपयोग करून घेतला

आहे. मनुष्यांना आपल्या मनोवृत्तींप्रमाणें वागण्याची मोकळीक ठेंविली आहे. मात्र त्यांनी त्या मनोवृत्ति शुद्ध कराव्या, त्यांना वळण द्यावें, त्यांना संयम शिकवून योग्य मार्गं लावावा असें सांगितलें आहे. त्यांनी मनुष्याच्या मूल मनोविकारांना दुष्ट किंवा अयोग्य मानलेलें नाही. त्यांनीं मनुष्य हा स्वभावतः अपकारी व अप्रामाणिक असा मानलेला नाही, तर कांही अंशीं अडाणी व आळशी असा मानलेला आहे. त्याला ज्ञानी, उपकारी, सद्वृत्तीचा व शीलवान बनविणें हा त्यांचा उद्देश आहे. हेंच त्यांचें नागरिकनीतीचें उच्च ध्येय आहे. प्रत्येक मनुष्यानें आपलें कार्य व भूमिका पूर्णपणें पार पाडली पाहिजे, आणि आपल्या जातीला, संस्कृतीला व स्वतःला वरच्या कक्षेंत नेण्याचा भार उचलला पाहिजे. वरच्या प्रतीचा जीवनक्रम उत्पन्न करणें हें नागरिकत्वाचें ध्येय आहे, केवळ नागरिकाने कांही सत्ता व अधिकार उपभोगणें आणि कांही राजकीय कार्यें व कर्तव्यें करणें हा नाही. नागरिकत्वाचें हें ध्येय जेथे शिक्षणाला व लोकसेवेला उत्तम संधि मिळते अशा स्थानिक परिस्थितींत उत्तम पार पाडतां येतें. तेथेच नागरिकाला आपलें कार्य करण्याला पूर्ण अवकाश व उत्तेजन मिळतें आणि तेथेच त्याला आपल्या सर्व शक्ति, भावना, उल्हास व गुण ह्यांचा उपयोग करण्याचें निश्चित ठिकाण सांपडतें.

अशा प्रकारचीं हिंदूंच्या उच्च व उदार जीवनाचीं तत्त्वें व ध्येयें आहेत. आधुनिक काळांतील जीवनाच्या निरनिराळ्या अंगांचा व ध्येयांचा यापुढे विचार केला आहे.

भौतिक जीवनाचा शरीराच्या धारणाशीं व पोषणाशीं संबंध असतो. अगदी कमींत कमी म्हणजे अवश्यमेव असें मनुष्याच्या राहणीचें मान ठरवून त्याप्रमाणें सर्वांना राहतां येईल अशी व्यवस्था होणें ही मनुष्याची पहिली आवश्यकता होय: अन्नवस्त्र, घरदार, वायुजल, विद्याविश्रांति व औषधोपचार ह्या राहणीच्या आवश्यक गोष्टी असून त्या कोणत्याही स्थितींतल्या माणसाला मिळाल्या पाहिजेत. त्याच्या आयुष्याची योग्य वृद्धि होण्यास थोड्याशा सुखसोयी आणि आरामाचीं व श्रमपरिहाराचीं साधनें-ही पाहिजेत. मनुष्य हा वृद्ध, अपंग, रुग्ण, उद्योगरहित अथवा अडाणी कसाही असो त्याला जीवनाच्या मूळ आवश्यक गोष्टी मिळाल्याच पाहिजेत,

मग त्या मिळण्याकरतां त्याला कांही श्रम व सेवा करतां आली नाही तरी चालेल. देशाच्या संपत्तीची व भौतिक सामग्रीची देशांतील लोकांमध्यें योग्य वाटणी झाली पाहिजे किंवा त्यांना तिचा योग्य उपयोग करतां आला पाहिजे. कांही थोड्या लोकांच्या हातांत सर्व संपत्ति व सामग्री स्वामित्वाच्या रूपाने एकत्रित होऊन इतर बहुजन समाजांत अठराविश्वे दारिद्र्य पसरण्याने परस्पर वैमनस्य, दास्यवृत्ति व दुःख उत्पन्न होतें. ह्याचा परिणाम सामाजिक व्यवस्था विस्कळीत होण्यांत होऊन दीन लोकांचे क्लेश व असहायता हीं वाढतात. कौटिल्य म्हणतात "सुखस्य मूलं धर्मः" म्हणजे सुखाचें मूळ धर्म आहे. आणि "धर्मस्य मूलं अर्थः" म्हणजे धर्माचें मूळ अर्थ आहे. आर्थिक जीवन समाधानकारक असण्याबर नैतिक व आध्यात्मिक जीवन अवलंबून आहे. "बुभुक्षितः किं न करोति पापं" पोटांत कावळे कोकावूं लागले म्हणजे मनुष्य कोणतेंही पाप करावयाला सिद्ध होतो. आधी पोटापाण्याची सोय केल्यावांचून मनुष्याला गत्यंतर नाही.

जीवनाच्या नैतिक, बौद्धिक व भावनात्मक अंगांचा मनुष्याच्या मनाच्या व सामाजिक प्रवृत्तीच्या वाढीशीं व सिद्धतेशीं संबंध आहे. त्यांचा मनुष्याच्या शिक्षणपद्धतीशीं अधिक संबंध येतो, कारण शिक्षणद्वारें निरामय मन व साहसी, संयमी व निःस्वार्थी मनुष्य निर्माण करण्याचें कार्य होतें. मन वा विवेक हा मनुष्याचा विशेष आहे. तेंच त्याच्या बंधनाचें व स्वातंत्र्याचें कारण आहे. निरोगी शरीरांत निरामय मन वास करतें, अशी रोमन लोकांची म्हण आहे. विचार करणें हें मनाचें कार्य आहे, आणि निर्दोष विचार करणें—बऱ्या वाइटाची व पापपुण्याची निवड करणें—हें शिक्षित व सुसंस्कृत मनाचें कार्य आहे. जेव्हा हें उच्च कार्य मनाला करतां येईल तेव्हाच मनुष्याचें नैतिक जीवन सुधारतां येईल व त्याचें भावनात्मक जीवन सुंदर करतां येईल. खऱ्या नैतिक जीवनाची ओळख आणि उच्च मनोविकार व उत्कट भावना यांच्यापासून उत्पन्न झालेली योग्य स्फूर्ति व कर्तृत्वशक्ति ही वरच्या प्रतीच्या बौद्धिकजीवनावर अवलंबून आहे. करावयाच्या कार्यांत आपलें सारें मन व हृदय ओतण्याने वरिष्ठ प्रतीचें नैतिक जीवन प्राप्त होतें. दशलाक्षणिक धर्मावर हिंदूंच्या उच्चनीतिविषयक कल्पना बसविलेल्या आहेत. त्यांची योग्य

कल्पना होणें व निरनिराळया प्रसंगीं त्यांचा योग्य उपयोग करतां येणें हें सद्‌गुणी माणसाला साधतें. तेव्हा हिंदूंनी सद्‌गुणी व सदाचारी माणसाला महत्त्व दिलेलें आहे. पाश्चात्यांनी निराळया तऱ्हेने उत्तम नैतिक कल्पना सांगितलेल्या आहेत. स्वतंत्रता, समता, बंधुता, राष्ट्रीयता, विश्वकुटुंबता, लोकसत्ता, न्यायशीलता व प्रगतिशीलता ह्या त्या होत.

आध्यात्मिक अंगांचा मनुष्याच्या आत्म्याच्या ध्येयाशीं, परिणतीशीं व ऐहिक मार्गक्रमणाशीं संबंध असतो. आत्म्याचा विकास व्हावयाला अवश्य असणारे संयम व संबंध, योग व त्याग त्यांत सांगितलेले असतात. आध्यात्मिक जीवनाचीं मूलतत्त्वें व उत्कृष्ट स्थिति याबद्दल निवेदन करतांना आत्म्याचें सभोंवारच्या परिवारांतील स्थान, त्याचें खरें स्वरूप व वास्तविकपणा, त्याच्या विकासाचा क्रम, जगाच्या भौतिक जीवनांत त्याचें महत्व, देहावरील व समाजावरील त्याचें वर्चस्व, त्याचा परमतत्त्वाशीं संबंध, इत्यादि प्रश्नांचा ऊहापोह केला जातो. हिंदूंच्या मताप्रमाणें आध्यात्मिक जीवनाचें ध्येय मोक्ष हें असून प्रवृत्ति व निवृत्ति, संसार व संन्यास, हे त्याच्या प्राप्तीचे मार्ग आहेत. संसारचक्रांतून म्हणजे नेहमीच्या जननमरणाच्या फेऱ्यांतून मनुष्याची सुटका म्हणजे मुक्ति करणें हें त्यांचें ध्येय आहे.

समाजाला स्फूर्ति देणारीं ध्येयें जर चांगलीं असतील तरच उत्तम जीवन शक्य आहे. समाजाचें शरीर योग्य प्रकारचें असलें पाहिजे, इतकेंच नाही तर त्याचीं ध्येयें हीं उच्च प्रतीचीं असलीं पाहिजेत. तेव्हाच तो उत्कृष्ट नागरिक होऊं शकेल. हें उत्तम जीवन कोणतें आणि हीं सर्वोत्कृष्ट सामाजिक व राजकीय ध्येयें कोणतीं ह्या प्रश्नाचें उत्तर सोपें नाही. त्याविषयीं फार थोडया लेखकांमध्यें एकवाक्यता आहे.

ध्येयें हीं विद्यमान संस्था व समजुती यांच्यामध्यें परिवर्तन व प्रगति घडविणाऱ्या आणि समाजाला साध्यभूत झालेल्या मोठया पुरुषांच्या कृति व आकांक्षा होत. आदर्शभूत ऋषि, व राजे, साधु व संत, पुढारी व प्रणेते आणि संस्था व संघटना ह्यांच्या रूपाने तीं ध्येयें मूर्त स्वरूपांत वावरतात किंवा केवळ तत्त्वें व उपदेश यांच्या द्वाराने तीं मनुष्यांच्या मनावर बिंबविलीं जातात. तीं सुधारणांच्या अथवा क्रांतीच्या मार्गानें

समाजाच्या विद्यमान रचनेला व उद्देशांना वळण लावतात. समाजांतील ध्येयांचा उद्देश हा कर्तृत्वक्षम व सर्वोत्कृष्ट मनुष्य आणि सुव्यवस्थित व कर्तृत्ववान् समाज निर्माण करणें हा आहे.

उत्तम जीवन हें सद्गुणी व सदाचारी, सदिच्छेचें व उद्योगी, सार्वजनिक हितबुद्धीचें व लोकसेवेचें असलें पाहिजे. उदारचरिताचें व सत्पुरुषाचें जीवन म्हणजे परार्थासाठी व परहितासाठी घालविलेलें जीवन हेंच उत्कृष्ट प्रकारचें सामाजिक व नैतिक जीवन होय.

सांप्रत उच्च वर्ग व श्रेष्ठ वर्ण व वंश अशा कुलीनत्वाच्या व जातिविषयक कल्पनेला जागा नाही. जातिदृष्टीने रचलेल्या अग्रज व अंत्यज भावना आणि गुणदृष्टीने पत्करलेल्या कुलीनत्वाच्या भावना यांना आज स्थान नाही. कुलाभिमानी, शीलसंपन्न, भोगविश्रांतिसंपन्न आणि संगीतकलासंपन्न अशा पुरुषांना समाजाच्या मानपानांत व अधिकारयोगांत विशेष वैयक्तिक स्थान नाही. सांप्रतच्या समाजाची संघटना लोकसत्तेच्या तत्त्वांवर आणि समता, स्वतंत्रता व राष्ट्रीयता अशा कल्पनांवर बसविली आहे. ह्या प्रकारच्या व्यवस्थेमुळें व ध्येयामुळें सर्व सन्मान्य व सामान्य लोकांना सारखें अधिकार, स्वातंत्र्य व सुख हीं प्राप्त झालीं पाहिजेत आणि उपयुक्ततावादी म्हणतात त्याप्रमाणें 'पुष्कळांचें पुष्कळ सुख' संपादिलें गेलें पाहिजे.

समाजाच्या स्वास्थ्यासाठी दोन गोष्टींची आवश्यकता असते : एक सुव्यवस्था व दुसरी प्रगतीची व सुधारणेची संधि.

एकमेकाविषयींच्या आदरामुळें व सहिष्णुतेमुळें समाजामध्यें सुव्यवस्था ठेवतां येते. प्राप्त झालेल्या गोष्टीचें संरक्षण करणें व मनुष्याच्या जीविताला व सुधारणेला लागणारी शांततेची परिस्थिति उत्पन्न करणें हा सुव्यवस्थेचा उद्देश असतो. सुव्यवस्थेवांचून समाजाला त्यानें मिळविलेल्या सुखसोयींचा उपभोग घेतां यावयाचा नाही, अथवा विशिष्ट प्रकारचें सामाजिक जीवन कसें असतें याचा अनुभव घेतां यावयाचा नाही, अथवा सुधारणा करतां यावयाची नाही. कारण, निश्चित स्वरूपाच्या व चालू असलेल्या सामाजिक स्थितीचा कांही काळ कटु अनुभव आल्यानंतरच व त्याचें योग्य परीक्षण केल्यानंतरच सुधारणेची इच्छा उत्पन्न होते व

प्रयत्न होतो. सुधारणा साध्य झाल्या म्हणजे समाजाची नवीन व्यवस्था सूचित होते व ती व्यवस्था प्रस्थापित झाली म्हणजे ती नव्या सुधारणांचा विचार करूं लागते व त्यांच्याकडे घेऊन जाते. सुव्यवस्था ही सुधारणा व प्रगति यांचा पाया असून त्यांना अनुकूल व पोषक अशी संधि ती निर्माण करते.

सुव्यवस्थेसाठी राष्ट्राचे विधिनिर्बंध व समाजाचे नीतिनियम व परंपरा ही शिरसामान्य करण्याची वृत्ति आवश्यक आहे. ह्या बंधनांचें स्वरूप दुष्ट–निग्रहात्मक व शिष्ट–अनुग्रहात्मक असतें. पण सुव्यवस्थेसाठी जर अन्यायाचे विधिनिर्बंध, नीतिरहित नियम आणि विवेकशून्य चालीरीती यांच्या आज्ञांकित व्हावें लागत असेल तर ती सुव्यवस्था नसून एका बाजूने जुलुमजबरदस्तीची व दुसऱ्या बाजूने गुलामगिरीची स्थिति आहे. ती स्वातंत्र्याची व समतेची स्थिति नव्हे. सुव्यवस्थेमध्यें प्रगति व सुधारणा यांना योग्य अशी परिस्थिति अभिप्रेत आहे आणि म्हणून स्वतंत्रता हें सुव्यवस्था व प्रगति ह्यांचें एक आवश्यक लक्षण आहे. स्वातंत्र्यावांचून मनुष्याला व समाजाला जीर्ण झालेल्या कल्पना व रीतिरिवाज आणि प्रतिकूल व प्रतिगामी बंधनें यांना सोडून हलतांच यावयाचें नाही. बुद्धिमान व भावनाप्रधान माणसांना सुव्यवस्थेच्या व स्वतंत्रतेच्या स्थितींत आपले विशेष विचार, भाव व आकांक्षा प्रकट व प्राप्त करतां येतात. सुव्यवस्थेच्या व प्रगतीच्या दृष्टीने स्वतंत्रतेइतकेंच शिक्षणाचेंही महत्त्व आहे. त्याच्या योगाने नवीन कल्पना आकलन करावयाला मनुष्य सिद्ध होतो. सुव्यवस्था व प्रगति ह्यांचें महत्व समजावयाला मनुष्याने त्यांच्याशीं निष्ठायुक्त होऊन त्यांची उपयुक्तता मान्य केली पाहिजे. शिक्षण हें मनाची तयारी करतें आणि परिस्थिति त्याला नवीन ध्येयें व सुधारणा पसंत करावयाला व अनुसरावयाला लावते.

मानवसमाजाच्या सर्वांगीण व सदैव होणाऱ्या प्रगतीची कल्पना नवीन आहे. पूर्वी अधोगतीच्या, चक्रनेमिक्रमाच्या, प्रलयाच्या व परमेश्वरी योजनेच्या कल्पना मान्य समजल्या जात. पण सांप्रत प्रगतीची कल्पना शिष्टसंमत झाली आहे. तिच्यामुळें मनुष्यांत प्रयत्नाची दृष्टि, महत्त्वाकांक्षेची वृत्ति, स्वातंत्र्याचा उत्साह, उत्थानधीरत्व आणि साहसाचें वर्तन दिसून येतें. मनुष्य आपल्या सत्कर्मांमुळें सुधारणा करूं शकतो व

सर्व समाजाला संस्कृतीच्या दृष्टीने पुढे नेतो, असा सध्या लोकांचा दृढ-विश्वास आहे आणि इतिहासाचाही त्याला आधार आहे. त्यावरून मनुष्य व त्याचा समाज आणि संस्कृति हीं प्राथमिक रानटी अवस्थेंतून हळू हळू सुधारत कृषिप्रधान, उद्यमप्रधान, विवेकप्रधान, शीलप्रधान, अध्यात्मप्रधान अशा अनेक अवस्थांतून जाऊन आज प्रौढ स्थितीप्रत, पोहोंचलीं आहेत. त्यामध्यें अनेक लोकांच्या दळणवळणाने, विचार-विनिमयाने व अनुकरणाने उत्पन्न झालेले आचारविचार, विद्याकला, चालीरीती हीं मिश्रित झालीं आहेत. सामान्यतः जगाची यापुढे एकच प्रकारें सुधारणा होणार अशी आज दृढ समजूत आहे. त्यामध्यें कांही लोकांचे जुने विशेष अवशेषरूपानेच राहतील असें मानलें जातें. सत्ययुग अथवा सुवर्णयुग हें गेलें नाही तर यावयाचें आहे असें धरलें जातें.

प्रगतीच्या कल्पनेंत मनुष्याच्या व समाजाच्या सद्गुणवृद्धीकडे, उपकारवृत्तीकडे, सेवाभावाकडे, समतादृष्टीकडे, भलेपणाकडे, सहकारा-कडे व मैत्रीकडे, आरोग्य, आयुष्य व आराम यांच्या वाढीकडे, शिक्षण व ज्ञान यांच्या प्रसाराकडे, विशेष लक्ष द्यावें लागतें. नुसती लोकसंख्या, धनसामग्री, शास्त्रशोध व कलाकौशल्य ह्यांच्या वाढीकडे लक्ष देऊन चालत नाही. प्रगतीची उपयुक्तता नुसत्या परिमाणरूपांनी करावयाची नसून, परिणामरूपांनी व परिणत दृष्टींनी करावयाची आहे. त्यायोगें व्यक्तीची शारीरिक, मानसिक, नैतिक, सामाजिक व आध्यात्मिक उन्नति झाली पाहिजे.

स्वतंत्रता ही ग्रीक राजकीय जीवनाची प्रमुख कल्पना होती. स्वातंत्र्याचा अर्थ परकीय राजसत्तेचा अभाव इतकाच नसून त्यांत नाग-रिकांना राज्यकारभारामध्यें योग्य भाग घेतां येणें, योग्य न्याय मिळणें आणि त्याची निर्बंधांच्या दृष्टीने समानता मानणें हे अधिकार अंतर्भूत होत. राज्यसंस्था ही प्रजेला जखडणारी शृंखला किंवा दडपणारी अरेरावी शक्ति नव्हती. शासितांच्या संमतीवर तिचें अस्तित्व होतें. त्यांना तिच्यांत प्रत्यक्ष अधिकाररूपाने भाग घेतां येत असे. शिवाय, ग्रीकांच्या कल्पनें-प्रमाणें स्वातंत्र्यामुळें त्यांना विश्रांतीचें, बौद्धिक व ललित कलाकृतींचें, सामाजिक सदभिरुचीचें आणि सौख्याचें जीवन प्राप्त होई.

अलीकडील काळांत स्वतंत्रतेमध्यें लोकनैतिक, राजनैतिक, राष्ट्रीय आणि धार्मिक स्वातंत्र्याचा व अधिकाराचा समावेश केला जातो. ह्या सर्व दृष्टींनी प्रत्येक व्यक्तीला कांही मूलभूत अधिकार असले पाहिजेत व कांही सुखसोयींची परिस्थिति प्राप्त झाली पाहिजे. राज्यतंत्रच सर्वस्वीं अधिकारी आहे हें मत आता मान्य नाही. त्याला नैतिक मर्यादा आहेत. त्याने निर्बंधांना अनुसरून वागलें पाहिजे. मानवी कल्याणाचें व संरक्षणाचें तें एक प्रमुख साधन आहे, एवढेंच. मनुष्याच्या अंत:करणामध्यें पवित्र व चांगलें असें कांही तरी आहे अशी कल्पना स्वातंत्र्यामध्यें अंतर्भूत आहे, म्हणून त्याला जीवनाच्या सर्व अंगांमध्यें व व्यवहारामध्यें अधिकारकर्तव्य-रूपानें भाग घेण्याची आणि अशा रीतीनें आपल्या समाजाबरोबर आपली प्रगति करून घेण्याची मोकळीक ठेवली पाहिजे. तसेंच मनुष्यामध्यें वाईट व अज्ञानमूलक असें कांही आहे आणि म्हणूनच खऱ्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें त्याचें नियंत्रण झालें पाहिजे. सार्वजनिक हित म्हणून कांही आहे आणि त्याला वैयक्तिक व सांघिक स्वातंत्र्यामुळें हानि पोचतां कामा नये ही स्वातंत्र्याची खरी मर्यादा आहे.

पीडित राष्ट्रांना आणि पतित समाजांना स्वातंत्र्याचें ध्येय हें स्फूर्तीच्या अखंड झऱ्याप्रमाणें उपयोगी पडलें आहे. त्याने पुष्कळच जुन्या व्यवस्था पालटून टाकल्या आहेत. त्यामुळें जीवनक्रमाच्या कांही चांगल्या कल्पना पालटल्या असतील. पण एकंदरींत त्याच्या योगाने राष्ट्रीय, राजकीय, लोकनैतिक आणि धार्मिक स्वतंत्रता व सामर्थ्य लोकांना प्राप्त झालें आहे. उत्तम जीवन प्राप्त व्हावें म्हणून त्याची ध्वजा फडकवीत ठेवण्यासाटी मोठाली युद्धें व संधि झाले आहेत.

स्वातंत्र्याचा खरा उद्देश इतर मनुष्याच्या सहवासापासून पळून जाणें हा नसतो, उलट त्याच्या कारभारांत व व्यवहारांत अधिकाधिक भाग मिळविणें हा असतो. मनुष्याला इतरांशीं सहवासाची, सहकार्याची व देवघेवीची समान संधि मिळणें यांतच आनंद व स्वातंत्र्य मिळालेंसें वाटतें, कारण त्यायोगें त्याच्या कार्यक्षमतेला व कर्तृत्वाला जागा मिळते आणि त्याचें जीवन पूर्ण होतें.

सामाजिक समतेबद्दलचें भांडण किती तरी जुनें आहे व तें अद्यापि संपलेलें नाही. जातीच्या, कुलाच्या, बुद्धीच्या, नीतीच्या, सत्तेच्या, धनाच्या व व्यवसायाच्या श्रेष्ठपणामुळें उत्पन्न झालेल्या सामाजिक विषमतेविरुद्ध अधिकारहीन व धनहीन लोकांनी सारखा विरोध चालविला आहे. समता हें त्यांचें ध्येय आहे. पुढारलेल्या देशांत राजकीय दृष्टया तिला मान्यता मिळाली आहे. तिच्या योगाने सामाजिक व आर्थिक बाबतींत उच्चनीच जाती, वर्ग व वर्ण यांच्यातील भेद कमी व्हावयाला साहाय्य झालें आहे. समतेचें ध्येय हें माणसामाणसांचे हितसंबंध, त्यांच्या इच्छा व साध्यें यांतील सारखेपणा प्रामुख्याने पुढे आणतें. त्यांच्या शरीरांत, मनांत, सामर्थ्यांत आणि कर्तृत्वांत अंतर असेल पण प्रत्येक मनुष्य हा समाजशील व प्रगतिशील आहे म्हणून इतर मनुष्यांप्रमाणें त्याला सारखी संधी व स्थान मिळालें पाहिजे. आणि बुद्धिबलाने, नीतिमत्तेने किंवा सिद्धतेनें तो समान नसला तरी सामाजिक ध्येयें व हितसंबंध ह्यांच्या पुरता प्रत्येकजण समान ध्येयांचा समजला गेला पाहिजे. विधिनिर्बंधांच्या दृष्टीने सर्व माणसें सारखीं समजलीं गेलीं पाहिजेत. प्रत्येक माणसाला कमींत कमी अशी ठराविक आर्थिक सुस्थिति असली पाहिजे आणि नागरिक ह्या नात्याने प्रत्येकाचीं अधिकार-कर्तव्यें पुष्कळ अंशीं समान असलीं पाहिजेत. आर्थिक दृष्टया उदरनिर्वाहाचें व सुखसोयींचें त्यांना योग्य प्रमाण मिळण्यास व उपभोगण्यास सत्तेने साहाय्य केलें पाहिजे.

बलिष्ठाच्या किंवा जन्माने ज्यांना विशिष्ट अधिकार व साधनें प्राप्त झालीं आहेत अशा थोर लोकांच्या स्वैर वर्तनानें उत्पन्न केलेली विषमता नाहींशी करण्यासाठी समतेचें तत्व पुढे आलें आहे. ज्याच्या योगाने मागासलेल्या लोकांना अधिक चांगल्या रीतीनें राहतां येईल तें समतेचें ध्येय अत्यंत इष्ट आहे. अर्थातच समाजाची योग्य वर्गवारी लावतांना निरनिराळया माणसांच्या आवश्यकता, त्यांचें कर्तृत्व आणि त्यांचीं कार्यें ह्यांचा विचार करावा लागेल आणि तेवढयापुरता पूर्ण समतेचा नियम मर्यादित करावा लागेल, कारण प्रत्येकाकडून समान सेवा व समान कार्य होणें शक्य नाहीं.

नागरिकांनी बंधुभावाने राहावयास पाहिजे. सामाजिक जीवनाचें व समागमाचें मुख्य लक्षण म्हणजे सहकार व सेवा. प्रत्येकाने दुसऱ्याला साहाय्य केलें पाहिजे आणि त्याचें अडचणीचें काम केलें पाहिजे. कोणीही दुसऱ्यावर वर्चस्व दाखवितां कामा नये. ह्या ध्येयाप्रमाणें कुटुंबत्वाची सर्वोच्च कल्पना समाजाइतकी व्यापक करावयाची आणि बंधुत्वाची भावना सर्व नागरिकांबद्दल धरावयाची. तेथे कोणाच्या स्वार्थाला जागा नाही व दास्यत्वाला थारा नाही. तेथे प्रत्येकजण दुसऱ्याचें हित इच्छितो व त्याच्याकरतां झटतो. त्याच्यामध्यें दुसऱ्याच्या कृती व भावना याबद्दल सहिष्णुता, सहानुभूति, आदर इत्यादि गुण असावे लागतात. जसें समतेचें ध्येय सामान्य मनुष्याची योग्यता वाढवितें आणि स्वतंत्रतेचें ध्येय त्याला संधी व कार्यक्षमता देतें, तसें बंधुतेचें ध्येय मनुष्यांना ऐक्याच्या व प्रेमाच्या, करुणेच्या व मैत्रीच्या बंधनाने एक करतें.

न्याय ह्या ध्येयाची व्याख्या करणें कठीण आहे. कांहींच्या मतें विधिनिबंध अथवा धर्मवचनें, कांहींच्या मताने सदाचार, महाजनपंथ, अंतःकरणप्रवृत्ति अथवा विद्वज्जनाचे निर्णय, हीं त्याचा आधार आहेत. इतरांच्या मतें सत्य, समता, अहिंसा इत्यादि धर्म व अर्थशास्त्रकारांनी सांगितलेलीं सूक्ष्म तत्त्वें त्याच्या मुळाशीं आहेत.

सामाजिक न्यायबुद्धि ही व्यक्तीचे सामाजिक अधिकार व कर्तव्यें ठरविते आणि त्याला तीं प्राप्त करून देते. शासनाचा मुख्य हेतु रक्षण करणें व न्याय देणें हा आहे. न्यायबुद्धीच्या मुळाशीं समानत्वाचें व निःपक्षपातांचें तत्त्व आहे. त्यायोगें मनुष्यामनुष्यांमध्यें सख्य, प्रेम व विश्वास जडतो व परस्परांबद्दल द्वेष व भीति कमी होतात. दोन कलह करणाऱ्या व्यक्ति अथवा संघ यांना न्याय देणें व त्यांच्यामध्यें शांति राखणें हें शासनव्यवस्थापकांचें मुख्य कर्तव्य आहे. ते न्यायाधीशांच्या व निबंधाच्या द्वारें केलें जातें. न्यायबुद्धीवाचून समाज टिकणें शक्य नाही. मनूच्या व प्लेटोच्या मताप्रमाणें ज्या समाजव्यवस्थेमध्यें प्रत्येक मनुष्याला त्याचें योग्य स्थान व कार्य त्याच्या गुणकर्मानुसार दिलें आहे तेथे न्याय नांदतो. न्यायाचा कधीं कधी लोकमत व लोकाचार यांच्याशीं विरोध येतो.

तेव्हा ' यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं नाचरणीयम् ' या मताप्रमाणें चालावें लागतें. लोकांचें मन प्रथम सुशिक्षित केल्यावांचून नवे धर्म, नवीं ध्येयें व खरा न्याय ह्यांना ते अनुकूल होत नाहीत.

सामर्थ्य व कर्तृत्व ह्या ध्येयांचें प्राबल्य सांप्रत वाढत आहे. ज्या लोकांमध्यें तीं आहेत व जे तीं वाढविण्याची खटपट करीत आहेत त्याच लोकांची पुढे भरभराट व वाढ होणार आहे. समतेच्या तत्त्वानें व तंत्रानें जाणाऱ्या समाजामध्यें सामर्थ्यवान्, कर्तृत्वशाली, साहसी व बुद्धिमान अशा लोकांना जागा मिळणार नाही. त्यामुळें ते समाज व लोक मागे पडतील. सर्व लोक सर्व कामांना व विशेषतः अधिकाराच्या, शासनाच्या, विद्यादानाच्या, इत्यादि बुद्धि, शील, सामर्थ्य यांवर अवलंबून असलेल्या कामांना योग्य नाहीत. समाजाच्या व्यवहारांत सुस्थितीच्या व प्रगतीच्या दृष्टीने कर्तेपणाला प्रमुख स्थान पाहिजे.

कोणी कोणी लोकांनी आपलें ध्येय नुसतें, धर्म अथवा अर्थ अथवा काम अथवा मोक्ष याची प्राप्ति असें धरलें आहे. त्यामुळें अन्य पुरुषार्थाचा ऱ्हास होऊन तसे समाज सामर्थ्यहीन बनले आहेत. चारी पुरुषार्थांमध्यें समतोलपणा व योग्य श्रेष्ठकनिष्ठत्व ठेवून समाजाच्या सर्व अंगांचा परिपोष झाला पाहिजे व तो सुस्थितींत राहिला पाहिजे. नुसते धर्मप्रधान किंवा अर्थकामप्रधान किंवा मोक्षप्रधान समाज जीवनकलहांत व सद्गुणवर्धनांत मागे पडले आहेत व कांही ऱ्हास पावत आहेत.

सुख हें मनुष्यजातीचें मुख्य ध्येय आहे. पण समाजांत सर्वांचें अथवा प्रत्येकाचें सुख साध्य करणें कठीण आहे, कारण प्रत्येकाच्या सुखविषयक कल्पना समान असत नाहीत. उपयुक्ततावाद्यांनी ' पुष्कळांचें पुष्कळ सुख ' हें समाजाचें ध्येय असावें असें सुचविलें आहे. हें सुख म्हणजे मनुष्याचें तात्कालिक निकटवर्ती सुख नव्हे. तें अंतिम सुख अथवा कल्याण होय. तें निकटवर्ति सुखावर तिलांजलि देऊन महत्प्रयासानें साध्य करतां येतें. पण येथे त्या अंतिम सुखाचा अर्थ पारलौकिक सुख नव्हे. तें ऐहिक सुखाचेंच उच्च स्वरूप होय. त्यामध्यें समाजाचें हित, स्थैर्य, सुस्थिति, प्रगति, स्वातंत्र्य, सुसंपन्नता, निरामयता, इत्यादि बलवर्धक व नीतिवर्धक व अर्थवर्धक गोष्टींचा विशेषेंकरून अंतर्भाव होतो.

एकीकडे धनसंपन्न, मानसंपन्न व सत्तासंपन्न अशा लोकांचा वर्ग व त्यांनी चालविलेली अरेरावी, आणि दुसरीकडे अकिंचन, पतित व पीडित लोकांचा वर्ग व त्यांना भोगावें लागणारें दैन्य, ह्यांच्यामुळें परस्परांमध्यें विरोध व कलह उत्पन्न झाले आणि त्याबरोबरच खालच्या वर्गांमध्यें समता, स्वतंत्रता, सत्ता व मत्ता ह्यांच्या प्राप्तीची इच्छा उद्भूत झाली. ह्या गोष्टी संपादन करण्यासाठी पीडितांना व दुःखानें पछाडलेल्यांना आत्मप्रयत्नावर विसंबणें व दुसऱ्यांच्या नियंत्रणापासून व जाचापासून मुक्तता करून घेणें हे उद्देश तात्पुरते पुढे ठेवावे लागले आणि अशा रीतीनें श्रेष्ठ जीवनाचें ध्येय सर्वांना गांठतां येईल असें त्यांना वाटूं लागलें.

लोकसत्तेच्या मुळाशीं असलेल्या समता, स्वातंत्र्य, बंधुता इत्यादि तत्त्वांचा आपण वर विचार केला आहे. विद्यमान युगाच्या व्यवहारांत लोकसत्ता हें मान्य झालेलें सामाजिक, आर्थिक व राजकीय ध्येय आहे. लोकांनी प्रत्यक्ष किंवा प्रतिनिधिद्वारा राज्यकारभारांत, विधिनिर्बंधांत व न्यायनिवाड्यांत भाग घेणें हा लोकसत्तेचा राजकीय उद्देश आहे. लोकसत्ता ही सामाजिक व आर्थिक दृष्ट्या सुद्धा समता, स्वातंत्र्य व बंधुता ह्यांना प्रचारांत आणूं पाहते आणि त्यांमध्यें एकवाक्यता आणते. ज्या व्यवस्थेमध्यें प्रत्येक मनुष्याला योग्य स्थान, अवसर व कार्य मिळेल अशी लोकसमाजाची न्याय्य व्यवस्था स्थापन करण्याचा ती प्रयत्न करते.

ग्रीक नगरराज्याचे व त्यांतल्या त्यांत अथेन्सचें लोकसत्ता हें प्रधान लक्षण होतें. तिच्या वर्चस्वामुळें सार्वजनिक कार्यकर्त्यांचा असा एक मोठा वर्ग निर्माण झाला की ज्यांनी आपल्या देशाचें स्वातंत्र्य राखणें आणि देशांतील राजकीय अधिकार व लोकनैतिक व्यवहार यांमध्यें पूर्ण वांटा मिळविणें, हें आपलें जीवनकार्य व ध्येय केलें. पण अथेन्समधील लोकसत्ता प्रत्यक्ष प्रकारची होती, प्रातिनिधिक स्वरूपाची नव्हती. प्रत्येक ग्रीक नागरिक हा राज्यसंस्थेचा सभासद असून तिच्या नैर्बंधिक, शासनात्मक व न्यायदानात्मक कामकाजांत प्रत्यक्षपणें भाग घेत असे. पण ही लोकसत्तात्मक राज्यव्यवस्था केवळ जात्या ग्रीक लोकांपुरतीच म्हणजे मर्यादित

स्वरूपाची होती. इतर जनतेला तिच्यामध्यें नागरिकत्वाचें स्थान व अधिकार नव्हते. त्यामुळें त्यांना राज्यसत्तेंत व राज्यतंत्रांत भाग घेतां येत नसे.

विद्यमान लोकसत्ता ही प्रातिनिधिक स्वरूपाची आहे. मोठ्या क्षेत्राच्या व व्यवहाराच्या राज्यांत प्रत्यक्ष स्वरूपाची लोकसत्ता शक्य नाही. तेथे लहानग्या नगरराज्याप्रमाणें सर्व लोकांना विचार विनिमयासाठी एकत्र जमणें अशक्य असतें. त्यांना आपलें मत कळविण्यासाठी केवळ प्रतिनिधि पाठविणें शक्य असतें. ह्या प्रतिनिधींच्या संमतीने व विचाराने राजकीय कामकाज व शासन चालवावें लागतें. पहिल्या प्रथम हा प्रतिनिधित्वाचा अधिकार केवळ थोर कुलांतील किंवा वित्तसंपन्न लोकांना, उच्चवर्णीयांना किंवा धर्मोपदेशकांनाच होता. पण क्रमाक्रमाने वित्त व कुलसंपन्नतेचें प्रमाण कमी होऊं लागलें आणि आता प्रतिनिधिक सभेंत सर्वांना शिरण्यास मोकळीक असावी हें तत्त्व सर्वमान्य झालें आहे.

लोकसत्तेच्या ध्येयासंबंधीं कांही आक्षेप घेतले गेले आहेत. कांही आक्षेपक तिचें 'अशिक्षित व नालायक लोकांचें राज्य' असें वर्णन करतात. उदार धोरणाला व प्रगतीला ती प्रतिकूल आहे असें ते समजतात. तिच्यामुळें मनुष्याचीं मतें ठराविक साच्याचीं व स्थितिप्रिय बनतात आणि नवीन व पोषक मताला वाव राहात नाही. स्वार्थबुद्धि, नीतिभ्रष्टता, अज्ञान इत्यादि दोषांचा आरोपही तिच्यावर करण्यांत येतो. वसिष्ठऋषीनें म्हटल्याप्रमाणें :—

अव्रतानाममंत्राणां जातिमात्रोपजीविनाम् ।
सहस्रशः समेतानां परिषत्त्वं न विद्यते ॥

लोकसत्तेंत तज्ज्ञ, कर्तृत्ववान् व बुद्धिमान लोकांच्या नेतृत्वाला अवकाश नाही आणि अशाच लोकांना आधुनिक समाजाच्या बिकट प्रश्नांचा उलगडा करण्याचें सामर्थ्य असतें, असें आक्षेपकांचें म्हणणें आहे. अज्ञानी बहुजनांची सत्ता म्हणजे समाजाचा ऱ्हास व नाश आहे व बुद्धिमान महाजनांची सत्ता म्हणजे समाजाची प्रगति व कल्याण आहे.

मनुष्याचे स्वभावविशेष व प्रकार जरी अनेक असले तरी प्रत्येक नागरिकाला अनुकूल संधि आणि गुणाप्रमाणें स्थान व कार्य मिळण्याचा समान अधिकार व समान स्वातंत्र्य असलें पाहिजे, असें लोकसत्ता

सांगते. तिच्या प्रत्यक्ष आचरणांत जरी कांही दोष उत्पन्न होतात तरी पण तिच्यामुळें पूर्वीपेक्षा बहुजनसमाजाची स्थिति आज अधिक चांगली झाली आहे. लोकसत्ता ही केवळ राज्यपद्धतीच्या रूपांत चालावयाची नसून, ती एकंदर समाजव्यवस्थेचें ध्येय व धागा होऊं पाहत आहे. मनुष्य हा प्रगतिशील असेल, त्याचें ज्ञान वाढत असेल व आचरण उन्नत होत असेल तर लोकसत्ता ही समर्थनीय ठरेल. सत्ता ही स्वार्थ-पोषक व परार्थघातक होऊं शकते, म्हणून ती धारण करणारे लोक समाजदृष्ट्या ज्ञानी, नीतियुक्त व उपकारी असावे लागतात. लोकांचें कल्याण साधणें व त्यांचें रक्षण करणें ही समाजाची व राज्यपद्धतीची मुख्य कसोटी आहे; आणि ज्या समाजपद्धतींत व राज्यपद्धतींत मनुष्याच्या उच्च प्रवृत्तींना पुरेसें व निरंतर असें प्रोत्साहन मिळतें आणि जिच्या योगानें त्याच्या सर्वांगीण वाढीला साहाय्य मिळतें ती व्यवस्था अधिक मान्य झालेली आहे.

लोकसत्तेचें ध्येय उपयोगी होण्यास सर्वसाधारण लोक आळशी नसले पाहिजेत. तें जागरूक, निर्भीड, शिक्षित, विवेकशील व प्रामाणिक असले पाहिजेत. त्यांना गुणदोषपरीक्षेची चिकित्सक दृष्टि पाहिजे. त्यांना वाढत्या ज्ञानाची, विवेकाची व न्यायशीलतेची आवश्यकता आहे. स्थानिक व सार्वजनिक कारभारांत भाग घेतल्यानें हे गुण अनुभवानें वाढतात. लोकशाहीच्या यशाला लोकमत हें सुबुद्ध पाहिजे. तें विचारशील, चिकित्सक व चर्चानुकूल पाहिजे. त्याच्यामध्यें न्यायशीलता, नीति-प्रियता व सार्वजनिक भाव पाहिजे.

एखाद्या भ्रमणशील जातिसमूहानें एखाद्या प्रदेशामध्यें आपलें निवासस्थान केलें की त्यानें आपल्या सांस्कृतिक जीवनांत मोठीच क्रांति व प्रगति केली असें म्हणतां येईल. भ्रमणशील समाजाचें जीवन हें फारसें व्यवस्थित व विद्याकलायुक्त नसतें आणि त्याच्या मानसिक विकासाला व कर्तृत्वाला फारच थोडा अवसर व अवकाश मिळतो. अशा स्थितींत त्याच्या आर्थिक जीवनाचीं साधनें सुद्धां निश्चित व सुव्य-स्थित नसतात. पण एखाद्या योग्य प्रदेशावर वसाहत केल्यावर त्याला आर्थिक जीवनाच्या आवश्यक वस्तु, अन्नवस्त्र, घरदार, औषधपाणी इत्यादिकांचें निश्चित रीतीनें संपादन करतां येतें व त्यामुळें त्याच्या मानसिक विकासाला व विद्याकलांच्या वाढीला योग्य अवकाश मिळतो.

या कारणामुळें अशा समाजांतील रहिवाश्यांत त्या प्रदेशाबद्दल प्रेम उत्पन्न होतें. तो प्रदेश त्यांच्या सांसारिक आवश्यकता पुरवूं लागतो, म्हणून आपल्या धार्मिक समजुतींना अनुसरून त्या ठिकाणाला ते ग्राम-देवतेच्या अथवा क्षेत्रदेवतेच्या रूपाने पूजूं लागतात. कारण वसतीचें स्थान हेंच लोकांचें शत्रूपासून रक्षण करण्याचें, त्यांच्या आर्थिक गरजा पुरविण्याचें आणि त्यांना नैतिक व मानसिक उन्नति करण्याला अवकाश देण्याचें कार्य करतें. प्राचीन लोक अशीं कार्ये करणारी शक्ति अथवा साधन यांना देवतारूप मानीत, कारण आपल्या देवतांपासून ते अशाच गोष्टींची म्हणजे संपत्तीची, संरक्षणाची व समृद्धीची पूजनप्रार्थनाच्या योगानें मागणी करीत असत. त्यांची प्रार्थना व पूजा ह्या भूमि, पर्वत, नद्या, नगरें, ग्राम यांमध्यें वास्तव्य करणाऱ्या प्राकृतिक शक्तींना उद्देशून असत. त्यांच्या मताने अशा देवतारूप शक्तींच्या कोपापासून बचावणें अथवा त्यांची कृपा संपादन करणें याकरतां त्यांना प्रार्थना व पूजा इत्यादिकांनी प्रसन्न करणें आवश्यक होतें.

याप्रकारें एका देशांत राहणाऱ्या भिन्न भिन्न जातींमध्यें परस्पर व्यवहार–संबंध वाढूं लागतात. हे व्यवहार व संबंध प्रथम आर्थिक गरजा पुरविण्यासाठी उत्पन्न होतात व नंतर ते हळूहळू समाजाच्या इतर व्यापा-रांसंबंधाने उभ्दवूं लागतात. त्यायोगें समाजाचे धार्मिक, नैतिक व सामूहिक भाव अधिक विस्तृत व दृढ होतात. ह्या परस्परसंबंधामुळें परस्पराव-लंबित्व प्राप्त होतें आणि त्यामुळें देशवासीयांमध्यें देशभक्ति व जाती-यतेचा भाव हीं उत्पन्न होतात. देश हा तेथील रहिवाश्यांतील नागरिक-त्वाचीं बंधनें दृढ करतो आणि रहिवासी हे त्या विशिष्ट देशाचें पालन व प्रगति करतात आणि त्याला देवनिर्मित देश, पुण्यभूमि, जन्मभूमि, मातृभूमि इत्यादि नांवांनी संबोधूं लागतात. ह्याप्रमाणें एखादा विशिष्ट प्रदेश अनेक लोकांमध्यें ऐक्य उत्पन्न करतो आणि त्या लोकांच्या ऐक्याचा परिणाम त्या देशाचें राष्ट्र निर्माण करण्यामध्यें होतो. ते लोक एकत्र राहून एक मनाने काम करतात आणि मिळूनमिसळून आनंदांत राहतात. त्यांच्यामध्यें आपल्या ऐक्याची व साहचर्याची पूर्ण जाणीव असते. आपल्या देशांत जन्म पावणें, तेथील संस्कृतीने संपन्न होणें व तेथें

आपलें जीवन व्यतीत करणें, याबद्दल त्यांना मोठा अभिमान वाटतो. त्यांच्यामध्यें एक प्रकारची राष्ट्रीय भावना व परंपरा ह्या उत्पन्न होतात. आणि त्या त्यांच्या जीवनाला भिन्न वळण लावतात. त्यांची ही राष्ट्रीय भावना व देशाचें प्रेम ह्यांना देशभक्ति म्हणतात आणि ती आपल्या वाङमयांत "जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी" या वचनामध्यें ग्रथित केली आहे. तिच्यामुळें नागरिकतेची कल्पना उद्भूत होते व त्या संबंधींचे अधिकार व कर्तव्यें यांचें पालन करणें आवश्यक होतें. हें कार्य योग्य रीतीनें करतां यावें म्हणून सामाजिक जीवनाच्या अनेक अंगांचें, मुख्य लक्षणाचें, विशिष्ट परंपरेचें आणि प्रमुख हेतूंचें सम्यक् ज्ञान करून घ्यावें लागतें.

मातृभूमि अथवा जन्मभूमि ही आजकाल लोकांचें पूजास्थान होऊन बसली आहे. ती त्यांच्या स्वार्थत्यागाचा व उपासनेचा विषय झाली आहे. देशभक्ति ही आकुंचित कुटुंबभावना व जातिभावना, ग्रामभावना व नगरभावना ह्यांचा विकास करून आज राष्ट्रभावनेंत स्थित आहे. देशभक्तीच्या कल्पनेचा देशांतील लोकांच्या भिन्नतेशीं किंवा समानतेशीं कांही संबंध नाही. त्यांच्या भौतिक, नैतिक व पारमार्थिक आवश्यकतांची संसिद्धि, संप्राप्ति आणि समृद्धि जेथें होते अशा सर्व लोकांच्या सामान्य गृहाला अर्थात् जन्मभूमीला देवत्वाची भावना देणें हें तिचें कार्य आहे. आपला देश इतरांहून निराळा, चांगला व श्रेष्ठ अशा अढळ श्रद्धेचा एक पंथ तिच्यामुळें बनतो. देश म्हणजे केवळ एक भूविभाग ही कल्पना निघून जाते. देशाचें क्षेत्रफळ ह्या देशभक्तीच्या केवळ स्थलमर्यादा, आरंभस्थान व आधारस्थान दाखवितें. ह्या भूगोलात्मक आधारावर उभ्या असलेल्या एका भावनेच्या बंधनाने बद्ध झालेल्या मनुष्यसमाजाचा तिच्यांत समावेश होतो. ती एक प्रेमाची व बंधुत्वाची भावना आहे. देशांतले आपण सर्व लोक सहवासी, सहकारी व समदुःखसुखी आहोंत अशी ती वृत्ति आहे. ही भावना व ही वृत्ति देशांत जन्मलेल्या व वास्तव्य करणाऱ्या सर्व लोकांना आकर्षून घेऊन एकत्र निगडित करते. तिच्यामध्यें एकत्र वास करण्याऱ्या घोळक्याची वृत्ति येवढीच कल्पना नसून सर्वसामान्य ध्येयासाठी, स्फूर्तीसाठी आणि ऐक्यासाठी नागरिक व्यक्तींचें

साहचर्य व प्रेमभाव ह्या कल्पना आहेत. देशामध्यें ही ऐक्याची भावना व सहकारितेची वृत्ति वृद्धिंगत झालेली नसेल आणि विषमता, उच्च-नीचता व जातिविरोध त्यांत असेल तर देशभक्तीच्या दृष्टीने तेथे राष्ट्र निर्माणच झालेलें नाही. अशा स्थितींत देश हा केवळ एक वसतिस्थान अथवा भौगोलिक क्षेत्र आहे. देशभक्तीच्या कल्पनेंत देश भावनेच्या दृष्टीने घरासारखा असतो आणि त्यांतील लोक विचारांत, भावनांत व कृतींत अगदी निकटचे—एका कुटुंबासारखे—असतात. आपण सर्व मिळून एक स्वतंत्र समूह असून आपलें सर्वांचें विशिष्ट जीवनकार्य व उपयोग आहे असा विश्वास धरणारा देश म्हणजे एक प्रकारचा बंधुवर्गच आहे. आणि म्हणून आपल्या देशावर प्रेम करणें आणि त्याच्यासाठीच मरणें वा जगणें हें देशभक्तीचें ध्येय असतें. आज पुष्कळ लोकांनी हें ध्येय मान्य केलें आहे. ह्या देशप्रेमाने प्रेरित व उल्लसित होऊन त्यांनी आपल्या देशाच्या स्वातंत्र्यसंरक्षणासाठी शत्रूंशीं समर केलें आहे आणि त्याचें वैशिष्टय व कीर्ति राखण्याचा प्रयत्न केला आहे.

देशभक्तीच्या भावनेने देशांतील श्रीमंत व दरिद्री, वृद्ध व तरुण, स्त्री व पुरुष, या सर्व वर्गांच्या अंतःकरणांत, विचारांत व कृतींत उत्तम राष्ट्रीय जीवनाचे झरे उत्पन्न करण्याला साहाय्य केलें आहे. त्यांना स्फूर्ति देणारी व निःस्वार्थी कृत्यें करावयाला लावणारी ती एक विधायक व उद्धारक शक्ति आहे. वंशाभिमानाने 'इंग्रजांकरतां इंग्लंड' किंवा 'हिंदूंकरतां हिंदुस्थान', अशा वाक्यांनीं, धार्मिक व राजकीय दृष्टीने 'ब्रिटानिया' किंवा 'हिंदमाता' अशा शब्दांनीं, भावनादृष्ट्या 'वंदे मातरम्' किंवा 'ला मार्सेय' अशा गीतांनी आणि 'तिरंगी झेंडा' किंवा 'युनिअन जॅक' अशा राष्ट्रीय ध्वजांनी, देशभक्तीची भावना उद्घोषित करण्यांत येते. ह्या भावनेंत आतां प्रचंड शक्ति उत्पन्न झाली आहे आणि तिचा स्वाभिमानी व स्वसंस्कृतिसंपन्न लोकांवर मंत्रासारखा प्रभाव पडतो. सर्व जगभर ह्या भावनेवरील निष्ठा प्रत्येक देशामध्यें एकसारखी पसरत व वाढत आहे. समाजाची आर्थिक सुधारणा, स्वतंत्रता व सुख ह्या गोष्टींसाठी या देवतेचें आवाहन, पायधरणी व पूजन करण्यांत येत आहे. कारण तिच्यावांचून जिकडे तिकडे लोक दीन, परतंत्र आणि दुःखी

झालेले आहेत. तिच्या अंगीकारानें वंश, वर्ण, जाति किंवा धर्म ह्यांच्यावर उभारलेल्या संकुचित ईर्ष्यास्पर्धादि विकारांचा नाश झाला आहे, आणि तिच्या प्रभावाने लोकांची सामाजिक दृष्टि व सत्प्रवृत्ति, स्वार्थत्यागाचें, सेवेचें, कीर्तीचें आणि सार्वजनिक हित साधण्यासाठी करावयाच्या त्यागाचें व संपादावयाच्या वैभवाचें क्षेत्र हीं विस्तृत झालीं आहेत. तिच्यामुळें कुटुंबाची सामाजिक व नैतिक वृत्ति आणि राष्ट्राच्या सेवेला लावावयाच्या मनुष्याच्या शक्ति, यांची भावना व कार्यक्षेत्रें हीं वाढलीं आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आपल्यापैकी प्रत्येकाने नुसत्या स्वतःसाठीच नाही तर आपल्या इतर स्वदेशबांधवांसाठी आयुष्य घालविणें ही तिची प्रेरणा आहे. ही बंधुतेची भावना तिच्या मुळाशीं असल्यामुळें तिने मोठमोठ्या प्रदेशांतील भाषाभिन्न, विचारभिन्न व आचारभिन्न लोकांच्यामध्यें असलेला विरोध कमी केला आहे व त्यांच्यांत सहकारिता उत्पन्न केली आहे. अशा लोकांना तिने एकच प्रकारचें मन व दृष्टि, एकच प्रकारची भावना व स्फूर्ति, एक प्रकारच्या संस्था व नियम देऊन त्यांच्या जीवनाची पुनर्घटना केली आहे. तरी पण स्वयंपूर्ण अशा राष्ट्रीय जीवनाच्या अनेक अंगांमध्यें असलेली आचार व विचार यांची भिन्नता ती मान्य करते व चालूं देते आणि राष्ट्राच्या सर्वसामान्य ध्येयांचें व आकांक्षांचें मूलभूत ऐक्य व अंतिम दृश्य बिघडवूं न देतां एकमेकांचीं कार्यें व आयुष्यक्रम ह्यांच्यामध्यें सुसंगता व एकरूपता आणते.

देशभक्ति ही कांही केवळ वांशिक, धार्मिक, सांस्कृतिक किंवा भाषानिष्ठ भावना नाही. तिला स्थलमर्यादेचा आधार व इतिहासाची पार्श्वभूमि आहे. कांही विशिष्ट भौगोलिक परिस्थिति व कांही विशिष्ट आनंदाच्या किंवा दुःखाच्या ऐतिहासिक घटना, ह्यांच्यामुळें तिला मूर्त स्वरूप येतें आणि ह्याच गोष्टी देशभक्तीची भावना व श्रद्धा उत्पन्न व्हावयाला अवश्य असलेली विचारांची व वृत्तींची, उद्देशांची व कृतींची एकता उत्पन्न करतात. त्यामुळें एका प्रादेशिक जनसंघांत दुसऱ्यांपासून भिन्न व आपल्या पुरती एकतेची भावना उत्पन्न होते.

याचा अर्थ देशभक्तीच्या भावनेने भरलेला हा प्रदेश मानवाच्या सर्वसामान्य आवश्यकता आणि भूतदयेच्या कल्पना ह्यांना दूर सारून

इतर मनुष्यसंघांशीं कलह करणारा एक युद्धमान संघच असला पाहिजे असा नाही. सामान्यतः तो जगाच्या बौद्धिक, धार्मिक, व्यापार-विषयक आणि लोकोपयोगी सहकार्याच्या आड येत नाही. पण त्याची कोणत्याही प्रश्नाकडे व गोष्टीकडे पाहावयाची एक विशेष प्रकारची दृष्टि असते आणि त्याचा स्वतःच्या राजकीय स्वातंत्र्यावर, शासन-पद्धतीवर व संस्थांवर विश्वास असतो.

ज्याप्रमाणें मनुष्यांच्या इतर धार्मिक, वांशिक व आर्थिक भावनांची परिणति निरनिराळे पंथ, गण व राज्यें निर्माण करण्यांत वारंवार झालेली आढळते. त्याप्रमाणें ही देशभक्तीची भावना सर्वसामान्य मानवी संस्कृति व जाति ह्यांना विघातक होईल अशा रीतीने वाढूं शकते. कांही देशांचे लोक आपल्या लाभासाठी किंवा सोयींसाठी, मग त्या न्याय्य असोत किंवा नसोत, आपल्याच हिताच्या गोष्टींचें समर्थन करतात आणि आपल्या सर्व सामर्थ्याचा उपयोग करून दुसऱ्यांचा पक्ष खरा असला तरी त्याचा नाश करण्यासाठी युद्धाला तयार होतात. नैतिक वर्तनाच्या उच्च तत्त्वांची हेळसांड व दुसऱ्याची हानि करून प्राप्त केलेल्या आपल्या संपत्तीची, शक्तीची व प्रदेशाची असमर्थनीय वाढ, हे दोन महा-दोष अनेक युरोपीय देशांच्या देशभक्तीच्या भावनेंत अधिष्ठित अथवा मिश्रित झालेले दिसतात. त्यामुळें त्यांची देशभक्तीची कल्पना अत्यंत संकुचित असते. एका थोर भावनेची ती विकृति होते. परस्वापहरणाच्या बुद्धीमुळें आणि स्वकर्तव्याच्या खोट्या कल्पनांमुळें हा दोष उत्पन्न होतो व त्यामुळें त्या उच्च भावनेचें रूपांतर नीचतम स्वार्थवृत्तींत होतें.

देशभक्ति व मानवहित ह्या कांही परस्परविरोधी भावना नाहीत. मानवजातीचा आपण देशरूपाने एक घटक आहोंत. एखाद्या विशिष्ट देशाचे नागरिक होण्याचे आधी आपण मूलतः मनुष्य आहोंत. मनुष्यजाति ही स्वभावतः एक आहे. तिचें मूळ एक असून, ती इतिहास-काळांत जरी भिन्न मार्गांनी वाढली असली आणि भिन्नभिन्न अवस्थां-पर्यंत येऊन पोचली असली तरी तिच्या प्रमुख अशा मानसिक व नैतिक विशेषांत साम्य आहे. आपल्याशीं कोणताही संबंध नसलेल्या मनुष्यप्राण्या-विषयीं आपल्या मनांत सहानुभूति उत्पन्न होते हें पाहिलें म्हणजे मनुष्य-

जातीची एकात्मता सहज स्पष्ट होते. देशबंधुता ही विश्वबंधुतेच्या क्षेत्रा-हून लहान आहे हें जरी आपणास विसरतां येत नाही तरी बहुसंख्याक मानवांच्या अविचारी व सुधारणाप्रतिकूल स्वार्थासाठी अल्पसंख्याक देशवासीयांच्या खऱ्या हिताचा बळी देतां येत नाही, ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. आपलीं उच्च ध्येयें व कल्पना प्रत्यक्ष व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या लहानशा संघांतही उत्कृष्ट विश्वबंधुता प्रगट होते. योग्य प्रकारची देशभक्ति म्हणजे त्या त्या स्थलापुरती उप-योगांत आणलेली उत्कृष्ट विश्वबंधुताच आहे आणि त्या त्या मर्यादित क्षेत्रांतील श्रेष्ठ सद्गुणांचें व भावनांचें प्रत्यक्ष आचरण आहे. देशभक्ति ही दुसऱ्या राष्ट्राकडून होणाऱ्या अतिक्रमणाबद्दलच्या सावधानतेची द्योतक असल्यामुळें ती साहजिकच एका राष्ट्राच्या दुसऱ्या राष्ट्राशीं येणा-ऱ्या संबंधांत दृग्गोचर होते. शिवाय, लहान संघांच्या किंवा राष्ट्रांच्या परस्पर संबंधांपासून आणि विरोधापासून मिळालेल्या अनुभवावरूनच मनुष्यजातीला श्रेयस्कर काय आहे, हें आपल्याला समजतें आणि राष्ट्राच्या विशिष्ट गुणांचें व कार्याचें संरक्षण केल्याने व त्यांचा इतर राष्ट्रांच्या कामीं उपयोग केल्यानेंच मनुष्यजातीचें सर्वसामान्य कल्याण साधणार आहे.

दुसऱ्याच्या स्वातंत्र्यावर आक्रमण करणाऱ्या देशभक्तीचा निषेध करून तिला दाबांत ठेवली पाहिजे. पण अद्यापि संपूर्ण जगानें आपलें व्याव-हारिक जीवन व शासनव्यवस्था हीं स्वतंत्रपणें एकमुखी किंवा संयुक्त पद्धतीनें संघटित केलेलीं नाहीत. अशा स्थितींत राष्ट्र हें अखिल मनुष्यजातीच्या संघटित कार्याचें एक साधन आहे. मोठमोठाल्या सुधारलेल्या राष्ट्रांचे अनुभव एकत्रित केल्याने संपूर्ण मनुष्यजातीचे अधिकार काय असले पाहि-जेत हें आपल्याला समजतें. पण हे अनुभव किंवा हीं ध्येयें एखाद्या राष्ट्राचे असहिष्णु प्रचारक, लोभी व्यापारी, राक्षसी मुत्सद्दी व शस्त्रास्त्र-संपन्न आडदांड सेनापति ह्यांच्यापासून घ्यावयाचीं नसतात. विश्वबंधुतेचीं सर्वोच्च ध्येयें हीं वनांत वास करणाऱ्या विचारवंतांच्या किंवा नगरांत राहणाऱ्या साधुसंतांच्या व तत्त्वज्ञान्यांच्या पासून प्राप्त झालेलीं असतात.

मनुष्याचें आजचें जीवन, त्याचे विचार व ध्येयें, त्याचीं कृत्यें व धडपडी, यांच्याबर सर्व मनुष्यजातीला सामान्य अशा पूर्वार्जित कल्पनांचा

आणि संस्थांचा परिणाम झालेला असतो. म्हणून आपण स्वयंपूर्ण व स्वतंत्र आहों अशा कल्पनेंत गुरफटून राहतां कामा नये. आपली वृत्ति आपल्या पुरतीच व दुसऱ्यांशीं तुटक अशी नसली पाहिजे. जगामध्यें परोपकाराच्या नवीन कल्पना निर्माण झाल्या आहेत व इतरांब [illegible] वर्तावयाच्या निराळ्याच गुणांना महत्त्व आलें आहे. आज समाजविषयक संबंध व ज्ञान वाढलें आहे. तेव्हा सामाजिक अथवा राजकीय अशी एकमेव जागतिक संघटना नसली तरीही आपण आपल्या देशभक्तीचा व राष्ट्रभावनेचा कूपमंडूक वृत्तीने अर्थ करतां कामा नये. दुसऱ्या देशांच्या दीर्घकालाच्या अनुभवावरून व थोर पुरुषांपासून प्राप्त झालेल्या नवीन कल्पना, सद्‌गुण व विस्तृत ज्ञान यांचें निरीक्षण करून त्यांचा स्वीकार करावा व सर्वोत्कृष्ट स्वरूपाच्या जागतिक संस्कृतीचे वारस होऊन तिचा पुरस्कार करावा. आपलें प्राचीन वैभव, नैतिक बल, बौद्धिक ओज व आत्मिकज्ञान हीं आपल्या सांप्रतच्या स्थितीपासून वर जाण्याच्या आपल्या मार्गाच्या आड येतां कामा नयेत. नाही तर आधुनिक जगांत आपल्याला दलित, बहिष्कृत व एकलकोंडें होऊन राहावें लागेल आणि आपली वाढ खुंटून आपला ऱ्हास होईल. आपण आपल्या नुसत्या परंपरागत विद्यापीठामध्यें व संस्कृतिकेंद्रामध्येंच उच्च ज्ञानाचा अभ्यास व प्राप्ति न करतां, बाहेरील जगांतील विद्येच्या व संस्कृतीच्या ठिकाणींही तो केला पाहिजे व त्याचा उपयोग करून घेतला पाहिजे.

देशभक्तीच्या कल्पनेंत अधिकारांच्या कल्पनेपेक्षां कर्तव्यांच्या कल्पनांचाच समावेश होतो. आपल्या आसपासच्या ग्रामवासी, नगरवासी किंवा देशवासी शेजाऱ्यांसंबंधींचीं कर्तव्यें करणें हा तिचा मुख्य उद्देश आहे. सर्वांच्या हितासाठी आपण शेजारधर्माचीं ध्येयें व संस्था ह्या शिरोधार्य समजून त्यांच्याकरतां झटलें पाहिजे. ह्या स्वजनसान्निध्यांत व स्वजनसेवेंत मनुष्याला शिकावयाला आणि आपली प्रगति करून घ्यावयाला अवसर मिळतो. त्यामुळें त्याचे सद्‌गुण व त्याची योग्यता हीं वाढतात आणि त्याच्या सुप्त शक्ति जागृत होतात.

माणसें हीं साधारणपणें सारख्याच स्वभावाचीं व संगतिप्रिय असतात. आपत्ति प्राप्त झाली असतां त्यांना एकमेकांविषयीं सहानुभूति वाटते.

त्यांना यशाच्या वेळीं आनंद, अत्याचाराविषयीं द्वेष, स्वातंत्र्याविषयीं भक्ति, दुर्गुणांचा तिटकारा आणि सद्‌गुणाबद्दल आदर वाटतो. श्रेष्ठ विभूतींच्या हृदयांत भूतदयेचे ठोके पडत असतात आणि सामान्य मनुष्याच्या हृदयांत त्यांना साथ मिळून त्यांचे प्रतिध्वनि उठतात. सर्वांमध्यें ही बंधुभावना व भूतदया समाविष्ट असते व सत्पुरुषामध्यें ती उतून वाहूं लागते. समाजाच्या कोणत्याही संघटनेंत ही भावना व तिच्या हांकेबरोबर जागें व्हावयाची वृत्ति सुप्तावस्थेंत असते. तिला जागी करून जनसेवेकरतां उपयोगांत आणावी लागते. मनुष्यापुढले प्रश्न चोहीकडे सारखेच असतात. स्वातंत्र्य व सुव्यवस्था, दया व सौंदर्य, आनंद व न्याय, पूर्णता व प्रगति, सत्य व सहिष्णुता, हीं त्याचीं ध्येयें सारखींच असतात. त्यांच्या प्राप्तीसाठी दुष्ट व स्वार्थी मनुष्यांच्या अपहारवृत्तीशीं विरोध करण्यांत त्याला करावे लागणारे कलह व भोगाव्या लागणाऱ्या यातना ह्याही एकसारख्या असतात. जगांत त्या कलह व यातना भोगणाऱ्या लोकांबद्दल सर्वत्र सहानुभूति दिसून येते, कारण त्या मूलतः मानवजातीय आहेत. मनुष्यामनुष्यांतले भेद हे स्थानिक व ऐतिहासिक आहेत. प्रत्येक देशभक्ताने मानवी अभ्युदयाच्या सुधारलेल्या कल्पना ध्यानांत ठेवल्या पाहिजेत आणि दुसऱ्याच्या साहाय्याला धावलें पाहिजे. आपले शेजारी जर वाईट असले तर आपली सुधारणा अव्याहतपणें होऊं शकत नाही व टिकूं शकत नाही. सर्व मानव जातीच्या उन्नतीबरोबरच आपली उन्नति होईल. मनुष्याचें सर्वोत्कृष्ट जीवन सर्व मानवांच्या साहचर्यांत व सहकारांत उन्नत होऊं शकतें. त्यायोगें त्याच्या अंतर्गत व सुप्त शक्ति पूर्णपणें बहिर्गत होऊन प्रकट होतील. एकमेकांच्या निकटच्या व अनेकविध संबंधांत मनुष्यें चांगल्या रीतीनें उन्नत व कार्यवान होतात. अशा प्रकारचा हा देशहिताचा व मानवजातिहिताचा निकट संबंध आहे.

सामुदायिक जीवन हें मनुष्याचे वैयक्तिक हेतु व सामुदायिक हित साध्य करण्याकरतां उत्पन्न होतें. ह्या सामुदायिक जीवनाचीं अनेक अंगें आपणास कल्पितां येतात.

**सामाजिक अंग** हें मनुष्याच्या जीवनांतील संगतीच्या व सहवासाच्या, जिव्हाळ्याच्या व प्रेमाच्या, वात्सल्याच्या व रतिसुखाच्या भावना सफल, सुव्यवस्थित व सुरक्षित करीत असतें. त्यायोगें संगति, संभोग, संतति, वंशरक्षण व वर्धन, बालसंगोपन, वृद्धसेवा, इत्यादि गोष्टी सुलभ होतात. त्यामुळें मनुष्याच्या अनेक उत्कट इच्छा व सांसारिक भोग साध्य होतात व तो संतुष्ट व सुखी, सहकारी व संगतिप्रिय राहतो. त्यायोगें त्याच्या स्थायी भावनांना व मनोवृत्तींना वाव मिळतो आणि त्यांचें पोषण व समाधान होतें. हें सामाजिक अंग कुटुंब, कुल व जाति ह्या संस्थांच्या द्वारें आणि विवाह व सावर्ण्य या संबंधांच्या व संस्कारांच्या द्वारें पोषिलें जातें. त्याच्या नित्यनैमित्तिक सुखदुःखाचे वाटेकरी त्याला ह्या संस्थांच्या व संबंधांच्या द्वारें प्राप्त होतात.

**आर्थिक अंग** हें त्याच्या देहरक्षणांचें, म्हणजे अन्नवस्त्राचें व घरदाराचें, कार्य पाहतें. त्यायोगें त्याचें आयुष्य व आरोग्य, संतति व संपत्ति सुरक्षित राहते. तें मनुष्याला व्यवसायाच्या रूपाने उद्योगधंदा देतें व त्याकरतां केलेल्या श्रमसाहसाने त्याला साधनसंपत्ति व सुखविश्रांति प्राप्त होते. त्या मिळकतीवर आपलें स्वामित्व ठेवून तो आपला उदरनिर्वाह, संचार व संगोपन करतो. अनेक संघांच्या व व्यवसायांच्या द्वारें हें आर्थिक जीवन सिद्ध होतें, व तें उत्पन्न केलेल्या संपत्तीच्या योग्य वांटणीने, विनिमयाने व उपभोगाने सुखी होतें.

**धार्मिक, नैतिक व सांस्कृतिक अंगें** हीं त्याच्या अध्यात्मप्राप्तीचें, सद्गतीचें, शीलसंवर्धनाचें व मानसिक उन्नतीचें कार्य करीत असतात. त्यायोगें समाजांत औदार्य, परोपकार, समता, बंधुता, स्वतंत्रता, सख्य, सत्संगति, सेवाभाव, ऐक्यभाव, साधुभाव, आनंद, त्यागवृत्ति, तत्त्वजिज्ञासा, ज्ञानलालसा, विद्याप्रेम, इत्यादि भाव व वृत्ति उत्पन्न होतात व वाढतात. त्यामुळें उच्च जीवन व उदार चारित्र्य समाजांत नांदतें व मनुष्याच्या परिणत स्वभावाची, गुणांची व संस्कृतीची पूर्ण ओळख पटते आणि ऐहिक जीवनांतील सत्य, सौंदर्य व सामर्थ्य दिसून येतें. त्यांमुळें मनुष्याला अंतिम ध्येयाची जाणीव होऊन तो जगांतील सुखदुःखें, लाभालाभ व जयापजय याबद्दल निरासक्त होतो आणि आपल्या वृत्तीला उच्च करून

समाधानाने राहतो. अनेक धर्मांच्या व गुणांच्या, त्यागाच्या व योगाच्या, पंथांच्या व सांप्रदायांच्या द्वारें, ह्या अंगांचें संपादन व संरक्षण केलें जातें.

**शिक्षणात्मक अंग** हें मनुष्याच्या स्वाभाविक शक्तींना व स्फूर्तींना योग्य वळण लावतें; व त्याचा देह व मन सामर्थ्यवान, संयमी, साहसी व संस्कृतिसंपन्न करतें. त्यायोगें मनुष्याचें शील व चारित्र्य, त्याच्या भावना व वासना, त्याचे व्यवसाय व उद्योग, सुसंस्कृत व सुव्यवस्थित होतात. त्यामुळें त्याला विद्या व सामर्थ्य, कला व कौशल्य, अन्वेषणबुद्धि व जिज्ञासा प्राप्त होऊन, समाजाला स्थैर्य व बळकटी, विचार व दूरदृष्टि प्राप्त होते. हें शिक्षणात्मक कार्य विद्यापीठें व पाठशाळा, संगोपनगृहें, पुस्तकालयें, प्रयोगालयें, वाचनालयें, देवालयें, छात्रालयें आणि विद्वत्परिषदा व शास्त्रीय मंडळें यांच्या द्वारें केलें जातें. त्यायोगें मनुष्याला साध्य व साधन, ध्येय व उपाय, हीं समजून आपलें जीवन आपल्या योग्यतेनुसार उत्कृष्टपणें घालविण्यास संधि मिळते व तो कार्यक्षम, बलवान व सुसंस्कृत होऊन समाधानाने राहतो.

**आरोग्यात्मक अंग** हें त्याच्या भोवतीं स्वच्छता व सफाई निर्माण करतें व त्याला शुचिर्भूतपणाचें शिक्षण, ज्ञान व नियम देतें. त्यामुळें तो घातक रोगराया, संसर्गजन्य रोग व घाण यांपासून मुक्त राहतो. त्यामुळें त्याचें आयुष्य व बल वाढतात आणि आरोग्यामुळें तो समाधानाने व उत्साहाने राहतो.

**राजकीय अंग** हें त्याच्या देशरक्षणाचें आणि योगक्षेमाचें म्हणजे अलब्धलाभाचें, लब्धपालनाचें, संवर्धनाचें व योग्य वाटणीचें कार्य करतें. त्यायोगें समाजामध्यें शांतता व व्यवस्था नांदते व तो यादवी, अंतःकलह व परचक्रें यांपासून वांचतो. त्यामुळें दुष्टांना दंड होतो व शिष्टांना मान मिळतो आणि सर्वप्रकारें राष्ट्राचें संरक्षण व पोषण होतें. याप्रमाणें एका विशिष्ट व स्वतंत्र प्रदेशांतील लोकसमाज राज्यरूपानें एकत्रित, संघटित व सुव्यवस्थित होतो व त्याचें उच्च जीवनाचें कार्य निराबाध रीतीनें चालू राहतें.

**अशाप्रकारचीं मनुष्याच्या जीवनाचीं प्राचीन व अर्वाचीन ध्येयें व अंगें समजलीं गेलीं आहेत. नागरिकनीतीच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व विशेष आहे.**

---

## प्रकरण सहावें

# सामाजिक जीवन

समाज या शब्दाच्या सामान्य अर्थात प्रदेशाचा संबंध येत नाही, केवळ मनुष्यामनुष्यांचा परस्परसंबंध येतो. सर्वांना सामान्य अशा कोणत्या तरी हेतूसाठी अथवा कार्यासाठी परस्परांशीं संबद्ध झालेल्या मनुष्यांच्या समूहाला किंवा संघाला समाज म्हणतात. मनुष्यांच्या एकत्र होण्याच्या नानाविध पद्धतींना लागणारा हा सामान्य शब्द आहे.

समाज ही घटना स्वाभाविक आहे. ती मनुष्याच्या गरजेप्रमाणें व आवडीनिवडीप्रमाणें वाढते व बदलते. प्राथमिक स्थितींत मनुष्य-समाज सहवासाच्या व संगतीच्या प्रवृत्तीनुरूप प्राधान्यतः बनतो व पुढें तो अंशतः मनुष्याच्या उपजत प्रवृत्तीवर, अंशतः त्याच्या निवडीवर व अंशतः परिस्थितीच्या निकडीवर वाढतो व बदलतो. त्यामुळें त्याच्या सुखसोयीस, रक्षणास व वाढीस मदत होते. मनुष्य हा आपल्या गरजा, आपली परिस्थिति व आपलीं ध्येयें यांच्या अनुरोधाने समाजाची बुद्धिपुरः-सर घटना करावयास समर्थ आहे. समाज हा मनुष्याच्या वाढीसाठी व संगोपनासाठी आहे. समाजाची त्याला जरी आवश्यकता आहे, तरी त्याचें स्वातंत्र्य समाजाच्या हेतूमध्यें व सत्तेखाली लोप पावत नाही. मनुष्य हा उच्च मानसिक व आध्यात्मिक स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याकरितां व उपभोगण्याकरितां जन्मास आला आहे, परसत्तेखाली व परिस्थितीखाली दडपून जाण्याकरतां नव्हे. तो सुख भोगण्याकरतां जन्मलेला आहे, दुःखांत खितपत पडण्याकरतां नाही. पण त्याच्या ह्या स्वातंत्र्याला व सौख्याला सर्वांच्या खऱ्या हितासाठी मर्यादा घातल्या आहेत. त्यामध्यें त्याला खरें स्वातंत्र्य व सुख प्राप्त होतें.

समाजाच्या व्यवस्थेंत व कारभारांत प्रत्येक मनुष्याला योग्य स्थान मिळालें पाहिजे. म्हणजे त्याच्या योगाने त्याला संपूर्ण सामाजिक जीवनांत भाग घेतां येईल आणि सर्वांच्या हितांना व कार्यांना अनुकूल व साहाय्यक होईल अशा रीतीने आपली बुद्धि व शक्ति खर्चतां येईल.

मनुष्यामध्यें कलह करणें, स्वार्थ संपादणें अथवा बळजबरी करणें ह्यांपेक्षा परस्परांशीं सहकार्य करणें हें समाजपर तत्त्व अधिक प्रमाणांत आहे. सामाजिक शांतता व चैतन्य हीं या तत्त्वावर अवलंबून आहेत. मनुष्यनिर्मित निर्बंधांवर तीं तितकीं अवलंबून नाहीत.

समाजव्यवस्थेमध्यें मनुष्याला चुका करावयाला व स्वतःच्या अनुभवानुसार सुधारणा करावयाला अवसर दिला पाहिजे. त्याच्या मार्गीतील प्रतिबंध व अडचणी दूर करण्यापुरताच समाजसत्तेने निर्बंध घालणें योग्य आहे. तिने एकजात जांचणी व नियंत्रण केलें तर मनुष्याची सहजस्फूर्ति व आपल्या सामर्थ्याप्रमाणें व्यवहार करण्याची स्वतंत्रता ह्या नष्टप्राय होण्याचा फार संभव आहे. तरीपण मनुष्यें हीं फार स्वतंत्रपणें वागलीं तर इतरांना उपसर्ग पोचतो म्हणून समाजसत्तेने त्यांचें नियंत्रण करणें इष्ट होतें. एकाचें वागणें दुसऱ्याच्या हितसंबंधांना विघातक होऊं नये म्हणून त्याला निर्बंधनिग्रह घालावयाचे व ते त्यांना विधायक व्हावे म्हणून त्याला वळण लावावयाचें हें सत्तेचें कार्य आहे.

मनुष्य हा समाजपुरुषाचा स्वातंत्र्यविरहित अथवा अधिकारविरहित अवयव नाही आणि समाजाला व्यक्तींवेगळें अस्तित्व नाही. दोहोंमध्यें अवयवावयवी भाव आहे. समाजपुरुषाचें संगोपन हें व्यक्तीच्या खऱ्या हिताच्या व स्वातंत्र्याच्या आड येतां कामा नये. समाजाचें अस्तित्व व हित हींच त्याचीं केवळ अंतिम साध्यें होऊं शकत नाहीत. मनुष्य हा समाजपुरुषाचा एखाद्या स्नायूप्रमाणें भाग नसून त्याला स्वतंत्र भावना भोगण्याचा व स्वतःचें अंतिम कल्याण साधण्याचा अधिकार आहे. समाजस्वास्थ्याचा आधार व्यक्तीच्या विवेकशक्तींत आहे. समाजाची आवश्यकता त्याला स्वभावतःच असली तरी समाज ही त्याला सदैव व सर्व प्रकारें बद्ध करणारी आणि त्याचें स्वातंत्र्य व सुख हरण करणारी घटना आहे असें मान्य करतां येत नाही. तिच्यामध्यें त्याच्या चारी पुरुषार्थांना वाट पाहिजे. त्याला देशांतर, धर्मांतर, समाजांतर, व्यवसायांतर, जात्यंतर व कुलांतर करण्याचा अधिकार पाहिजे. म्हणजेच कोणताही समाज अथवा संघ त्याच्या स्वातंत्र्याला व प्रगतीला पोषक होईल.

मनुष्याच्या समाजांतील स्थानाचा व संबंधाचा विचार करावयाचा म्हणजे मनुष्याला कमींत कमी कोणते अधिकार व सुख हीं अवश्य मिळा-लीं पाहिजेत आणि त्याचे इतरांशीं सामाजिक संबंध व व्यवहार यांच्या मर्यादा कोणत्या असल्या पाहिजेत, हें ठरविलें पाहिजे. मनुष्याला एकटें राहवत नाही म्हणून त्याच्या अस्तित्वाला व अभ्युदयाला स्वाभाविक व आवश्यक अशा समाजाचा तो एका दृष्टीने घटक असला तरी दुसऱ्या दृष्टीने समाजामध्यें त्याला त्याचें ध्येय व परिपूर्ण जीवन प्राप्त होतें. तेव्हा समाज हें मनुष्याच्या अस्तित्वाचें व अभ्युदयाचें साधन आहे, म्हणून त्याला स्वतःची संघटना, स्वतःचें ध्येय व स्वतःचें कार्य पाहिजे. त्यानें मनुष्याला कमींत कमी आवश्यक गोष्टी मिळवून देण्याचा व अधिकांत अधिक त्याच्या इच्छा तृप्त करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याने आपल्या घटकांमध्यें परस्परांविषयीं सहिष्णुता व सहानुभूति, सार्वजनिक भावना व प्रयत्न, हीं उत्पन्न करण्याचा व वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

समाजाच्या उत्पत्तीचे, अवस्थांचे, स्वरूपाचे, संघटनांचे, क्षेत्राचे व हिताचे अनेक विचार विद्वानांनी प्रगट केले आहेत. त्या सर्वांचें विवेचन विशद रीतीने करणें येथें आवश्यक नाही. समाजशास्त्र हें तें यथाशास्त्र व यथासांग करतें. आपण त्यांचें थोडक्यांत येथें दिग्दर्शन करूं.

खरें पाहिलें असतां मनुष्याच्या उपजत स्वभावामुळें व बाह्य आवश्यकतेमुळें मूळ समाज निर्माण होतो. त्यामुळें त्याला सुख मिळतें. कांही समाज नैमित्तिक व कांही नित्य प्रकारचे असतात. तात्त्विकदृष्ट्या अगदी प्रारंभींचे लोकसमूह व त्यांच्यामधील सहवास व साहचर्य हीं वैषयिक विकार, आवश्यकता व समागम, बलिष्ठांचें भय व धोका, आत्मरक्षणाची जरूरी, संगतिप्रियता, वात्सल्यभावना, अन्नवस्त्र व घरदार मिळविण्याच्या अवघड कामासाठी लागणारें सहकार्य, काल्पनिक देवांच्या, पूर्वजांच्या अथवा बिरुदांच्या विषयींचा आदर अथवा धाक, भौगोलिक अडचणी आणि शांततेची व सुव्यवस्थेची इच्छा, अशा अनेक कारणांमुळें उत्पन्न होतात. पण ऐतिहासिक दृष्ट्या अगदी प्रारंभींचा समाज व त्याच्यामधील सहवास व साहचर्य हीं केव्हा व कुठे उत्पन्न झालीं हें सांगणें अगदी कठीण आहे. समाजाच्या उत्पत्तीचें ठिकाण, काळ व परि-

स्थिति अजून निश्चित करतां येत नाही. इतिहासज्ञ हे त्याच्या वाढीबद्दल व भिन्न अवस्था व स्वरूपान्तरें याबद्दल सांगू शकतात येवढेंच.

कांही तात्त्विक लेखकांनी असें विधान केलें आहे की मनुष्यांची मूळची व प्रारंभींची स्थिति समाजरहित होती. परंतु त्यांच्यामध्यें अडचणी व अशांतता उत्पन्न झाल्यामुळें ती स्थिति असह्य झाली, तेव्हा त्यांनी एकत्र होऊन आपल्या संमतीने व प्रतिज्ञा करून समाजाची स्थापना केली व त्याला नियम व शासन करण्याचे अधिकार दिले. त्यांपैकी कांहींच्या मतें ही समाजपूर्व मनुष्याची स्थिति शांततेची व सौख्याची होती, इतरांच्या मतें ती कलहाची व मारामारीची होती. एकाच्या दृष्टीने ते स्वभावतः सद्‌गुणी, सदाचरणी व देववृत्तीचे होते, दुसऱ्याच्या दृष्टीने दुर्गुणी, दुष्टाचरणी व पशुवृत्तीचे होते. पहिल्या मताप्रमाणें कांही काळ गेल्यावर बिकट परिस्थितीने पीडित झाल्यामुळें ते सद्‌गुणापासून व सदाचरणापासून पतित झाले व त्यांच्यामध्यें दुर्गुण शिरून कलह व मारामारी सुरू झाली. शांततेचें सत्ययुग नित्य टिकलें नाही. वाढत्या लोकसंख्येमुळें व आर्थिक आवश्यकतेमुळें पूर्वीची स्थिति टिकणें शक्य नव्हतें. त्यामुळें माणसें लोभी व परस्वापहारी झालीं. शांतता निघून गेली. कलहाला प्रारंभ झाला. तेव्हा शांतता व सहिष्णुता प्रस्थापित करण्याला, जीवित व वित्त रक्षण करण्याला आणि आत्मस्वातंत्र्य मिळविण्याला एखाद्या सामायिक संघटनेची माणसांना आवश्यकता भासूं लागली. म्हणून लोकांनी एके ठिकाणीं बसून एकमताने नियमनिबंध तयार केले व त्यांस अनुसरून वागण्याबद्दल प्रतिज्ञा केली. त्याबरोबरच शासकाची आवश्यकता उत्पन्न झाली. नियंत्रण व शासन यांवाचून सामाजिक व्यवहार व नियमन चालणें अशक्य झालें. त्या शासकाचे अधिकार व शासनाचें क्षेत्र यांचा विचार राजसत्तेच्या विवेचनाखालीं पुढे येईल.

कांही तत्वज्ञान्यांनी समाजनियंत्याच्या हातीं अमर्याद व अनिबंध सत्ता दिली व व्यक्तीचें स्थान व स्वातंत्र्य गौण ठरविलें. इतरांनी त्याच्या हातीं मर्यादित व नियमित सत्ता दिली आणि त्याने जर जीवित व वित्त, स्वातंत्र्य व सौख्य, ह्यांचें रक्षण करावयाचें काम केलें नाही तर समाजांतील व्यक्तींना त्याच्या विरुद्ध बंड करण्याचा व नवा नियंता नेमण्याचा अधिकार राखून ठेवला.

ह्या तात्त्विक सिद्धांतांचा मुख्य दोष हा आहे कीं त्यांना ऐतिहासिक आधार नाही. त्यांनी कल्पिलेला प्राथमिक समाज हा प्रौढ व परिणत स्वरूपाचा आहे. असा सर्वांगपरिप्लुत व विवेकप्रधान समाज अगदी प्रारंभीच्या काळांत असणें व त्यामध्यें परिषदेच्या व संमतीच्या प्रौढ कल्पना असणें शक्य नाही.

मनुष्य हा प्रथम पासून समाजनिष्ठ आहे व त्याला सहवासाची व सहकार्याची आवश्यकता आहे. मनुष्यसमाजाची वाढ निरनिराळया अवस्थांतून हळूहळू व कार्याकार्याने झाली. त्याची प्रारंभींची अवस्था व रूपें बहुशः शिथिल, अनियमित प्रकारचीं व केवळ कळपासारखीं आढळतात. पण पुढे आप्तसंबंधांची जाणीव, स्वरक्षणाची व स्वार्थ मिळविण्याची आवश्यकता, वसाहतीची जरूरी आणि चालीरीतीची एकता ह्यांच्यामुळें अंतर्गत बंधनें व बाह्य विरोध उत्पन्न झाले. त्यामुळें भ्रमणशील कळपाची अवस्था जाऊन स्थायिक कुटुंबें, कुळें व जाति उत्पन्न झाल्या. ह्या आप्तरूपी अवस्थांतून समाजाची वाढ व विकास झाला. वाढत्या व अनेकांगी जीवनाच्या कार्याला कुटुंब हा समूह पुरा पडला नाही. लोकसंख्या वाढते व कुटुंबें वाढतात. त्यामुळें विशिष्ट प्रदेशामध्यें राहणाऱ्या अनेक कुटुंबांचें संघीकरण होतें आणि त्यांच्यामध्यें राजकीय, आर्थिक व व्यापक सामाजिक जीवनाच्या दृष्टीने परस्पर संबंध उत्पन्न होतात आणि त्यामुळें ग्रामसमाज व नगरसमाज उदयाला येतात. ह्या ग्रामांच्या व नगरांच्या संघटनाने व संघीकरणाने प्रांत व देश बनतात. हें संघटन व एकीकरण त्यांच्या स्वेच्छेने होते अथवा आपल्या सर्वसामान्य व वाढत्या आवश्यकता भागविण्यासाठी व संकटांना व परचक्रांना तोंड देण्यासाठी त्यांना करणें भाग पडतें. अशा रीतीने जेव्हा गांवांचें व नगरांचें ऐच्छिक किंवा आवश्यक संघटण घडून येतें तेव्हा नवीन प्रादेशिक, राजकीय, सामाजिक व आर्थिक कल्पनांचें व आवश्यकतांचें एकीकरण होतें, आणि विशिष्ट प्रकारच्या समान आकांक्षा व उद्देश बाळगणारें, विशिष्ट प्रकारच्या समान परंपरा व पूर्वेतिहास असलेलें राष्ट्र जन्माला येतें. ह्या आकांक्षा व उद्देश यांच्या प्राप्तीसाठी, ह्या परंपरा व पूर्वेतिहास यांच्या रक्षणासाठी, त्या त्या लोकांमध्यें अभिमानाची व स्वार्थत्यागाची दृढभावना उत्पन्न होते.

हे प्रौढ समाज प्रारंभीं प्रामुख्याने धार्मिक, जातीय, सांस्कृतिक किंवा आर्थिक भावनेने प्रेरित असतात. पण जेव्हा त्यांतील व्यक्तींच्या सामान्य हालचाली व व्यवहार सर्वसाधारण हेतूने व ध्येयाने प्रेरित होतात व जेव्हा प्रत्येक व्यक्ति व संघ यांना त्यांच्या सामान्य जीवनक्रमांत अवश्य भाग मिळतो तेव्हा खरें राष्ट्र निर्माण होतें व त्याच्यांत स्थैर्य व सुसंगतता राहते.

समाजाचें स्वरूप म्हणजे मनुष्याची परस्पर संबंध ठेवण्याची व्यवस्थित पद्धति होय. समाजाच्या स्वरूपाचीं मुख्यत्वेंकरून तीन रूपांतरें समजलीं जातात, एक प्राथमिक, दुसरें मध्ययुगीन व तिसरें आधुनिक. प्राथमिक अवस्थेंतील जनसंघाचें स्वरूप लहान असून तुटक असे. त्या काळीं अन्नपाणी व वस्त्र यांचा पुरवठा करणें कठीण जात असे. तेव्हा दळणवळणाचीं वाहनें व उत्पादनाचीं साधनें कमी होतीं आणि विद्या व कला यांचें ज्ञान बाल्यावस्थेंत होतें. भ्रमणशील व मृगयाजीवी, पारधी व धनगरीवृत्तीचे लोक थोडया लोकांपुरतें भक्ष्य मिळवूं शकत. त्यांच्या पाळीव जनावरांच्या कळपांना चरावयाला विस्तृत तृणभूमि लागे. त्यामुळें त्यांच्यामध्यें मोठमोठे लोकसंघ स्थापित होत नसत. त्याचप्रमाणें वसाहती करून राहणाऱ्या प्रारंभींच्या लोकांमध्यें शेतकीची पद्धत ही पुष्कळ जमीन व्यापणारी, पसाऱ्याची व कमी पैदासीची होती. ती थोडया जागेंत अधिक उत्पन्न देणारी व शास्त्रीय नव्हती. त्यामुळें लहान आकाराचे अनेक संघ उत्पन्न झाले. त्यांच्यामध्यें उदरनिर्वाहाचीं साधनें हस्तगत करण्यासाठी व स्ववित्त व भूमि यांच्या पालनासाठी नेहमी कलह व युद्धें चालू असत. व ह्या प्राथमिक समाजांचें स्वरूप, परस्पर संबंध व वाढ हीं भौतिक साधनांवर अवलंबून असे. इतर संघांबरोबर नित्य चाललेल्या युद्धामुळें त्याच्या स्वतःच्या संघामध्यें एकीची भावना दृढ होई, लोकनायक उत्पन्न होत आणि अधिकाराच्या व आज्ञाधारकत्वाच्या कल्पना पसरत आणि हळू हळू परस्पर साहाय्यकारी पद्धतीच्या व नागरिकवृत्तीच्या मूलस्वरूपाचा प्रादुर्भाव होई.

प्राथमिक समाजांत चालीरीतींचें व रूढींचें प्राबल्य व धार्मिक समजुतीचें वर्चस्व असे. व्यक्तीला आचार व विचार यांचें स्वातंत्र्य नसे. त्याच्यावर गतानुगतिकत्वाचा परंपरेचा दाब असे. समाज हा स्थितिप्रिय व विचारांध असे व त्याचें व्यक्तीवर विशेष प्रभुत्व व सत्ता असे.

सुधारणेची पुढील प्रगति कलहाचें उच्चाटन व लहान संघांचे मोठे संघ करण्याच्या दिशेने झाली. हें कार्य नव्या धर्मप्रवर्तकांनी व क्षत्रिय राजांनी केलें. मध्ययुगीन काळांत हिंदु, ख्रिस्ती व मुसलमान धर्मांनी आणि मोठमोठ्या महत्त्वाकांक्षी राजांनी व क्षत्रिय लोकांनी हें काम केलें. त्यामुळें अनेक संघांचें धार्मिक व राजकीय संघटन झालें, आणि त्यायोगें समाजास नवें व व्यापक स्वरूप आलें. ह्या काळांत लोकांची वृत्ति अधिक पारलौकिक होती. त्यामुळें ऐहिक अभ्युदय व प्रगति विशेष झाली नाही. वेदान्त व वाङ्मय, विद्या व कला मात्र थोड्या बहुत अंशाने वाढल्या होत्या. त्या सर्वांचा मुख्य भाव पारमार्थिक होता. धर्माच्या दृष्टीने जगद्गुरूंचें, आचार्यांचें व भटभिक्षूंचें प्राबल्य विशेष होतें. ते आपलें श्रेष्ठत्व धार्मिक बाबींत व कधी कधी राजकीय व सामाजिक बाबींतही प्रतिपादीत असत. त्यामुळें धर्मगुरूंचे व राजांचे तंटे विकोपास जात असत. राजकीय कारभारांत राजे व त्यांचे मंत्री, अध्यक्ष व अधिकारी ह्यांची सत्ता चाले. राजे लोकांच्या बलहीनतेमुळें, प्रजेच्या अज्ञानामुळें व अर्थहीनतेमुळें आणि राज्यकारभाराच्या नडीमुळें सरदार व सरंजामदार यांची सत्ता दृढ झाली होती. त्यांचे सवते व स्वतंत्र सुभे व अधिकार असल्यामुळें मुख्य राजसत्ता बलहीन झाली होती. समाज हा अनेक व्यवसायात्मक, सांप्रदायात्मक व जात्यात्मक संघांचा बनला होता. तरीपण त्या काळांतील राज्यें व साम्राज्यें विस्तृत स्वरूपाचीं होतीं, समाज अधिक एकीचे, सुधारलेले, साहित्य-संगीत-कलाभिज्ञ, विचारवंत आणि त्याबरोबरच श्रद्धावान्, प्रामाण्यबुद्धीचे व पंथप्रेमी असे होते. मात्र त्यांच्यामध्यें प्रगतीची, शास्त्रीय ज्ञानाची, विवेकाची व ज्ञानोपासनेची लाट उसळली नव्हती. त्यांच्यामध्यें निःश्रेयस, धर्म, नीति व न्याय, परलोकाचें दारुण भय, पंथद्वेष, धर्मवेड व असहिष्णुता अशा भावनांचें विशेष प्राबल्य होतें. बहुजनसमाज मूढ, निरक्षर व दास्यस्थितींत होता. तेथे अल्पजनसत्ता चालू होती व कुलीनतेचें आणि जातिवैशिष्ट्याचें प्राबल्य होतें.

आधुनिक काळांत आपणास राष्ट्रस्वरूपाचे स्वाभाविक एकात्मक समाज, संयुक्त स्वरूपाचे निर्मित संघात्मक समाज आणि साम्राज्य स्वरूपाचे अस्वाभाविक एकतंत्री समाज दृष्टीस पडतात. आज त्यांचे विभाग

राजकीय घटनेच्या व स्वतंत्रतेच्या दृष्टीने मुख्यत: केलेले आढळतात. ह्या प्रत्येक एकात्मक राष्ट्रामध्यें, संघात्मक राष्ट्रामध्यें व साम्राज्यामध्यें वंश व धर्म ह्या कल्पनांना विशेष मान दिलेला नसतो. ते समाज राजसत्तेने एकवटलेले व बांधलेले असतात. त्यांतील लोक हे सहकार व साहचर्य राजनिर्बंधास अनुसरून करतात. त्यांच्यामध्यें स्वकीयांबद्दल प्रेम, परकीयांबद्दल द्वेष व राष्ट्रीय भावना हीं विशेष रूपाने असतात. परंतु आजचें नवें ध्येय वसुधैव कुटुंबाचें आहे. सर्व राष्ट्रें व राज्यें बंधुभावाने व शांततेने राहावीं व वागावीं, जगांतील लहान राष्ट्रांचीं संघराष्ट्रें व्हावीं, त्या सर्वांचें एक राज्यतंत्र असावें, त्यांच्यामध्यें सख्य व सहकार वाढावा अशा आजच्या कल्पना आहेत.

आज या राष्ट्रसमाजांतील नागरिकाला स्वकर्तव्याबरोबर राजसत्तेमध्यें अधिकार व समाजामध्यें स्वातंत्र्य हीं मिळतात. त्याला निर्बंध बदलण्यांत, शासनकारभारांत व न्यायदानांत भाग घेतां येतो. त्याला धार्मिक स्वातंत्र्य, आचार, विचार व संचार यांचें स्वातंत्र्य, लेखन व व्याख्यान यांचें स्वातंत्र्य आहे. त्याच्या आर्थिक, शैक्षणिक, शारीरिक व बौद्धिक गरजा व सुखसोयी यांच्याकडे लक्ष पुरविलें जातें. तेथे मनुष्याला मनुष्य म्हणून किंमत आहे, मग तो कोणत्याही धर्माचा, वंशाचा व संस्कृतीचा असो. त्याचें जीवित, वित्त, स्वातंत्र्य, सामर्थ्य व सुख ह्याचें रक्षण व पोषण योग्य प्रकारें व्हावें, त्याला हीन व दीन, पंगु व पतित स्थिति प्राप्त होऊं नये, त्याचें दु:ख, दारिद्र्य व इच्छा कमी व्हाव्यात, अशा प्रकारचा प्रयत्न राष्ट्र करतें.

समाज हा मनुष्यांच्या मनोवृत्तीमुळें आणि सहवास व साहचर्य यामुळें झाला असल्यामुळें त्याला कांही स्वतंत्र स्वभाव-स्वरूप असतें. त्याचें स्वत:चें मन असतें. त्यामध्यें अनेक वैयक्तिक भावनांची व विचारांची संगति व तडजोड लागते. समाज ही टिकणारी संघटना आहे. त्याला मनुष्यांच्या अनेक विरोधी इच्छा व आकांक्षा, आचार, विचार व व्यवहार यांमधून हितवर्धक व कल्याणप्रद मार्ग काढावे लागतात. म्हणून समाजाला सचेतन प्राण्याची उपमा दिली आहे. तो खराखुरा प्राणधारी पुरुष नसला तरी त्याच्याशीं त्याचें कांही साम्य आहे. त्यासारखी त्याची घटना असून

ह्या घटनेमुळें त्याला एकप्रकारचें शरीर व मन उत्पन्न होतें. त्याची परंपरा हा त्याचा स्वभाव होतो. त्याच्या कार्यकारी, निबंधकारी व निर्णयकारी संस्था ह्या त्याच्या मनाचे भाव, नीति व व्यापार प्रगट करतात, आणि त्याच्या प्रत्यक्ष व्यवहाराचीं व कार्याचीं अंगें व क्रिया दाखवितात. समाजाची संघटना कार्यविभागणीच्या तत्त्वावर झाली आहे. समाजपुरुषाला विवक्षित अवयव व कार्यें आहेत. समाजनीतीला विविध अंगें व उद्देश आहेत. ह्या कार्यविभागणीच्या संघटनेवर जगाची नैतिक प्रगति व सुख आणि व्यक्तीची परिणति अवलंबून आहे, अशी समाजशास्त्रकारांची दृढ समजूत आहे.

खरें पाहिलें असतां समाज ही देहधारी सजीव संघटना नाही. त्याच्या घटकांच्या परस्पर मानसिक व नैतिक संबंधामुळें त्यामध्यें एक प्रकारचें संघटनेने प्राप्त झालेलें चैतन्य आहे आणि क्रिया करणाऱ्या अंगांनी धारण केलेलें इंद्रियत्व आहे. तो सेंद्रिय पदार्थासारखा आहे, असें म्हणण्याचें कारण त्याच्या अवयवांचा परस्परांशीं मानसिक संबंध असतो. त्याच्या निरनिराळ्या भागांमध्यें परस्परांविषयीं सहानुभूति असते, त्यांचे हितसंबंध निगडित झालेले असतात व तें एकमेकांशीं सहकारिता करतात.

समाजाचें देहधारी सजीव प्राण्यापेक्षा संघटित संस्थेशीं अधिक साम्य आहे. तो मनुष्यनिर्मित असून त्याच्या मानसिक वृत्तींची व संबंधांची एक संघटना आहे. तरी पण एखाद्या सजीव वस्तुप्रमाणें त्याचें अवस्थांतर व विकास झालेला आहे. तो साध्या स्वरूपाच्या प्राथमिक अवस्थेंतून अनेक अंगांच्या आधुनिक स्वरूपांत आला आहे. त्यामध्यें कार्यविभागणी व कार्यें करणारीं अंगें यांची वाढ झाली आहे. त्याचप्रमाणें एखाद्या सजीव वस्तुप्रमाणें त्याचें उद्दिष्ट व आकांक्षा हीं आहेत.

कांही लेखक समाजाला एक प्रकारचा निसर्गसिद्ध, सेंद्रिय, देहधारी व सचेतन प्राणी समजतात. इतर त्याला यंत्राप्रमाणें एक कृत्रिम घटना मानतात. पहिल्या मताप्रमाणें त्याला मनुष्यासारखीं ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व एक प्रकारचा संघटित देह हीं असतात, आणि त्यांचीं कार्यें व अंगें परिस्थितीच्या आवश्यकतेनुसार बदलत किंवा वाढत जातात. या मताप्रमाणें मनुष्य समाजावांचून वांचणें व चांगल्या प्रकारें जगणें शक्य नाही

आणि त्याच्यावांचून मनुष्याला महत्त्वही नाही. समाजाला नीतिदृष्टि व हितदृष्टि आहे आणि उत्पत्ति, स्थिति, गति व लय हीं आहेत.

पण हें मत ग्राह्य होऊं शकत नाही. नुसत्या सादृश्यावरून साम्य प्रतिपादणें चुकीचें आहे. सजीव प्राण्यामध्यें व समाजामध्यें सादृश्याप्रमाणें भेद हे आहेत. त्याला स्वाभाविक देह, इंद्रियें व प्राण हीं नाहीत. त्याचें स्वरूप एक नाही व निश्चित नाही. मनुष्यावांचून त्याला संघटना नाही. मनुष्य हा स्वतंत्र, देहधारी, स्वयंभू, आत्मवश व उन्नत प्राणी आहे. त्याला नैतिक सामर्थ्य, इच्छाशक्ति, विवेक, बऱ्यावाईटांची जाणीव व व्यक्तित्व आहे. समाज तशा प्रकारचा नाही. समाजाला, मनुष्याच्या समाजशीलवृत्तीला वाव देणारा आणि आध्यात्मिक, मानसिक, आर्थिक व नैतिक संबंधांची संघटना करणारा व्यक्तिसमूह एवढेंच म्हणतां येईल.

समाजाचें मुख्य उद्दिष्ट, मनुष्यामध्यें उच्च प्रकारचें व्यक्तित्व उत्पन्न करणें व त्याची वाढ करणें आणि त्याबरोबरच मनुष्यामनुष्यामध्यें समाजशीलत्वाची व समाजनिष्ठेची योग्य जाणीव उत्पन्न करणें व त्याची वाढ करणें, हें आहे. समाजाच्या अधिकाराचें क्षेत्र व नियमनाच्या मर्यादा मुख्यत: मनुष्याचें आध्यात्मिक व कांही अंशीं नैतिक, मानसिक व शारीरिक स्वातंत्र्य सोडून त्याच्या सर्व व्यवहाराला व अंगांना लागू पडतात. त्याच्या आत्म्याच्या विकासाला व शरीराच्या व मनाच्या उन्नतीला समाजनियंत्रण आड आलें नाही पाहिजे; उलट तें त्यांना पोषक परिस्थिति निर्माण करून देणारें झालें पाहिजे. समाजाच्या अधिकारक्षेत्रामध्यें मनुष्याचें शिक्षण, रक्षण, धारणपोषण, व्यवहार व संबंध, व्यवसाय व वृत्ती ह्या प्रकारचे विषय येतात. त्यांचा योग्य अभ्यास करून त्यांचें योग्य शास्त्र व नियम तयार करून मनुष्याला वळण लावावयाचें असतें.

समाजाचें खरें हित कोणत्या तत्त्वांवर व ध्येयांवर अवलंबून आहे याबद्दल तत्त्वज्ञांमध्यें पुष्कळ मतभेद आहेत. कांहींच्या मतें मनुष्यें सद्गुणी व सदाचरणी झालीं म्हणजे तीं आपलें खरें हित व इतरांचें खरें हित ओळखतात व त्यामुळें समाजाचें खरें हित साध्य होतें. ह्या मतामध्यें स्वातंत्र्यप्रेरक शिक्षणाला व विचारस्वातंत्र्याला अधिक मान आहे. दुसऱ्यांच्या मतें समाजाच्या रचना व संस्था विशेष तत्त्वाने संघटित व ध्येयानें

प्रेरित झाल्या म्हणजेच 'पुष्कळांचें पुष्कळ सुख' अर्थात समाजहित साध्य होतें. ह्या मतामध्यें सुद्धा त्या विशिष्ट तत्त्वांना व ध्येयांना अनुसरून विशिष्ट शिक्षणपद्धति ठेवण्याची योजना आहे. पण त्यामध्यें स्वातंत्र्याला मान नसून विशिष्ट तत्त्वांना, ध्येयांना व योजनेला मान आहे. त्यामध्यें समतेचें तत्त्व अधिक ग्राह्य आहे. एका विशिष्ट योजनेनुसार मनुष्याला उत्तम परिस्थिति देणें व नियमन घालणें हा त्या मताचा उद्देश आहे, कारण त्यामध्येंच मनुष्याचें व समाजाचें हित आहे. एकामध्यें मनुष्याचें स्वातंत्र्य व दुसऱ्यामध्यें मनुष्याचें संघटन ह्यावर अधिक भर दिला आहे. एकामध्यें मनुष्याच्या सामर्थ्याला व इच्छाशक्तीला अमर्याद वाव आहे. दुसऱ्यामध्यें त्याच्या सौख्याची व सोयींची योजना आहे. पहिल्यामुळें अल्पसंख्याक बुद्धिमान, कर्तृत्ववान, उद्योगी व साहसी लोकांचा फायदा होतो व वैयक्तिक हित साधतें. दुसऱ्यामुळें बहुसंख्याक प्रयत्नहीन व साहसहीन, परिस्थिति व परंपरा यांनी पीडित लोकांचें सामाजिक हित साधतें. एकामध्यें वैयक्तिक प्राप्तीचा, व्यवसायाचा, साहसाचा, स्वातंत्र्याचा, कुटुंबपद्धतीचा व सुखाचा पवित्रपणा आणि समाजदृष्टीने त्यांची आवश्यकता हीं मानलीं आहेत. दुसऱ्यामध्यें, सामायिक संपत्ति, तिची सामायिक उत्पत्ति व वाटणी, गुणानुसार व्यवसाय, समता, संयम, विवाहस्वातंत्र्य व संततिनियमन यांचा पवित्रपणा व समाजहिताच्या दृष्टीने त्यांची आवश्यकता हीं मानलीं आहेत.

आज या मतांना अनुसरून अनेक वादप्रवर्तक उत्पन्न झाले आहेत. त्यांचें वर्गीकरण व्यक्तिवादी व समूहवादी, कुलीनवादी व साम्यवादी, निरंकुशवादी व नियंत्रणवादी असें करतां येईल.

मनुष्याचे सामाजिक उद्देश व हित समाजसंस्थांच्या द्वारें साध्य होतें. समाजसंस्था ह्या समाजव्यवस्थेचें स्वरूप व कार्यक्षेत्र दर्शवितात. त्यांच्या योगें सामाजिक जीवनाचें कार्य होतें. समाजसंस्थांबरोबर सामाजिक समजुती व चालीरीती तेंच कार्य करतात. समाजसंस्था ह्या अनेक आहेत. त्यांचीं रूपें स्थल, कार्य व काल यांना अनुसरून भिन्न झालीं आहेत. येथें कांही विशेष संस्थांचें वर्णन व विवेचन करावयाचें आहे. त्या म्हणजे आप्तस्वरूपाच्या गोत्रात्मक—कुल, कुटुंब व जाति; प्रादेशिक स्वरूपाच्या

स्थलात्मक ग्राम, नगर व देश, व्यावसायिक स्वरूपाच्या कार्यात्मक-वर्ण, संघ व श्रेणि, धार्मिक स्वरूपाच्या ध्येयात्मक-पंथ व सांप्रदाय हृया होत. इतर कृत्रिम स्वरूपाच्या करारात्मक संस्थाही आहेत. येथे आपणास नुसता आप्तविषयक संस्थांचा विचार करावयाचा आहे.

कुटुंब ही संस्था सर्व देशांत व समाजांत सापडते. सामाजिक सुस्थितीला व सुधारणेला तिचें विशेष साहाय्य झालें आहे. मनुष्याच्या संस्कृतीचा ती पाया आहे. मुख्यतः वंशविस्तारासाठी व वंशरक्षणासाठी एकत्र सहवास करणाऱ्या स्त्रीपुरुषांची सर्वांत लहान संघटना म्हणजे कुटुंब होय. त्यांच्या मुलांची गणना कुटुंबांतच होते. तेथूनच समाजरचनेला प्रारंभ होतो. कुटुंब ही 'रतिपुत्रफलवती' संस्था आहे. त्यामध्यें मनुष्याच्या कामिक व वात्सल्याच्या प्रबळ भावनांना वाव मिळतो व त्यांचें समाधान होतें. तिचें सामान्य कार्य म्हणजे विवाहाने जोडलेल्या स्त्रीपुरुषसंबंधाला व दांपत्यसहवासाला व सुखाला अप्रतिबंध मोकळीक देणें आणि त्यांच्या स्वतःच्या व मुलांबाळांच्या पालनपोषणासाठी, व शिक्षणासाठी सर्वोत्कृष्ट गोष्टी व चांगलें साहाय्य मिळविणें व त्यांना अनुरूप परिस्थिति आपल्या तंत्राने निर्माण करणें. स्त्रीपुरुषसंबंधाचें पावित्र्य, मुलांचें संगोपन व मुलांचा आज्ञाधारकपणा आणि स्त्रीपुरुषांचा उदरनिर्वाह व योगक्षेम चालण्यासाठी लागणारा व्यवसाय व उद्योग, हृया गोष्टींवर कुटुंबसंस्था अवलंबून आहे.

समाजव्यवस्थेंत कुटुंबसंस्थेचें महत्त्व फार मोठें आहे. तिच्या योगें समाजाचें बरेचसें कार्य पार पडतें. वंश, परंपरा व संस्कृति यांचें संवर्धन, संरक्षण व पोषण, गुण, नीति व धर्म यांचें शिक्षण व रक्षण, आश्रमव्यवस्थेचें पालन, वर्ण व व्यवसाय यांचें संपादन, विद्या व कला यांचें संवर्धन इत्यादि अनेक गोष्टी तिच्या योगें सुलभरीतीने पार पडतात. तिच्यामुळें नागरिकत्वाचे अनेक प्रथम पाठ-आज्ञाधारकत्व, कर्तव्य, बंधुत्व, सेवा, भूतदया, दान, त्याग, कारभार-प्रत्येक मनुष्यास मिळतात. तिच्या वातावरणांत मनुष्याच्या गुणांची जोपासना, त्याला शिस्त लागणें, त्याला साहस व संयम प्राप्त होणें, त्याची त्यागबुद्धि व परोपकारबुद्धि वाढणें इत्यादि गोष्टी होतात. हृयावरून समजून येतें कीं कुटुंबसंस्थेला आर्थिक, धार्मिक, कामिक, शैक्षणिक, नैतिक, सहवासाचीं, साहचर्याचीं

व सहकाराचीं अशीं अनेक अंगें आहेत. त्या दृष्टीने तिचें महत्त्व विशेष आहे. तिच्यामध्यें वित्ताचें स्वामित्व व वारसा, दायविभाग, दत्तक, विवाह व आप्तेष्टांशीं संबंध, याबद्दलचे नियम ठरविले जातात. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें तर गृहस्थाश्रमाचीं कर्तव्यें व थोरवी ह्या संस्थेमुळें कळते.

कुटुंबसंस्था ही प्राचीन काळापासून आर्यांमध्यें व पुष्कळ आर्येतर वंशांमध्यें प्रचलित आहे. तिचे अनेक प्रकार आहेत: पितृप्रधान व मातृप्रधान कुटुंब, विभक्त व अविभक्त कुटुंब हे मुख्य आहेत. पितृप्रधान कुटुंबव्यवस्थेंत पुरुषाची सत्ता प्रधान असते. त्याच्या तंत्राने सर्व चालतें. तो सर्व मिळकतीचा मालक असून, त्याच्या सत्तेखालीं घरांतील स्त्रिया, मुलें व चाकर असतात. तो कुटुंबाचा सर्व कारभार चालवितो. त्यांच्या रक्षणपोषणाचा तो अधिकारी असतो. तोच घरांतील कर्ता व गृहपति असतो. अशा कुटुंबांत बहुपत्नीकत्वाची चाल असते. स्त्रियांना स्वातंत्र्य व अधिकार फार थोडे असतात व घरांतील सर्व काम घरधन्याच्या तंत्राने करावें लागतें. खरें पातिव्रत्य हा त्यांचा मोठा गुण धरला जातो. पुरुषाच्या आचरणाला तितकें बंधन नसतें. त्याचें नीतिभ्रष्ट वर्तन गौण व दोषार्ह समजलें जातें, पण तें दंडनीय होत नाही. स्त्रियांचें नीतिबाह्य आचरण कुलाला कलंक आणतें व तें दंडनीय धरलें आहे. सध्या स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे समान अधिकार व स्वातंत्र्य मिळत आहे,आणि त्या दोघांना कुटुंबकारभारांत व व्यवहारांत सारखा मान व अधिकार असावा, असें प्रतिपादन केलें जात आहे. दोघांनी नीतीचा पवित्रपणा सारखा राखावा असा आग्रह आहे. बहुपत्नीकत्वाला तेथे जागा नाही. एक पति व एक पत्नी हीच प्रथा धर्म्य व न्याय्य समजली जात आहे. पुरुषप्रधान व्यवस्थेंत मुलांना बापाच्या तंत्राने व त्याने पुरविलेल्या संगोपनाने व शिक्षणाने चाललें पाहिजे. बापाच्या नंतर मिळकतीचा वारसा व गृहपतित्वाचे अधिकार त्यांच्याकडे येतात. मुलींकडे ते जात नाहीत. मातेला सुद्धा मुलांच्या तंत्राने वागावें लागतें.

मातृप्रधान कुटुंबव्यवस्थेंत गृहपतीचे अधिकार, स्वातंत्र्य व स्थान गृहिणीला असतात. तीच सर्व मिळकतीची व अधिकाराची स्वामिनी असते. पुरुषाला कनिष्ठ स्थान मिळतें. वारसाचे अधिकार मातेकडून कन्येकडे येतात. अशी रचना आज मलबार देशांतील नायर लोकांत व इतरत्र तुरळक प्रकारची सांपडते.

एखादा गृहस्थ, त्याची स्त्री व मुलें हीं एवढींच एके ठिकाणीं राहत असलीं तर त्यांना विभक्त किंवा एकटें कुटुंब म्हणतात. त्याच्या उलट त्याचे भाऊ, चुलते व त्यांचीं मुलेंबाळें व बायका हीं त्याच ठिकाणीं एकत्र राहत असलीं तर त्या सर्वांच्या कुटुंबांना अविभक्त किंवा एकत्र कुटुंब म्हणतात. एकाच मूळ पुरुषाचे वंशज दोनतीन पिढ्या जर एकत्र राहिले तर असें मोठें कुटुंब तयार होतें आणि जोंपर्यंत पितापुत्र, भाऊभाऊ, चुलतेपुतणे आपल्या मालमत्तेची वाटणी करून घेत नाहीत आणि जोंपर्यंत आपला आयव्यय, घरदार, अन्नवस्त्र व धर्मकर्म यांचे संबंध व व्यवहार तोडीत नाहीत, तोंपर्यंत ते अविभक्त कुटुंबाचे समजले जातात. अशा कुटुंबाचें राहणें खाणेंपिणें, आयव्यय, धर्मकर्म, मिळकत, इत्यादि एकत्र असते. घरदार व मिळकत हीं एकत्र मालकीचीं असतात. त्यां-च्यामध्यें कर्ता म्हणून वडिलाच्या अथवा वडील भावाच्या हातीं घराची व्यवस्था व व्यवहार हीं असतात. त्याच्या हस्तें कुटुंबाच्या अधिकारक-र्तव्याचे व्यवहार इतरांशीं घडतात. तो कुटुंबाचा प्रतिनिधि असतो. त्याच्या तंत्राने इतरांना सामान्यतः वागावें लागतें. जर एखाद्या पुरुषाचें इतरांशीं पटत नसलें तर त्याला वडिलोपार्जित सामुदायिक घरामध्यें व मिळकती-मध्यें वांटणी मागतां येते. त्याला त्याच्या कुटुंबांतील स्थानाप्रमाणें धन असलें तर योग्य वांटा मिळतो व ऋण असलें तर योग्य वांटा घ्यावा लागतो. परकुटुंबांत जाणाऱ्या मुलींना पितृकुटुंबामध्यें अधिकार नसतात. विवाह होऊन कुटुंबांत येणाऱ्या स्त्रियांना व अविवाहित मुलींना अन्न-वस्त्राचे, स्वामित्वाचे वाटयाचे, स्त्रीधनाचे इत्यादि मर्यादित अधिकार त्यांच्या हयातींत असतात.

पूर्वीच्या काळीं कुटुंबांतील गृहपतीला अथवा कर्त्याला मिळकतीवर व इतर मंडळीवर विशेष सत्ता असे. पण आता राजसत्तेने ती सत्ता नियमित केली आहे. नाहीतर अपराध्यांना शिक्षा व दंड करणें, त्यांचा सूड घेणें इत्यादि कामें कुटुंबच करीत असे.

एकत्र कुटुंबपद्धतींत कांही गुण असले तरी कांही दोषही आहेतच. तिच्यामध्यें आर्थिकदृष्टया आपत्कालांत एकमेकाला मदत होत असली तरी आळशी व कर्तृत्वहीन मनुष्याला समान अधिकार व भोग मिळतात

त्यामुळें उद्योगी, साहसी व कर्तृत्ववान लोकांवर इतरांच्या धारणपोषणाचा भार पडतो व त्यांच्या उत्साहाला आळा बसतो. आजच्या आर्थिक अडचणीच्या व स्पर्धेच्या युगांत प्रत्येक मनुष्याला प्रयत्न, साहस व श्रम हीं केलींच पाहिजेत. स्त्रीपुरुषांच्या उत्साहाच्या व साहसाच्या दृष्टीने एकत्र कुटुंबव्यवस्था अयोग्य ठरत आहे. समतेच्या व स्वामित्वाच्या समजुतीवर आपल्या संसाराचा योग्य भार न उचलतां एके ठिकाणीं राहून परस्परांशीं भाऊबंदकी करीत बसणें, हें कुटुंब व समाज यांच्या स्वास्थ्याच्या व प्रगतीच्या दृष्टीने घातक आहे. त्यामुळें कुटुंबाचें संगोपनाचें व संस्कृतिपोषणाचें कार्य योग्य प्रकारें होत नाही. त्याच्या स्वातंत्र्याला व संयमसाहसाला आळा पडतो, आणि जगाच्या धडपडींत त्यांतील माणसें अपुरीं पडतात. तीं नुसतीं गतानुगतिक व परंपराप्रिय होतात.

प्रत्येक कुटुंबाला एकाच पूर्वजाचे वंशज या दृष्टीने परंपरागत आचार, धर्म व देवता असतात. पुष्कळ लोकांत पूर्वजांची पूजा, श्राद्धें व तर्पणें करणें, असे कुलाचार असतात. त्याच्या योगें त्यांची नात्यागोत्याची एकी व आचारधर्माचें विशिष्टत्व कायम राहतें. आणि शरीरसंबंधाच्या दृष्टीने एका कुटुंबांतील स्त्रीपुरुषांचे विवाहसंबंध त्याच्या नात्यागोत्याच्या कुलांत न होतां, इतर पण सवर्ण व सजातीय अशा कुलांतील स्त्रीपुरुषांशीं होऊं शकतात.

आपल्या समाजांत कुलदृष्टीने त्याच गोत्राच्या व प्रवरांच्या कुटुंबाशीं शरीरसंबंध त्याज्य समजले आहेत. सगोत्रविवाहपद्धति धर्म्य नाही व तसेंच सवर्ण म्हणजे आपल्याच जातींतील इतर भिन्नगोत्रांच्या व प्रवरांच्या कुलाशीं विवाहसंबंध करण्याची पद्धति धर्म्य समजली जाते. ह्या दोन पद्धती-सवर्णविवाह (endogamy) व असगोत्रविवाह (exogamy) पुष्कळ समाजांत निश्चित रूपाने जरी पाळल्या जात नाहीत तरी स्थूलरूपाने चालू आहेत.

अशा पुरुषप्रधान कुटुंबपद्धतीमध्यें स्त्रिया ह्या बाहेरून येणाऱ्या व बाहेर जाणाऱ्या म्हणून त्यांचें स्थान अनेक प्रकारें कनिष्ठ स्वरूपाचें असतें. त्या मिळविणाऱ्या नसल्यामुळें आर्थिक दृष्टीने त्यांचा मान कमी असे. मिळकतीचें स्वामित्व व अधिकार अर्थार्जन करणाऱ्या पुरुषाकडे जात.

धर्माच्या दृष्टीने त्यांना पतीची आज्ञा पाळणें व सेवा करणें हे नियम पाळावे लागत. आणि पतीला देवाचें स्थान दिल्यामुळें तिला कोणतेच अधिकार नसत. तिच्या मागे अनेक कर्तव्यें व घरकामें लावलेलीं असत. सर्व प्रकारें ती पुरुषांवर—मग तो बाप, चुलता, नवरा, दीर अथवा मुलगा असो—अवलंबून असे. धर्म, अर्थ व काम यांच्या दृष्टीनें तिची स्थिति कनिष्ठ असे. तिला सत्ता, स्वातंत्र्य, समता, हीं नसत व पुनर्विवाह, शिक्षण, मिळकत, वारसा व व्यवसाय ह्या बाबतींत तिजवर बंधनें घातलेलीं असत. आज तीं बंधनें कमी झालीं आहेत व स्त्रियांना समान अधिकार व स्वातंत्र्य दिलें जात आहे. पूर्वी अर्धांगीची व सहधर्मचारिणीची कल्पना व्यवहारांत फारशी आढळत नसे. फार तर धार्मिक कृत्यांत नवऱ्याबरोबर तिला स्थान व मान असे. पण तिने स्वतंत्रपणाने वागणें, पुनर्विवाह करणें, हें गौण अथवा गर्ह्य कर्म समजलें जात असे. पतीच्या मरणानंतर सती जाणें अथवा जीवंत राहून पातिव्रत्य व वैधव्यव्रत राखणें धर्म्य समजलें जाई. पुनर्विवाह केलाच तर तिला पतित म्हणून गणलें जाई. पण पुरुषाला अशा प्रकारची दृढ बंधनें नसत. त्याला पुनर्विवाह, अनेकपत्नीविवाह, स्वैरकर्म इत्यादि गोष्टींना मोकळीक असे. याबद्दल बीजक्षेत्र संयोगाच्या व शुद्धतेच्या कांही विशिष्ट कल्पना असत. स्त्रियांच्या स्थितीच्या दृष्टीने व पुरुषांच्या नीतीच्या दृष्टीने कुटुंबसंस्थेची आज कोठे कोठे पुनर्घटना व पुनर्जन्म होत आहे.

व्यक्तिस्वातंत्र्याच्या, व्यक्तिसमतेच्या व व्यक्तिसुखाच्या अतिरेकी कल्पनांनी आज कुटुंबसंस्था मोडत चालली आहे. स्त्रिया, मुलें व चाकर यांचें स्थान, अधिकार व स्वातंत्र्य हीं वाढल्यामुळें ती विस्कळित झाली आहे. स्त्रियांना स्वतंत्र व्यवसाय व राजकीय अधिकार मिळत आहेत. मुलांना शाळेंत नवें शिक्षण व स्वातंत्र्य हीं मिळत आहेत. चाकरांना नवीं स्वतंत्र कामें मिळत आहेत आणि नागरिकत्वाचा समान अधिकार प्राप्त झाला आहे. त्यांच्या हालचालीवरील व स्वातंत्र्यावरील बंधनें आता कमी झालीं आहेत. तेव्हा कुटुंबाची आवश्यकता व सत्ता कमी झाली आहे. विवाहबंधनेंही कमी झालीं आहेत. विवाहाबद्दलचा पवित्रपणा जाऊन

त्याला करारांचें अथवा स्वेच्छेच्या सहवासाचें स्वरूप येत आहे. कांही ठिकाणीं व कांहींच्या मतें कुटुंबव्यवस्थाच सध्या अपुरी व अतएव त्याज्य आहे. जेथे जुन्या चालीरीती व समजुती निंद्य समजल्या जातात व जेथे मुलाबाळांचें संगोपन व शिक्षण सरकारी संस्थांत होऊं शकतें, जेथे व्यभिचार हा अपराध समजला जात नाही, जेथे स्वयंपाकपाण्याची सोय खानावळीमध्यें होते आणि जेथे करमणूक व विश्रांति क्लबांत, नाटकगृहांत व इतर ठिकाणीं मिळते, तेथे कुटुंबसंस्थेची आवश्यकता काय, असा प्रश्न आहे. आज आपल्या प्रापंचिक जीवनाचें मुख्य क्षेत्र व साधन कुटुंब हेंच शाहे. आणि तेंच आपल्या वैयक्तिक इच्छा, आकांक्षा व व्यवसाय यांचें अधिकारक्षेत्र आहे. प्रत्येक पुरुषाला आपल्या स्वभावानुरूप व परिस्थितीनुरूप वर्तण्यास कुटुंब हेंच आज स्थान आहे. त्यामध्यें त्यांच्या कायिक, कामिक व मानसिक गरजा मुख्यतः पुरविल्या जातात. तरीपण आज कुटुंबव्यवस्थेच्या गुणकर्माबद्दल अनेक आक्षेपही घेतले जात आहेत.

कांही आक्षेपक सुधारणावादी आहेत. त्यांच्या मतें कुटुंबाची रचना पतिपत्नीच्या समत्वाच्या दृष्टीने झाली पाहिजे. तिच्यामध्यें त्या दोघांचे अधिकार व कर्तव्यें समान असलीं पाहिजेत. घरांतील मिळकतीवर व व्यवस्थेवर त्यांचा सारखाच ताबा व अधिकार असला पाहिजे, आणि स्त्रियांना पुरुषांइतकेंच स्वातंत्र्य, सुख व विश्रांति मिळाली पाहिजे.

मुलांच्या दृष्टीने सुद्धा मातापित्यांचे अधिकार मर्यादित पाहिजेत. त्यांनी आपल्या कर्तव्याची जाणीव अधिक ठेवावयास पाहिजे आणि मुलांच्या शिक्षणांत त्यांच्या स्वभावाचा, इच्छांचा व स्वातंत्र्याचा अधिक परिपोष केला पाहिजे.

या सुधारलेल्या कुटुंबरचनेंत बालविवाह, एकत्र अविभक्त पद्धति, कन्यादान विवाहपद्धति, हुंडा, बहुपत्नीकत्व इत्यादि गोष्टी त्याज्य ठरविल्या आहेत. आणि प्रौढपरिणय, घटस्फोट, स्वयंवर, विधवाविवाह, एकपत्नीकत्व इत्यादींचा सादर स्वीकार केला आहे. स्त्रियांच्या शरीरावर जननाचा विशेष भार न पडावा व त्यांचें दांपत्यसुख अव्याहत चालावें म्हणून नवीन संततिनियमनाचें व संततिप्रतिबंधाचें शास्त्र व त्याचे मार्ग मान्य

समजले जात आहेत. त्यामुळें मुलांची संख्या नियमित झाल्याने त्यांचें पालनपोषण योग्य प्रकारें होण्याचा संभव आहे.

पण या सुधारणेमुळें अनेक नवे दोषही येऊं पाहत आहेत. मुलांची वृत्ति अधिक मिळालेल्या स्वातंत्र्यामुळें व सुखसोयीमुळें कणखर, काटक, परिश्रमी, स्वावलंबी, करारी व निश्चयी न होतां, ती विलासाकडे व विहाराकडे धावत आहे. त्यामुळें ती बरीच सामर्थ्यहीन, नेभळट, परावलंबी व परप्रत्ययनेय बुद्धीची होत आहे. त्यांना बंधनें नकोत, देव नकोत, धर्म नकोत. पंच ज्ञानेंद्रियें व पंच कर्मेंद्रियें यांना योग्य वळण लावून विद्याप्राप्तीच्या योगानें त्यांना सामर्थ्यवान करणें हें ती विसरत आहे. त्यामुळें त्यांचें मानसिक व शारीरिक बळ दृढतर उद्योगाला व आपत्ति निवारण्याला व्हावें तसें समर्थ होऊं शकत नाही.

अति सहवासाने स्त्रीपुरुषांमध्यें उच्च भावनेचा परिपोष न होतां क्षुल्लक गोष्टीवरून भांडणें, संशय घेणें, गलिच्छ आरोप करणें, यांचें कुटुंब बरेच वेळां माहेरघर बनतें. विलासीवृत्तीमुळें व्यभिचारही घडतो. या गोष्टींचे मुलांच्या कोवळ्या मनावर, समजुतीवर व वळणावर अनिष्ट परिणाम घडतात.

इतर आक्षेपक विध्वंसक आहेत. त्यांच्या मतें आजच्या नव्या परिस्थितींत व संस्कृतींत कुटुंबसस्थेचा मुळीच उपयोग नाही. उलट, ती घातक आहे असें त्याचें मत आहे. मुलांचें योग्य पालनपोषण, शिक्षण व स्वातंत्र्य या दृष्टीने आणि स्त्रियांचें स्वातंत्र्य व सुख या दृष्टीने कुटुंबव्यवस्था अयोग्य आहे. मुलांना संगोपनगृहें व शाळा यांमध्यें यथाशास्त्र पालन, पोषण, स्वातंत्र्य व शिक्षण मिळेल. स्त्रियांना व पुरुषांना सुद्धा आहार व विहार, निवास व व्यवहार यांसाठीं सार्वजनिक उपहारगृहें, नाटकगृहें, विश्रांतिगृहें, औषधालयें, रुग्णालयें, शुश्रूषालयें इत्यादि अनेक नव्या व उत्तम सोयी झाल्या आहेत. त्यांच्या तुलनेनें सर्व गरजा पुरविणारें एकच कौटुंबिक गृह फार अपुरें व असमाधानकारक आहे व कौटुंबिक बंधनें हीं स्वातंत्र्यहारक व सुखविघातक आहेत.

पण ह्या नव्या विध्वंसक मतामध्यें स्त्रीपुरुषांच्या खऱ्या सहवासाच्या व साहचर्याच्या सुखाला जागा नाही व मनुष्याच्या खऱ्या समाज-

शीलतेला स्थान नाही. त्यामध्यें कामिक भावनांकडे व स्वैरवृत्तीकडे अधिक लक्ष दिलें आहे; नैतिक, सामाजिक व आध्यात्मिक भावनांकडे दिलेलें नाही. शारीरिक व आर्थिक सुखांतच सर्व मानवी कल्याण व ध्येयें समाविष्ट झालेलीं नाहीत म्हणून तो भोगमार्ग व स्वैरवाद गर्ह्य आहे असें आमचें मत आहे.

कुटुंबसंस्थेने समाजनियंत्रणाचें व समाजनिष्ठा निर्माण करण्याचें उत्तम काम केलें आहे. तिने मनुष्याला समाजशीलत्वाचें,समाजाच्या सेवेचें, सहवासाचें व सहकारितेचें वळण लावलें आहे, तिने व्यवसायकलांचें व उद्योगधंद्यांचें कौशल्य पिढ्यानपिढ्या राखलें आहे. तिने विवाहाचें क्षेत्र आणि आनुवंशिक गुण व संस्कार, यांच्या योग्य मर्यादा राखल्या आहेत, तिने मनुष्याला अधिकार व कर्तव्यें, सत्ता व स्वातंत्र्य यांचा मेळ घालण्याला व त्यांना पाळण्याला शिकविलें आहे. तिने आप्तेष्टांच्या व सोयऱ्याधायऱ्यांच्या अडचणी सोडविण्यास साहाय्य केलें आहे आणि कुटुंबीयांच्या शिक्षणाची सोय पिढ्यानपिढ्या केली आहे.

ह्यांपैकी बऱ्याच गोष्टी आज सार्वजनिक संस्थांच्या द्वारें राजसत्ता करीत आहे, त्यामुळें कुटुंबसंस्थेचें काम व महत्त्व कमी होत आहे. कुटुंबसंस्थेवर आज असे नवे आक्षेप व आघात आले आहेत, कारण ती आज स्त्रीपुरुषांच्या व मुलाबाळांच्या इच्छा व गरजा भागविण्यास अपुरी पडत आहे.

जातिसंस्था ही प्राचीन असून सार्वत्रिक आढळते. समाजाच्या प्रारंभीं कुटुंबाचें अस्तित्व मान्य धरलें तर त्याच्या विस्तारापासून कुल हें एका पूर्वजापासून उत्पन्न झालेल्या अनेक कुटुंबांचा समूह होय. त्या कुलाचा पूर्वज अथवा गोत्रपुरुष एकच असल्यामुळें त्याच्या घटकांमध्यें विवाहसंबंध होत नाही. पण अशा अनेक पूर्वजांमध्यें समान परंपरा, व्यवसाय व चालीरीती असल्यामुळें त्यांचीं कुलें सवर्ण व सजातीय कल्पून आपापसांत विवाहसंबंध आणि इतर सामाजिक व घरोब्याचे व्यवहार करतात.

जातिसंस्था ही एकाच पूर्वजाच्या अनेक कुटुंबशाखांचा विस्तृत वृक्ष अथवा समूह नसून, ती समानस्वरूपी कुलांच्या सामाजिक संबंधांचें व अन्नोदकव्यवहारांचें राखीव क्षेत्र आहे. त्याच्या पलीकडे ते संबंध व व्यवहार

जावयाचे नाहीत. समान जातींचे व्यवसाय एकच असले पाहिजेत असें नाही. पण समान व्यवसायांच्या जातीना एक वर्ण असें संबोधीत असत. वर्णाच्या कल्पनेंत व्यवसायाची कल्पना मुख्य आहे. आणि जातीमध्यें ती विवाहसंबंधाची आहे. वर्ण ही जाति नव्हे आणि जाति ही एकाच वर्णाची नव्हे. पण कांही काळ जाती ह्या विशिष्टच व्यवसाय परंपरेने करूं लागल्यामुळें त्यांना त्या व्यवसायाच्या वर्णांत गणूं लागले. कालांतराने जाति व वर्ण ही एकच प्रकारची कल्पना व व्यवस्था आहे असें वाटूं लागलें आणि जातीला वर्णाचें व्यवसायात्मक अंग व वर्णाला जातीचें सामाजिक संबंधाचें अंग प्राप्त झालें. आणि जसजसे नवीन व विशेष प्रकारचे व्यवसाय वाढले तसतसें ते करणाऱ्या उपजाति वाढल्या. पण जाति हा शब्द येथे व्यवसायात्मक आहे, विवाहसंबंधात्मक नाही. तरी कालांतराने व्यवसायाच्या भिन्नतेमुळें उपजातीमध्यें सामाजिक संबंध व व्यवहार अवघड होऊं लागले, कारण भिन्न व्यवसायांना समाजाच्या दृष्टीने उच्च व नीच स्थान होतें.

जाती व उपजाती ह्या परंपरा, चालीरीती, संबंध व व्यवसाय यांच्या योगाने अनेक झालेल्या आहेत. पण वर्ण अथवा वर्ग हे सामान्यतः चार मानलेले आहेत. विचारी व पुजारी वर्ग, संरक्षक व लढणारा वर्ग, उत्पादक व व्यवहारी वर्ग, कामकरी व सेवक वर्ग, ह्या चार वर्गांची समाजाच्या स्वास्थ्याला आवश्यकता आहे. प्रत्येकजण आपल्या गुणकर्माप्रमाणें योग्य कार्य करूं शकतो. समाजाच्या हिताच्या दृष्टीने व व्यक्तीच्या उपजत मानसिक व शारीरिक वळणाप्रमाणें, हे वर्ण कल्पिलेले आहेत.

जातींच्या व उपजातींच्या अनेकत्वाचीं कारणें पुष्कळ आहेत. कांही मुळांतच वंशदृष्टीने व सामाजिक वैशिष्ट्यामुळें अस्तित्वांत होत्या. प्राथमिक समाजावस्थेंत त्या जन अथवा गण या रूपाने सापडतात. त्यांच्या चालीरीती व समजुती निरनिराळ्या असतात. त्यांच्यामध्यें नात्यागोत्याचे संबंध मर्यादित स्वरूपाचे असतात, प्रत्येक जात आपल्या रक्तामध्यें मिश्रण म्हणजे जातिसंकर होऊं देत नाही.

कांही जाती व्यवसायभिन्नत्वामुळें उत्पन्न होतात. व्यवसाय व कला यांच्या रक्षणाच्या व वाढीच्या करतां जात ही एकजुटीने राहत असे. त्यांच्या

मध्यें तींच कामें व कला पिढयानपिढया चालू राहतात. त्यामुळें त्यांच्या चालीरीती व समजुती एका वळणाच्या होऊन त्या इतर धंद्याच्या जातींपासून अलग राहतात. त्यांचे हितसंबंध व सामाजिक व्यवहार आपल्याच जातीमध्यें होऊं लागतात.

कांही जाती देशांतरामुळें उत्पन्न होतात. जुन्या स्वसम जातींशीं त्यांचा संबंध तुटतो व परप्रदेशांत नवीन स्वसम जातींशीं अनेक कारणांमुळें सहज संबंध जुळत नाहीत. त्यामुळें त्याच स्वतंत्र अशा उपजाती बनतात.

इतर जाती धर्मांतरामुळें अथवा नव्या सांप्रदायामुळें उत्पन्न झाल्या आहेत. धर्माच्या भिन्नत्वामुळें त्यांच्यामध्यें सामाजिक भिन्नत्व व विरोध उत्पन्न होतात आणि मग त्या स्वतंत्र स्वरूपाच्या व आकांक्षेच्या होतात.

खरें पाहिलें असतां आचारांचा पवित्रपणा व रक्ताची व वंशाची शुद्धता यावर जातिकल्पना अवलंबून आहे. आपले आचार व व्यवहार उच्च, आपलें रक्त व भाषा शुद्ध आहेत व इतरांचे कनिष्ठ व भिन्न आहेत, हा प्रत्येक वरिष्ठ गणल्या जाणाऱ्या जातीचा समज असतो.

जातिव्यवस्थेंत कांही गुण व कांही दोष दृष्टीस पडतात. पण आज ती राष्ट्रीय दृष्टीने व सामाजिक समतेच्या दृष्टीने ग्राह्य धरली जात नाही, उलट गर्ह्य समजली जात आहे.

जातींच्या योगें समाजांत स्वतंत्र असे बलवान घटक उत्पन्न झाले, आणि त्यांनी समाजाची धार्मिक, राजकीय व आर्थिक कामें योग्य प्रकारें केलीं. वैयक्तिक स्पर्धेचें व चढाओढीचें, सामाजिक संबंधाचें व व्यवसायाचें क्षेत्र त्यामुळें आंखलें गेलें, आणि प्रत्येक व्यक्तीला आपापल्या जातीमध्यें संधि मिळाल्यामुळें त्यांनी इतर संस्थांच्या अभावीं विद्या, वाङ्मय, कलाकौशल्य, धनोत्पादन व दानधर्म यांचें रक्षण व वाढ हीं केलीं. समाजसंस्थेच्या रक्षणाचें व नियंत्रणाचें कार्य त्यांनीच केलें आहे. पूर्वी हें काम राजसत्तेकडे व धर्मसत्तेकडे नव्हतें. राजसत्तेकडे नुसतें शांततारक्षणाचें, अपराधशासनाचें व समाजव्यवस्था बिघडवूं न देण्याचें काम असे. धर्मसत्तेकडे समाजव्यवस्थेचा पवित्रपणा प्रतिपादण्याचें काम असे.

जातीच्या बंधनामुळें इतर कनिष्ठ जातींशीं संकर न होतां कांही आनुवंशिक व परंपरागत उच्च संस्कार व कलाकौशल्य आणि कांही

नैतिक, मानसिक व शारीरिक गुण टिकले. धनोत्पादनाच्या दृष्टीने व्यवसायाची व श्रमाची विभागणी झाल्यामुळें त्यांचा उत्कर्ष व वाढ झाली. आणि जातिसंस्था ही धर्मसंमत आहे, अशा दृढ समजुतीमुळें निरनिराळ्या जातींमध्यें द्वेष व असंतोष पसरला नाही, आणि जो तो आपले वडिलोपार्जित व्यवसाय व व्यवहार करूं लागला. त्यामुळें समाजव्यवस्थेमध्यें क्रांति झाली नाही. प्रत्येक जातीचे विशेष धर्म व व्यवसाय राखले जाऊन परस्पर व्यवहार सोयीने होत गेले व त्या सर्वांच्या कार्यक्षमतेमुळें समाजाचें सर्वांगीण कल्याण झालें.

आजच्या परिस्थितीमध्यें जातिसंस्थेचा उपयोग कमी झाला आहे. समतेच्या व स्वातंत्र्याच्या ध्येयामुळें, शिक्षणाच्या सोयींमुळें, नव्या सामाजिक सिद्धांतांमुळें व वाढलेल्या दळणवळणामुळें मनुष्य हा जातिबंधन मानण्यास तयार नाही. त्याला वाटेल तो आर्थिक व्यवसाय करण्याचा व वाटेल तो सामाजिक संबंध जोडण्याचा अधिकार व स्वातंत्र्य आहे, अशी त्याची समजूत झाली आहे. जातीचें बंधन हें त्याच्या राजकीय एकीला व उन्नतीला बाधक झालें आहे. आज जातीजातीमध्यें सहिष्णुता, सहानुभूति व सहकारिता राहिली नाही. त्यामुळें राष्ट्रीय समाजाला लागणारी अंतिम ऐक्याची भावना त्यांच्यामध्यें सांपडत नाही. समाजामध्यें जाती ह्या अनेक विरोधी व स्वार्थी घटक होऊन बसल्या आहेत. त्यांना राष्ट्रहिताची व ऐक्याची इच्छा उरलेली नाही. जातींच्या बद्धतेमुळें समाजामध्यें लागणारी लोकसंग्राहक व विचारसंग्राहक वृत्ति नाहीशी झाली आहे. परचक्राला व संकटाला आणि सामाजिक व आर्थिक आपत्तींना तोंड द्यावयाचें सामर्थ्य व उल्हास राहिला नाही. जो तो आपलें जातिहित पाहत आहे. आपल्या समाजव्यवस्थेंत जातीचें प्राबल्य फार आहे. त्याच्या योगें आपले धार्मिक, आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व आरोग्यविषयक आचार व विचार मर्यादित व नियमित झाले आहेत. राजसत्ता व धर्मसत्ता ह्या बाबतींत विशेष बदल करूं शकत नाहीत. पण इतरांच्या चढाओढीमुळें आलेल्या आर्थिक अडचणी, धार्मिक व सामाजिक सुधारणा पंथांचे विचार, राजकीय आकांक्षा, पाश्चात्य सामाजिक तत्वज्ञानें व व्यवस्था, धर्मान्तरें, नवें शिक्षण, हीन जातींची जागृति, दळणवळणाची

वाढ व परस्परांचा अधिक सहवास व साहचर्य, ह्या अनेक कारणां-मुळें जातिव्यवस्था व जातिकल्पना शिथिल झाली आहे. लोकसत्ता व राष्ट्रीयता ह्या प्रबल भावनांनी लोकांचीं पूर्वीचीं मतें बदललेलीं आहेत आणि जो तो समता, स्वातंत्र्य व ऐहिक सुख ह्यांच्या मार्गे लागला आहे. जातीच्या आनुवंशिक गुणांकडे ते दुर्लक्ष करतात. येत्या काळांत जाति-व्यवस्था लयाला जाण्याचा संभव आहे.

**विवाहसंस्था** ही स्त्रीपुरुषाच्या संभोगस्वातंत्र्यावर व वैषयिक अतिरेकावर बंधन घालणारी आहे. ती प्रथम बालसंगोपनाच्या दृष्टीनें अस्तित्वांत आली. पुढे ती वात्सल्यप्रेमाने, कामिक इच्छेने, मत्सराने व धर्माज्ञेने टिकली. विवाहित स्त्रीपुरुषांच्या विवाहबाह्य संबंधांना व्यभिचार हें नांव प्राप्त झालें व तो करणें हें धार्मिक पाप व सामाजिक अपराध गणलें गेलें. विवाहसंस्था व त्याबद्दलचे मुख्य नीतिनियम सर्व प्रौढ समाजांना अजून मान्य आहेत. विवाहाचे प्रकार मात्र ठिकठिकाणीं व निरनिराळ्या जातींमध्यें भिन्न आहेत. सध्या विवाह हा स्वयंवर पद्धतीने व प्रौढपणीं होणें इष्ट आहे असें मत पुढे येत आहे. बालविवाह त्याज्य समजला जात आहे; कारण त्यामुळें शरीराला अपाय होतो व आयुष्य कमी होतें, आण-खी नवराबायकोमध्यें अनुरूपता, प्रेमभाव व सहकार उत्पन्न होत नाही, असा समज होत चालला आहे. शरीराने व मनाने वयांत यावयाच्या अगोदर शरीरसंबंध करणें योग्य नाही, असें नवें मत आहे.

आज पुनर्विवाह हा योग्य धरला आहे. पति अथवा पत्नीच्या अका-लिक मरणामुळें तरुणतरुणींना पुन्हा विवाह करूं देणें अधिक श्रेयस्कर समजलें जात आहे. त्यामुळें इतर अनीतीला अतिरेकाला व व्यभिचाराला आळा बसतो, व समाजाची नीति बिघडत नाही. विवाहाने विषयी लो-कांना बंधन पडतें व समाजस्वास्थ्य बिघडत नाही. गर्भपात, बालहत्या, वेश्याव्यवसाय व टाकलेलीं मुलें यांची वाढ कमी होते.

आजच्या विवाहपद्धतींत स्वातंत्र्याचें व समतेचें तत्व अधिक मान्य झालें आहे. ज्याने त्याने आपल्या पतीची अथवा पत्नीची आपल्या इच्छे-प्रमाणें निवड करावी व पुढे आपसांत जमलें नाही तर विवाह-बंधनांतून सोडवणूक करून घ्यावी आणि असलेल्या मुलाबाळांचें संगोपन

व शिक्षण आणि उदरनिर्वाहाची व व्यवस्था कांही तडजोडीने करावी असा प्रघात पडत चालला आहे.

लग्नसंस्थेवरही नवे आक्षेप व आघात सुरू आहेत. ती नाहीशी करण्यापासून तों तिचें इच्छेनुरूप बंधन व मर्यादा पाळण्यापर्यंतच्या कल्पना बाहेर पडत आहेत. तिचें आमरण बंधनात्मक स्वरूप सोडून आपल्या इच्छेनुरूप सहवास करावा व सोडावा अशा मतांचें प्रतिपादन होत आहे.

आमच्या मतें ही नवी वासना व मनीषा मनुष्यांच्या अर्थकामप्रधान वृत्तीमुळें उत्पन्न झाली आहे आणि उच्च कल्याणाच्या दृष्टीने ती कुटुंबसंस्था, नीति व संस्कृति यांना घातक आहे. ही आहारनिद्रामैथुनाची पाशवी वृत्ति सर्व नैतिक व आध्यात्मिक पुरुषार्थाचा नाश करणारी आहे.

**दासभाव व अस्पृश्यता** ह्या समजुती पूर्वीच्या लोकांना मान्य असत आणि पुष्कळसे लोक दासांच्या व अस्पृश्यांच्या अवस्थेंत पडलेले असत. अरिस्टॉटलच्या मतें कांही लोक जन्मतःच व वंशपरंपरेने दास असतात. आपल्याकडे कांही जाती जन्मतःच अस्पृश्य मानल्या आहेत. अशा मतांमुळें व रूढीमुळें अनेक लोकांना समाजांत कनिष्ठ प्रतीचें आणि अधिकार व सत्ता विरहित स्थान मिळे. त्यांना हीन प्रकारचे व कष्टाचे धंदे दिले जात असत. त्यांना राजकीय, सामाजिक, धार्मिक व आर्थिक स्वातंत्र्य नसे. त्यांना फार वाईट रीतीने वागविलें जात असे. कांही ठिकाणीं त्यांनी कष्ट करून उत्पन्न केलेल्या व मिळविलेल्या संपत्तीवर त्यांचा ताबा व मालकी नसे आणि त्यांचें घरदार व कुटुंब हीं सुद्धा स्वतंत्र नसत.

कांही महापातकामुळें अथवा अपराधामुळें समाजबहिष्कृत व सत्ताबहिष्कृत झालेले लोक, अथवा युद्धामध्यें जिंकलेले लोक यांचा भरणा या वर्गांत होई व पुढे त्यांचे वंशज त्याच स्थितींत अडकून राहत. कांही ठिकाणीं धर्माच्या उपदेशामुळें, राजसत्तेने साहाय्य केल्यामुळें, पळून जाऊन अथवा साम-दाम-दंड-मार्गाने त्यांची सुटका होई, आणि कांही ठिकाणीं जातिपद्धतीमुळें अथवा धार्मिक, आर्थिक व राजकीय अडचणीमुळें त्यांना त्याच स्थितींत राहणें भाग होई.

आज ह्या कल्पना गर्ह्य समजल्या जात आहेत. प्रत्येक मनुष्याला समता व स्वातंत्र्य हीं आहेत. तो जन्मतःच अथवा पिढीजाद कुणाचा

तावेदार नाही. त्याला धार्मिक, राजकीय, आर्थिक व सामाजिक व्यवहारांत सारखें स्थान व स्वातंत्र्य असलें पाहिजे. त्याला आपल्या इच्छेप्रमाणें व्यवसाय व व्यवहार करण्यास मोकळीक आहे. त्याची आपल्या मिळकतीवर कुटुंबरचनेवर स्वतंत्र मालकी आहे. आज जगांत दास्यावस्था व अस्पृश्यता ह्या कमी झाल्या आहेत आणि ज्या ठिकाणीं त्या अस्तित्वांत आहेत तेथे सुद्धा त्या मोडकळीस आलेल्या आहेत. पण प्रत्येक राष्ट्राने, समाजाने व धर्माने त्या मोडून टाकल्या पाहिजेत आणि प्रत्येक मनुष्याला आपलें मानवी कल्याण प्राप्त करून घेण्यासाठी सोयी, शिक्षण, स्वातंत्र्य व अधिकार हीं दिलीं पाहिजे त.

**अन्नोदकसंबंधांच्या** समजुतीचे विधिनिषेध सांप्रत कमी होत चालले आहेत. याचीं कारणें म्हणजे इतर जाती, वर्ण व लोक यांच्या बद्दलची भीति व द्वेष हीं कमी होत चाललीं आहेत, परस्परांत दळणवळण व सख्य हीं वाढत आहेत, राहणीचे व खाण्यापिण्याचे प्रकार हळूहळू सारखे होत आहेत, स्वच्छतेचे व रुचीचे प्रकार समान होत आहेत, आणि धर्माचीं खाण्यापिण्याचीं बंधनें ढिलीं पडत आहेत. पूर्वी अन्नोदकव्यवहारासंबंधाचे कडक निर्बंध असत. त्यामध्यें कांही दैविक व कांही संकरप्रतिबंधात्मक उद्देश व उपदेश असत. आज त्यांमध्यें श्रद्धा राहिलेली नाही. आजचे खाण्यापिण्याचे व शिवाशिवीचे प्रश्न वैद्यकदृष्ट्या संशोधिले जात असून, त्यांचा मनुष्याच्या आरोग्यास, शरीरपुष्टीस व बलवर्धनास काय उपयोग होईल हें पाहिलें जात आहे. गलिच्छ अन्नपाणी व दुर्गंधियुक्त माणसें यांपासून दूर राहणें आवश्यक आहे. तसें करण्यास कोणताच नैतिक प्रत्यवाय नाही.

प्रत्येक समाजाला सामाजिक सुधारणेचें व सेवेचें अंग असलें पाहिजे. त्याच्यायोगें सामाजिक व्यवस्थेचें, संस्थांचें व समजुतींचें यथाशास्त्र व यथासांग परीक्षण होऊन, समाज हा बलयुक्त, स्वातंत्र्यपोषक प्रगतिकारक व नीतिमान् राहील. मनुष्याच्या शारीरिक, मानसिक, सामाजिक, नैतिक व आध्यात्मिक स्वास्थ्याला व उन्नतीला समाजाच्या सर्व अंगांचें, रचनेचें व ध्येयाचें योग्य परीक्षण व तदनुसार सुधारणा हीं पाहिजेत. समाजांतील कांही वर्गांना समाजाच्या कांही संस्था व कांही समजुती जाचक होतात व त्यामुळें त्यांच्यामध्यें असंतोष व द्वेष पसरतो. त्यांमध्यें बदल केला नाही

तर आज नाही उद्या ते त्यांना विरोध करूं लागतात आणि त्यामुळें समाजांत फूट व अत्याचार होऊं लागतात. समाजांत एकी व शांतता ठेवण्यास त्यांच्या असंतोषाचीं कारणें शोधून त्यांच्या स्थितींत योग्य सुधारणा घडवून आणली पाहिजे. नाहीतर समाज बलहीन, स्वसंरक्षणाला, अभ्युदयाला व धारणपोषणाला अक्षम होतो आणि देशामध्यें परसत्ता व परधर्म यांचा प्रवेश व प्राबल्य सुरू होतें. समाजांतील भिन्न भिन्न वर्गांत परस्पर सहानुभूति व सहकारिता, प्रेम व परोपकारवृत्ति पाहिजे. अशी स्थिति असली तर समाजहित शक्य होईल.

जुनें तें चांगलें अथवा नवें तें अनुकरणीय अशा वृत्तीने समाजाचें खरें हित होत नाही. कांही तत्त्वानुसार, कांही ध्येयानुसार, कांही उपयुक्तता व आवश्यकता यांच्या अनुसार समाजाची सुधारणा झाली पाहिजे. जुन्याची फाजील प्रीति अथवा निंदा आणि नव्याची फाजील भीति अथवा स्तुति उपयोगी नाही. सर्व सुधारणा समाजाच्या चालू व्यवस्थेचें व समजुतीचें शास्त्रीय परीक्षण करून केल्या पाहिजेत. त्यांच्यांत परंपरागत विकारांना व भावनांना फाजील स्थान देतां येत नाही. समाजाचें धारणपोषण कसें होईल, त्याचें स्थैर्य व सुस्थिति कशी राहील, त्याचें वैभव व व्यवहार कसे वाढतील, यांचा विचार केला पाहिजे.

ह्या सर्व सुधारणांचा मूल उद्देश प्रत्येक मनुष्याला उच्च वृत्तीचा व नीतीचा, सुखी व सहकारी, साहसी व संयमी, स्वतंत्र व परोपकारी करावयाचा हा आहे. त्याच्या स्वभावामधील सुप्त असलेले सद्गुण, सद्विचार, शील व सामर्थ्य जागृत करणें हाच मुख्य हेतु आहे. जाचक बंधनापासून उपयोगी स्वातंत्र्याकडे, मूढावस्थेंतून ज्ञानाकडे, परच्छलापासून परसहिष्णुतेकडे, अंध प्रारब्धवादापासून मनुष्याच्या कर्तबगारीकडे, स्वार्थापासून परार्थाकडे, जीवनाच्या संकरावस्थेंतून संघटनेकडे नेणें हाच समाजाचा उद्देश व हेंच समाजाचें हित आहे.

प्रत्येक समाजांत कांही बऱ्या व कांही वाईट गोष्टी असतात. बऱ्यांमुळें तो तरतो. वाइटामुळें तो बुडतो. मनुष्याचें शील, शरीर व मन, त्याचें सामर्थ्य, स्वातंत्र्य व समता, त्याचा उत्साह, साहस व धैर्य, ह्यांचें संपादन व संरक्षण झालें पाहिजे. त्याकरतां कुटुंब, जाति, वर्ण, विवाह,

अन्नोदकव्यवहार इत्यादि संस्थांचा आणि कर्म, पुनर्जन्म, प्रारब्ध, प्रामाण्य, परलोक, शुद्धता, अस्पृश्यता इत्यादि समजुतींचा विचार करावा लागतो, आणि समता व स्वातंत्र्य, प्रयत्न व प्रगति, यांचा सामाजिक उपयोग व परिणाम काय होतो तो पाहावा लागतो.

वडिलोपार्जित व चालत आलें आहे तेंच खरें, चांगलें व दैवी, असा दैववादी व पुराणाभिमानी लोकांचा पक्ष सोडला तर सुधारणावाद्यांचे दोन विभाग करतां येतील; एक, धर्म, जाति व राज्यतंत्र यांच्या अधिकारानें सुधारणा करणारा आणि दुसरा, शिक्षणाने समजूत पटली म्हणून व स्वखुषीने सुधारणा करणारा. हे सुधारणावादी लोक अनुकरण, आवश्यकता व उपयुक्तता, जुन्या कल्पनांचें पुनरुज्जीवन अथवा नव्यां तत्त्वांचें ग्रहण इत्यादि साधनांच्या योगाने आपल्या समाजाची सुधारणा करूं पाहतात.

नुसतें अंधानुकरण योग्य नाही. स्थल, काल व कार्य ह्यांचा विचार करून योग्य गोष्टींचें अनुकरण करावें. प्रत्येक वेळीं समाजाच्या मूलतत्त्वांचा व स्वभावाचा, त्याच्या आवश्यकतेचा व आधाराचा विचार केला पाहिजे. अनुकरणीय गोष्टीसुद्धां जशाच्या तशा घेऊन विशेष उपयोग होत नाही. त्यांत परिस्थित्यनुरूप बदल करावा लागतो. नुसत्या अनुकरणाला विवेकाचा, अनुभवाचा व निश्चित तत्त्वांचा आधार नसतो.

गत गोष्टींचें किंवा गत समाजतत्त्वांचें पुनरुज्जीवन करणारे सुधारक गत काळांतील समाजस्थितीला आदर्शवत् समजतात व त्यापासून च्युत अथवा पतित झालेला समाज पुन्हा त्या वळणावर नेण्याचा प्रयत्न करतात. हाही सुधारणेचा मार्ग कोणत्याही अनुभवावर अथवा स्थल, काल व कार्य ह्यांच्या आवश्यकतेवर अवलंबून नसतो. तो त्यांनी कल्पिलेल्या एखाद्या विशिष्ट काळांतील समाजसंस्था व समजुती यांच्या काल्पनिक उत्कृष्टतेवर अवलंबून असतो. त्यामुळें त्या काळच्या समाजांतील दोष व भिन्नता यांकडे त्यांचें विशेष लक्ष गेलेलें नसतें. आजच्या समाजाचे खरे गुणदोष व भिन्नता यांकडे लक्ष न जाऊन त्याच्या आवश्यकतेचा परामर्ष घेतला जात नाही आणि समाजसुधारणेची चळवळ विवेकशून्य बुद्धीने चालते. उत्तम आचार व विचार कोणत्याही स्थळांतून व काळांतून घेतले तरी हरकत नाही. पण अमक्याच काळांतले, अमक्याच लोकांचे, अथवा

अमक्याच ग्रंथांतील आचार विचार उच्च व हितकारक आहेत असें मानणें अंधश्रद्धेचें व वेडेपणाचें होतें. प्रत्येक गोष्ट तावून सुलाखून घेतली पाहिजे. नव्या गोष्टी करावयाला जुन्या वचनांचाच आधार पाहिजे अशा वृत्तीचे लोक सुधारक नव्हेत, तर पापभीरु आहेत. प्रमाणवचनाविरुद्ध गोष्टी करणें म्हणजे ते पाप समजतात. वचनाच्या आधारावांचून कोण तीही "नवी" गोष्ट करावयास ते तयार नसतात.

खरे सुधारक उच्च नीतितत्त्वें, विवेकाचें परीक्षण, सद्बुद्धि, खरें सुखदुःख व उपयोग यांकडे लक्ष देतात. त्यांना गत गोष्टींची प्रीति अथवा द्वेष नसतो आणि नव्या गोष्टींची हांव व वासना नसते. ते परंपरा, परिस्थिति व प्राप्तव्य यांचा योग्य विचार करतात व आपला सुधारणेचा मार्ग उच्च नैतिक व आध्यात्मिक तत्त्वानुसार ठरवितात. त्यांच्यामध्यें मुख्य विचार समाजाच्या आवश्यकता व त्याचें खरें हित हाच असतो. ते खरें ज्ञान व अनुभव, सद्विवेक व सद्भावना यांच्या साहाय्याने आपला सुधारणेचा मार्ग ठरवितात व त्याप्रमाणें चळवळ करतात.

सामाजिक सुधारणा ही क्रमशः पावलापावलाने अथवा क्रांतिशः एकदम घडवून आणतां येते. पहिल्या प्रकाराने समाजाची हळूहळू प्रगति होते व समाजांतील शांतता नष्ट न होतां चळवळ यशस्वी व टिकाऊ होते. दुसऱ्या प्रकाराने समाजांत एकदम फेरबदल होतो आणि त्याला स्थिरता व शांतता कष्टाने प्राप्त होते. कांही सुधारकांना पहिला सावध-पणाचा, आणि इतरांना दुसरा शीघ्रतेचा मार्ग आवडतो. ह्या मार्गाची योग्यायोग्यता समाजाच्या चालू स्थितीवर अवलंबून असते. सुधारणेची आवश्यकता अतिशय तातडीची असली तर शीघ्र व तीक्ष्ण मार्गच श्रेयस्कर होतो. उलट, तिची तातड कमी असली तर सावधपणाचा मार्ग अधिक उपयोगी होतो. मनुष्याचें मन सुसंस्कृत अथवा सुधारणानुकूल झालें तरच सुधारणा यशस्वी व टिकाऊ होतात, लोकमत तयार असलें तर सुधारणा एकदम अमलांत आणणें योग्य आहे व त्या न करणें अन्याय्य आहे. तें तयार नसेल तर जागृत व अनुकूल केलें पाहिजे व सुधारणा हळूहळू अमलांत आणल्या पाहिजेत.

समाजसुधारणेचें काम पूर्वी धर्मसत्ता व जातिसत्ता करीत असे. आज तें काम राजसत्तेकडून होत आहे. पण परधर्माच्या व परजातीच्या परकीय राजसत्तेकडून तें काम होणें योग्य नाही. तसें होणें घातकच होईल, कारण त्यांचे उद्देश हे स्वार्थी व विरोधी असतात. पण स्वकीय राजसत्ता असेल आणि ती प्रातिनिधिक व लोकमतानुयायी असेल तर राजसत्तेच्या हातून हें समाजसुधारणेचें काम यथायोग्य होईल व झालें पाहिजे.

अगोदर सामाजिक सुधारणा का अगोदर राजकीय सुधारणा का अगोदर आर्थिक सुधारणा का अगोदर धार्मिक सुधारणा का अगोदर शैक्षणिक सुधारणा, अशा प्रकारचे अवास्तव व आग्रहमूलक प्रश्न अनेकवेळां उत्पन्न होतात. त्यावेळेस एवढी जाणीव ठेवली पाहिजे की समाजाची सुधारणा सर्वांगांनी व्हावयाला पाहिजे. एका अंगाला औषध देऊन इतर अंगें कुजत ठेवतां येत नाहीत. समाजाची सुधारणा सर्वांगांनी केली तर त्याची प्रगति होते नाहीतर कोणतीच विशिष्ट सुधारणा यशस्वी होत नाही. हीं अंगें एकमेकांना आधार असून पोषक आहेत. समाजपुरुषाला सर्वांगांनी पुष्ट केला पाहिजे.

आधुनिक समाजसुधारकांमध्यें सुधारणेचे नवे वारे वाहूं लागले आहेत. त्यांचा मुख्य कटाक्ष बंधनें तोडण्याचा आहे, संबंध जोडण्याचा अथवा निर्बंध घालण्याचा नाही. खरें पाहिलें असतां त्यांना कोणतेंच नियमन व नियंत्रण नको. राजकीय जीवनांत त्यांना राजा व राज्यतंत्र नको, आर्थिक जीवनांत त्यांना संपत्तीची वैयक्तिक वाटणी व मालकी नको, सामाजिक जीवनांत त्यांना कुटुंब, कुल व जाति या संस्था नकोत व विवाह व सावर्ण्य यांचें बंधन नको, धार्मिक अथवा नैतिक जीवनांतील त्यांना दैविक पापपुण्याच्या, गुणदोषाच्या व न्यायान्यायाच्या कल्पना नकोत आणि आध्यात्मिक जीवनांतील त्यागाच्या, संन्यासाच्या, सेवेच्या, उपासनेच्या, भक्तीच्या व परमार्थाच्या कल्पना नकोत.

ते विवाहसंस्कार व बंधनें बाधक समजतात. त्यांची भूमिका त्यागाची नाही. व्यक्तीच्या उन्नतीच्या बाबतींत ते ऐहिक सुख व स्वैरसंचार हीं चार्वाकाचीं मतें अधिक महत्त्वाचीं समजतात. त्यांचें मुख्य सूत्र प्रत्येकानें श्रम व उद्योगधंदा हीं केलींच पाहिजेत असें आहे. तरच त्याला खाण्या-

पिण्याला मिळेल. नाहीतर त्याला उपाशीं बसावें लागेल. त्यांचें मुख्य तत्त्व समतेचें असून, त्यांनी बऱ्याच धार्मिक, सामाजिक, राजकीय व नैतिक गोष्टींत मनुष्याला स्वातंत्र्य, स्वैरपणा व स्वच्छंदपणा हीं दिलेलीं आहेत.

कांही सुधारक तर दुर्बल व दुष्ट मनुष्याला समाजांत वावरण्याला व त्याच्या वंशवृद्धीला स्थान नाही असें प्रतिपादतात. त्याला वाळींत टाकणें, प्रजोत्पत्ति करूं न देणें, त्याला वांचविण्याचा प्रयत्न न करणें, ह्या गोष्टी मान्य व आवश्यक समजतात. समाजांतील स्त्रीपुरुष दृढ व बलवान असावे, व त्यांची प्रजा त्याप्रमाणें समर्थ असावी, अशा गोष्टींकडे त्यांचें लक्ष आहे.

समाजसुधारणा ही समाजसेवेच्या रूपानें चालली पाहिजे. नायक व नेते, शिक्षित व सुसंस्कृत यांनी मागसलेल्यांना, दीनांना, अडाण्यांना व पतितांना संधि व शिक्षण देऊन, त्यांची सेवा व सोय करून, पुढे आणलें पाहिजे. त्यांची भावना समाजांतील प्रत्येक व्यक्ति खाऊनपिऊन सुखी व सुसंस्कृत असावी अशी पाहिजे. अशा नीतिमान, न्यायशील, परोपकारी व सुशिक्षित समाजसेवकांच्या अविरत प्रयत्नाने समाजाची सुधारणा होत असते. ज्या समाजांत शुद्धचरित, उदारचरित, निःस्वार्थी, शिक्षित व शीलवान उपदेशक व समाजसेवक नाहीत तो समाज अधोगतीला जाईल. एकमेकाला निरिच्छबुद्धीने साहाय्य करणें व अडचणीच्या वेळीं दुसऱ्याची सेवा करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. समाजशीलत्वाचें तें द्योतक आहे. तसें केलें नाही तर वाइटाबरोबर चांगलेही पतन पावतात. अडाण्यांचा व वाइटांचा संसर्ग घातक आहे. समाजहिताच्या दृष्टीने समाजसेवकांची आवश्यकता आहे.

प्रत्येक लोकांत समाजसेवक व उपदेशक होऊन गेले व आहेत. त्यांनी दीनदुबळ्यांच्या, दुःखीदरिद्र्यांच्या व पतितपीडितांच्या करतां फार कष्ट व झीज सोसली आहे व त्यांच्या उन्नतीकरतां धर्मालयें, धर्मशाळा, अन्नछत्रें, रुग्णालयें, औषधालयें, ग्रंथालयें, विद्यालयें, पाठशाळा इत्यादि स्थापन केल्या आहेत. हींच कामें सेवासदनें, सेवासमित्या, सेवासंघ इत्यादि आज करीत आहेत. तीं अधिक प्रमाणाने व व्यवस्थित रीत्या

झालीं पाहिजेत. त्यामुळें मद्यपाननिवारण, वेश्यागमनप्रतिबंध, दीन व अनाथ यांचें रक्षण, अज्ञाननिर्मूलन, ज्ञानप्रसार इत्यादि अनेक गोष्टी होत आहेत. कांही धर्मसंघ व इतर सेवकसंघ हीं उपदेशाचीं व सुधारणेचीं कामें विशेष आस्थेनें करीत आहेत. त्यांचे उपदेशक व सेवक यांनी आपलें तनमनधन व आयुष्य अशा कामाला अर्पिलें आहे म्हणून समाज अधोगतीला जात नाही आणि पतित समाज व मनुष्यें सुधारत आहेत. साधुसंतांनी व त्यांच्या भक्तमंडळयांनी कथेकऱ्यांनी हीं कामें केलीं आहेत. त्यांच्या कल्पना उच्च धर्माच्या व नीतीच्या आहेत. त्यांच्यामध्यें प्रेमभाव, बंधुभाव, उदारता, क्षमा, सहिष्णुता, सेवाभाव, मैत्री, कृपा, व करुणा उत्कट स्वरूपाने वसत व नांदत आहेत.

आजकाल धर्मसेवक व समाजसेवक हे राजसेवकाप्रमाणें शिकलेले, अनुभवलेले व उदारचरिताचे लागतात. त्यांच्या करतां शिक्षणसंस्था आहेत. त्या समाजसेवेची पद्धति व उद्देश, समाजसुधारणेची आवश्यकता व तत्त्वें हीं यथाशास्त्र शिकवितात. त्यांनी सामाजिक प्रश्नांचें योग्य विवेचन करून समाजसेवेचें एक अनुभविक शास्त्र उत्पन्न केलें आहे. समाजसेवकाचें मुख्य लक्षण म्हणजे त्याच्यामध्यें मानवहिताची हार्दिक जाणीव व भावना पाहिजे. तेव्हाच समाज उचलून धरला जाईल व टिकेल. समाजांत त्यांनी उच्च नीतिभावनांचा प्रसार केला पाहिजे.

प्रत्येक समाजामध्यें, तो स्थानिक असो वा राष्ट्रीय असो, कांही मनुष्यें शरीराने, मनाने व नीतीने दुर्बल, पंगु व पतित असतात. कांही समाजद्रोहीही असतात. त्यांच्या अस्तित्वामुळें व संपर्कामुळें इतर सामान्य व बहुजनसमाजाला एकप्रकारचा धोका असतो, म्हणून समाजसेवकावर त्यांच्याबद्दलची एकप्रकारची जबाबदारी असते. त्यांचें पालनपोषण करणें, त्यांना शक्य तितकें सुधारणें आणि त्यांच्या दुर्गुणापासून बहुजन समाजावर दुष्परिणाम होऊं नये म्हणून त्यांना बहिष्कृत किंवा बंदीकृत, स्थलबद्ध किंवा नियमबद्ध करणें, आवश्यक आहे. पण त्याबरोबरच त्यांची योग्य काळजी घेणें हें समाजाचें कर्तव्य आहे. त्यांच्या सुधारणेकरतां संस्था स्थापणें, आलयें काढणें, नियम करणें इत्यादि गोष्टी झाल्या पाहिजेत. मानसशास्त्र, समाजशास्त्र सुप्रजननशास्त्र,

औषधशास्त्र, दंडनीति, इत्यादींचा उपयोग त्यांच्या व्यवस्थेसाठी केला पाहिजे. त्यायोगें त्यांच्या पंगुपणाचीं मूळ कारणें समजून त्यांच्या अवगुणांना प्रतिबंध करतां येईल. भ्रष्ट, भ्रमिष्ट, भिकारी, वेडे, दारुडे इत्यादि सर्वांचें याप्रमाणें नियमन, पालन व पोषण, त्यांना आलयांत ठेऊन, केलें पाहिजे. तद्वतच आंधळे, बहिरे, मुके, थोटे इत्यादींना शिक्षणाचीं साधनें व आर्थिक साहाय्य दिलें पाहिजे. त्यांच्याकडून शक्य असतील तेवढे श्रम करून घेतले पाहिजेत. सध्या अशा लोकांना स्वावलंबी करण्याच्या शाळा निघाल्या असून त्यांच्यामध्यें शिक्षण व साहाय्य दिलें जात आहे. ज्यांना काम मिळत नाही किंवा काम करतां येत नाही, त्यांना सुद्धा समाजानें काम मिळण्याची किंवा त्यांच्या पोषणाची सोय करून दिली पाहिजे. समाजांतील प्रत्येक मुलाची व मनुष्याची जबाबदारी त्यांतील जनतेवर व सत्तेवर आहे.

जगांत कांही गुन्हे मनुष्याच्या दुष्ट प्रवृत्तीमुळें घडतात आणि कांही समाजाच्या गैरव्यवस्थेमुळें व गैरसमजुतीमुळें घडतात. तेव्हा जे अपराध दुष्ट प्रवृत्तीचे आहेत त्यांचें नियमन व शासन हीं, जे अपराध समाजाच्या विशिष्ट प्रकारच्या व्यवस्थेमुळें व समजुतीमुळें होतात त्यांच्या नियमनाहून व शासनाहून, भिन्न पाहिजेत. वेश्यांचा व्यवसाय मात्र या दोन्ही कारणांमुळें उत्पन्न होतो.

सध्याच्या प्रौढ समाजाचे प्रकार व व्यवहार फार गुंतागुंतीचे, वाढते, व्यापक व अन्योन्यावलंबी असल्यामुळें प्रामाणिक माणसाचें जीवित सुद्धा, जर त्याच्याजवळ भांडवल, वशिला, विद्या, कला, वडिलोपार्जित मान व धन नसतील तर, फार कठीण झालें आहे. त्याचा स्वतंत्रपणा आणि कामाची व धंद्याची सुरक्षितता कमी झाली आहे, आणि पूर्वीच्या काळीं कौटुंबिक सुख व आर्थिक साधन यांची जी निश्चितता असे ती आज गेली आहे. त्यामुळें त्यांच्या कामिक व आर्थिक गरजा सन्मान्य रीतीने व सततपणें पूर्ण होऊं शकत नाहीत. तेव्हा ते एखादे वेळेस अशा परिस्थितीच्या अडचणीमुळें गुन्हा करण्यास प्रवृत्त होतात. त्यांची परिस्थिति व समाजव्यवस्था ह्या मुख्यतः त्यांच्या अधोगतीला कारण होतात. समाजांत थोड्या लोकांच्या हातांत संपत्तीचीं साधनें व त्यांची मालकी असल्यामुळें, अथवा मनुष्यांचे विवाह

आर्थिक कारणांमुळें व सामाजिक समजुतींमुळें योग्य वेळीं म्हणजे खऱ्या तारुण्यांत न झाल्यामुळें अनेक गुन्हे मनुष्याच्या हातून घडतात. अशा सामाजिक व आर्थिक व्यवस्थेच्या व त्याला पाठिंबा देणाऱ्या राज्यव्यवस्थेच्या विरुद्ध बोलणारे, लिहिणारे व वागणारे लोक यांना कांही देशांत अपराधी म्हणून शासन केलें जातें. तें शासन त्यांच्या दुष्प्रवृत्तीला नव्हे तर त्यांच्या भिन्न व समाजद्रोही मताला म्हणून आहे. नैतिक दृष्टचा ते अपराधी मुळीच नव्हेत. नैर्बंधिक दृष्टचा ते तसे आहेत, कारण सत्ताधारी व शासक ह्यांनी केलेल्या निर्बंधांच्या विरुद्ध त्यांची वागणूक असते.

दुष्टांना दंड व प्रतिबंध पाहिजेत. शक्य असल्यास त्यांना शिकविलें व सुधारलें पाहिजे. पण भिन्न अथवा विरोधी मतवाल्यांना कोणच्या नैतिक तत्त्वानुसार अथवा न्यायानुसार आपण शिक्षा करणार? ते आहे ती परिस्थिति बिघडवितात म्हणून कां आहेत ते निर्बंध पाळीत नाहीत म्हणून? जर ती स्थिति व ते निर्बंध गर्ह्य व त्याज्य असतील आणि ते सुलभ व सामाच्या मार्गानें बदलणें शक्य नसेल तर त्यांना विरोध करणाऱ्यांना कोणत्याच खऱ्या नीतितत्त्वानुसार शासन अथवा प्रतिबंध करतां येणार नाही. तसें केलेंच तर ' बळी तो कान पिळी ' अथवा ' आमचें तें खरें तुमचें तें खोटें ' अथवा ' राजा करील तो न्याय ' या समजुतीनुसार होईल. मग तो प्रश्न विवेकाच्या व न्याय्य समजुतींच्या क्षेत्रांतून जाऊन रणक्षेत्राचा व युद्धाचा होईल आणि ' जेथे धर्म तेथे जय ' या तत्त्वानुसार तेथें निर्णय न होतां ' जेथे जय तेथे धर्म ' हें तत्त्व अनुसरलें जाईल; अर्थात् तो प्रश्न विचाराच्या, नीतीच्या व न्यायाच्या कक्षेंतून बाहेर गेला असें होईल.

मनुष्यांना यथापराध दंड पाहिजे. पण खून, चोरी, मारामारी, व्यभिचार, लांचलुचपत, दरोडेखोरी इत्यादि महान अपराधांच्या मानानें राज्यपद्धतीविरुद्ध व समाजव्यवस्थेविरुद्ध बोलणाऱ्या व लिहिणाऱ्या लोकांना अतिशय कठोर व कडक शिक्षा दिल्या जातात, कारण प्रचलित राज्यव्यवस्था अथवा समाजव्यवस्था बिघडली तर अनेक वर्गांचे व व्यक्तींचे मानापमान, अधिकार, हक्क व आर्थिक हितसंबंध कोलमडून पडतील व त्यामुळें त्यांचें बरेंच नुकसान होईल.

सध्याच्या दंडपद्धतींत प्रथमच गुन्हा करणाऱ्यांना व तरुण अपराध्यांना कांही सवलती दिल्या जातात. त्यांचा उद्देश त्यांनी सुधारावें व शिक्षेच्या कठोरपणाने व करागृहाच्या दुष्ट संगतीने अधिक बिघडूं नये असा असतो. त्यांचा हेतु शिक्षा व शासन यांपेक्षा शिक्षण व सुधार हा असतो. दंडनीतीच्या नव्या कल्पनांप्रमाणें शिक्षेचा हेतु सूड व शासन हा नसून शिक्षण व सुधारणा हा आहे. अपराधी जरी दुष्ट वृत्तीचा असला तरी त्याला शिक्षणाने सुधारला पाहिजे. कठोर शिक्षेनें तो बिघडतो. त्याला पुन्हा समाजाचा उपयोगी घटक करणें हें अधिक योग्य व हितावह आहे. अपराध व अपराधी यांच्या नियमनाचें व निर्मूलनाचें मोठें शास्त्र आहे. व शास्त्र म्हटलें म्हणजे अपराधाचीं कारणें शोधून काढणें व तीं नाहींशीं करणें हें आलेंच. अपराध्याची वृत्ति वाईट असली तर ती सुधारणें, त्याची आर्थिक परिस्थिति व सामाजिक स्थिति वाईट असली तर ती बदलणें, चांगलें नीतीचें शिक्षण, कौटुंबिक सुख, आर्थिक सुस्थिति आणि धार्मिक व सांस्कृतिक जाणीव ह्यांच्याकडे विशेष लक्ष देणें, यायोगाने अपराध कमी होतील. जे मनाने व शरीराने दुर्बल असतील त्यांना वैद्यांच्यां संमतीने औषध व पथ्य देऊन सुधारलें पाहिजे. इतरांना धर्म, नीति, समाज व व्यवसाय यांचें शिक्षण देऊन सुसंस्कृत केलें पाहिजे. कांही लोकांना करमणुकी, मनोरंजन व श्रमपरिहार यांचीं साधनें वाढवून चांगल्या वृत्तींत ठेवलें पाहिजे. इतरांना काम, उद्योग व व्यवसाय देऊन गुंतविलें पाहिजे. त्यायोगें त्यांच्यामध्यें समाजवृत्तीची आवड व वाढ होईल. संन्यस्त व विरागी वृत्तींच्या लोकांचेही योगक्षेम पाहिले पाहिजेत. त्यायोगें त्यांच्यामध्यें समाजाबद्दल आदर राहील व खऱ्या प्रपंचाची महती टिकेल.



## प्रकरण सातवें

# आर्थिक जीवन

आर्थिक जीवनाचा आधार हा ज्या त्या देशाची सुपीकता, भूमिगत द्रव्यांची उपज, खनिजसंपत्ति, नैसर्गिक शक्ति, हवापाणी, मनुष्यांचें कलाकौशल्य, कल्पकता, शिल्प, स्थापत्य, शास्त्रीय ज्ञान, उपकरणें, यंत्रें, भांडवल, बळ व संस्था यांच्यावर अवलंबून आहे. या सर्व गोष्टींचा लाभ, रक्षण व वर्धन निसर्गावर, मनुष्याच्या कर्तृत्वावर व ज्ञानावर, त्यांनी संचित केलेल्या धनाच्या व यंत्रांच्या सामग्रीवर आणि राजसत्तेच्या पाठिंब्यावर अवलंबून आहे.

प्रत्येक देशापुढे आपल्या उदरनिर्वाहाचा व धारणपोषणाचा मोठा प्रश्न आहे. आर्थिक दृष्टया सुखासमाधानाचें जीवन हेंच त्याच्या उच्च नैतिक व आध्यात्मिक जीवनाचा मुख्य आधार आहे. चांगल्या आर्थिक परिस्थितीमुळें लोकांच्या आचारविचारांवर, वर्तनव्यवहारांवर व आयुष्यारोग्यावर हितावह परिणाम होतो. त्याकरतां देशांतील सर्व आर्थिक आधारांचा व साधनांचा विचार करावा लागतो. त्यावरून त्या देशाचें आर्थिक सामर्थ्य कितपत आहे व त्याची आर्थिक भरभराट कशी होईल हें सांगता येतें. मनुष्य हा आपल्या बुद्धिचातुर्याने, कलाकौशल्याने, श्रमाने, कृत्रिम साधनाने, यंत्र व शास्त्र यांच्या साहाय्याने आपल्या नैसर्गिक साधनांचा उपयोग व वाढ हीं करीत असतो. आणि त्यांच्या योगें आपल्या उदरनिर्वाहाला व भोगोपभोगाला लागणाऱ्या आर्थिक गोष्टींची पैदास करतो. देशामध्यें सोयीचे मार्ग, व्यापाराचीं, वाहनाचीं व दळणवळणाचीं साधनें व सुरक्षितता आणि राजसत्तेचें पाठबळ यांची त्याला आवश्यकता असते.

समाजाला व कुटुंबाला आर्थिक स्थितीची उपेक्षा करून चालणार नाही. प्रपंच व परमार्थ यांची योग्य सांगड घातली पाहिजे. प्रपंच नेटका केला तर परमार्थ नेटका होईल. प्राप्ति असली तर परार्थ घडेल. ऐहिक जीवनाच्या सिद्धतेवर उत्तम पारलौकिक जीवन अवलंबून आहे. 'आधी पोटोबा मग विठोबा.' गृहस्थाश्रमाच्या उत्तम स्थितीवर इतर आश्रम

व व्यवहार अवलंबून आहेत. प्रत्येक राष्ट्रांत असा अर्थाचा उत्पादक, पोषक व वर्धक वर्ग पाहिजे; त्यायोगें दुःख, दारिद्र्य, दीनता व असंतोष कमी होतात आणि इतर वृत्तींना व उद्योगाला मोकळीक मिळते. पण कविवर्य कालिदासाने म्हटल्याप्रमाणें मिळविलेला अथवा संचय केलेला अर्थ यांचा त्याग म्हणजे योग्य उपयोग व वाटणी झाली पाहिजे. संपत्ति ही नुसत्या संचयाकरतां, स्वार्थाकरतां अथवा अपकाराकरतां नाही, तर ती योग्य उपयोग, वाटणी, दान व उपकार यांकरतां आहे.

आर्थिक सुस्थितीला व सुधारणेला **राज्यसत्तेचें पाठबळ** पाहिजे. शिक्षण, शुल्क व करपद्धति, द्रव्यसाहाय्य, उत्तम वहातुकीचीं साधनें व मार्ग, अशा अनेक रूपाने तिने शेतकी, उद्योगधंदे, व्यापार व पेढ्या यांना साहाय्य केलें पाहिजे. त्यावाचून आंतरराष्ट्रीय चढाओढींत देशांतील उद्योगधंद्याचा टिकाव लागत नाही. त्यांना सर्वप्रकारें सवलती व संरक्षण हीं मिळालीं पाहिजेत. देशांतील प्रत्येक मनुष्याची अन्नवस्त्र, घरदार, धंदाव्यवसाय, शिक्षणसंगोपन, औषधपाणी आणि व्यायामविश्रांति, ह्यांची सोय कांही ठराविक प्रतीची व समाधानकारक प्रमाणांत झालीच पाहिजे. त्याचें वेतन अथवा उत्पन्न त्याच प्रमाणांत अथवा अधिक पाहिजे, कमी नको. लोकांना आळशी व निराश्रित, बेकार व बुभुक्षित राहूं देतां कामा नये. लोकांची उत्पादकशक्ति व प्रवृत्ति निरर्थक आळसांत खर्च होऊं देतां कामा नये. प्रत्येक मनुश्रम श्रम व उद्योग हा पाहिजेच. अशाच तऱ्हेने राष्ट्रांतील उद्योग धंद्यांची व व्यवसायांची व्यवस्था केली पाहिजे. थोड्या लोकांच्या हातीं संपत्ति व संपत्तीचीं साधनें राहूं देतां कामा नयेत. संपत्तीची विषम वांटणी ही असंतोषाचें व अनर्थाचें कारण आहे. त्यामुळें समाजाचें स्वास्थ्य व सुख बिघडतें.

मनुष्याचें जीवित नैसर्गिक साधनसंपत्तीवर विशेष प्रकारें अवलंबून आहे. तिचें यथाशास्त्र संरक्षण व सदुपयोग करण्यांतच राष्ट्राचें अस्तित्व, दीर्घायुष्य व सुख आहे. एका पिढीच्या किंवा एका वर्गाच्या हिताचा विचार न करतां राष्ट्राच्या सार्वजनिक कल्याणाचा, कार्याचा व दीर्घायुष्याचा विचार ठेवला पाहिजे. त्याला दूरदृष्टि, क्षमाबुद्धि, शास्त्रीय अभ्यास व ज्ञान हीं पाहिजेत.

देशाची साधनसंपत्ति कांही अव्याहत प्राप्त होणारी व चिरकाल टिकणारी, कांही परिमित पुरवठ्याची व कांही नव्या नव्या उत्पत्तीने व शोधाने प्राप्त होणारी असते. नव्याने मिळणाऱ्या साधनसंपत्तीचें सुद्धा योग्य रक्षण पोषण केलें तरच ती पुन्हा उत्पन्न होते व वाढते. पण तिच्या बीजाचा अथवा उगमाचाच नाश केला तर ती लवकर अथवा मुळीच प्राप्त होत नाही. उदाहरणार्थ, प्राणिज व उद्भिज्ज संपत्ति. परिमित पुरवठ्याच्या संपत्तीचें संरक्षण व उपयोग हीं विशेष काळजीने केलीं पाहिजेत; हें काम मोठ्या जबाबदारीचें आहे; उदाहरणार्थ, खनिज संपत्ति.

देशाच्या साधनसंपत्तीच्या दृष्टीने तेथील काम करणाऱ्या लोकांचें संरक्षण व पोषण अत्यावश्यक आहे. त्यांचें सामर्थ्य, कार्यक्षमता, कारागिरी, कलाकौशल्य, उद्योगप्रियता व आयुष्य वाढविणें हें त्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचें आहे. त्यांच्यामधील शरीर व सामर्थ्य यांचा क्षय करणारीं व्यसनें व व्याधी, उत्साह व उद्योग यांचा नाश करणारी परिस्थिति, पंगु व पीडित करणारे अपघात, हीं सर्व नाहीशीं केलीं पाहिजेत. आळसाला, विद्याकलाविहीनत्वाला, अनीतिकारक व्यसनांना आणि शरीरक्षयकारक व्याधींना नाहीसें केलें पाहिजे. प्रत्येक मनुष्य हा अर्थार्जनाच्या दृष्टीने रक्षणीय प्राणी आहे.

उद्योगधंद्यामुळें आपल्याला अन्नवस्त्र व घरदार मिळतें. म्हणजे उपजीविकेचीं व निर्वाहाचीं साधनें मिळतात. त्यांच्या वाढीमुळें व कलाकौशल्यामुळें तीं वाढतात आणि आपल्या अधिक सुखसोयी होतात. सध्या उद्योगधंद्यांची विशेष वाढ व विशिष्टीकरण झालें आहे. त्यामुळें देवघेव, दळणवळण, व्यापार व विनियम हीं वाढलीं आहेत. त्यामुळें लोक परस्परावलंबी झाले आहेत आणि वाढलेल्या लोकसंख्येला उदरनिर्वाहाचीं साधनें व सुखसोयी मिळत आहेत. उद्योगधंद्यांचें खरें कार्य समाजाचें भरणपोषण करण्याचें आहे. तेव्हां तें करणारांचें म्हणजे कामगारांचें सुख व समाधान पाहिलें पाहिजे. त्यांचे कामाचे तास, वेतन व वांटा, त्यांचें जीवित व शील यांचें रक्षण, शिक्षण व मनोरंजन, श्रमपरिहार व वार्धक्य इत्यादि गोष्टींचा विचार व सोयी केल्या पाहिजेत.

सध्या मालक व कामगार यांच्यामध्यें कलह व विरोध चालू आहेत. त्यांमधील मुख्य प्रश्न योग्य वेतनाचा व वाटणीचा, कामाच्या वेळेचा व व व्यवस्थेचा आहे. तो सोडविण्याचा प्रयत्न नवे साम्यवादी व जुने व्यक्तिवादी करीत आहेत. पण त्यांच्या निरनिराळ्या कल्पनांमुळें, उपाययोजनेमुळें, दिरंगाईमुळें व हट्टामुळें तो सुटणें अवघड झालें आहे.

व्यापाराच्या व दळणवळणाच्या वाढीने जग हें आर्थिक घडामोडींचें व देवघेवीचें सामान्य क्षेत्र बनलें आहे. त्यामुळें इतर देशाचे उद्योगधंदे, व्यापार आणि आर्थिक धोरण यांकडे आपणांस लक्ष द्यावें लागतें. त्यांचे आपल्या आर्थिक स्थितीवर व उदरनिर्वाहाच्या साधनांवर पुष्कळ वेळां घातक परिणाम होतात. त्यांना अनुसरून आपलें संरक्षक धोरण आखावें लागतें. आपल्या पेढ्या, व्यापारमंडळें व कारखाने यांना मदत करावी लागते. सरकाराला लोकहिताच्या दृष्टीने त्यांना साहाय्य, संरक्षण व प्रोत्साहन द्यावें लागतें व त्यांचें नियमन करावें लागतें.

प्रत्येक नागरिकाने, पंगु नसल्यास, स्वचरितार्थाकरतां कांही उद्योग हा केलाच पाहिजे. भीक मागून उदरनिर्वाह करणें ही मनुष्याला व राष्ट्राला तेजोहीन व बलहीन करणारी वृत्ति आहे. आळस हा मनुष्यत्वाचा घातक आहे. सध्याच्या समाजांत त्याने साधारणतः काटकसरीने, तरतूदीने व तरतरीने राहिलें पाहिजे. त्याचप्रमाणें समाजाने अर्थाची उत्पत्ति व वाटणी न्याय्य रीतीने होईल याकडे लक्ष पुरविलें पाहिजे. श्रम करणाऱ्याला श्रमाचा योग्य मोबदला समाजदृष्टीने मिळाला पाहिजे. काम करणाऱ्यांनी उपाशी अथवा अर्धपोटीं राहूं नये, त्याला काम करण्याला मिळावें, त्याच्या जीविताच्या, स्वातंत्र्याच्या व विश्रांतीच्या किमान गोष्टी त्याला मिळाव्या आणि त्याला पुढे जावयाला संधि, प्रोत्साहन व शिक्षण मिळावें, असा आजच्या समाजव्यवस्थेचा उद्देश आहे. दुःखी, दरिद्री व असंतोषी लोक हे समाजाच्या स्थैर्याला व सुस्थितीला घातक आहेत. सत्ता, संपत्ति व विद्या हीं थोड्यांच्या हातांत संकलित असणें हें फार धोक्याचें व अन्यायाचें आहे. "अर्थमूलौ धर्मकामौ," या कौटिल्याच्या सूत्राप्रमाणें धर्म व काम यांची सिद्धता अर्थावर अवलंबून आहे. वारसा हक्काने त्या बद्ध असणें हें सुद्धा कांही अंशीं अन्यायाचें ठरविलें जात आहे. श्रम, संपत्ति व सत्ता यांच्या-

मध्यें कांही नवी व्यवस्था व वाटणी झाली पाहिजे, असें सुचविलें जात आहे. जन्माने नाही पण कर्माने ह्या गोष्टींची व्यवस्था झाली पाहिजे. त्यायोगें काम करणाऱ्या नागरिकांमध्यें संतोष व समाजामध्यें सुस्थिति नांदेल. राज्यतंत्राला आपली आय-व्यय-व्यवस्था व कर-व्यवस्था ह्या श्रम-साहस करणाऱ्या उद्योगी लोकांना पोषक होतील अशा ठेवावयास पाहिजेत.

आर्थिक साधनांच्या व संपत्तीच्या, बाजारपेठेच्या व मागणीच्या दृष्टीने देशांतील लोकसंख्या ही मर्यादित असली पाहिजे. नाहीतर कला-कौशल्याच्या, उद्योगधंद्याच्या व विक्रीच्या अभावीं येवढ्या लोकांना खाण्या-पिण्यास व इतर आवश्यक गोष्टीस त्यांची संपत्ति व साधनें हीं पुरणार नाहीत. सध्या तर लोकसंख्या व तिच्या उदरनिर्वाहाच्या व इतर आवश्यकता इतक्या वाढल्या आहेत की यापुढे अधिक संपत्तीच्या अभावीं लोक-संख्या वाढणें फार घातक आहे. शेतकीप्रधान देशांत पैदा होणाऱ्या धान्य व इतर मर्यादित सामुग्रीवर तेथील मनुष्यांचा उदरनिर्वाह अवलंबून असतो. शास्त्रीय प्रगतीचे, कलाकौशल्याचे व उद्योगधंद्याचे लोक इतर देशांत आपला माल खपवून त्याच्या मोबदल्याने उदरनिर्वाह व संपत्ति मिळवूं शकतात तसें नुसत्या शेतकीवर अवलंबून राहणाऱ्या लोकसंख्येक-डून होत नाही. भूमीचें क्षेत्र व सुपीकता हीं मर्यादित असतात. त्यामुळें, वाढलेली लोकसंख्या उपाशी किंवा अर्धपोटीं राहूं लागते. कृषिप्रधान देश संपत्तीच्या दृष्टीने व वाढत्या लोकसंख्येच्या दृष्टीने भरभराटीचा राहत नाही व लोकांच्या सर्व गरजा भागवीत नाही. उद्योगप्रधान देश परदेशां-तील बाजारपेठांवर व आपल्या यंत्रसामग्रीवर अवलंबून असतो. देशादेशां-तील विरोध, कलह, युद्धें व संरक्षक कर हीं त्यांच्या खुल्या व्यापाराला प्रतिबंध करतात. खुला व्यापार तशा देशाला आवश्यक असतो. ह्यावरून असें अनुमान बांधतां येतें की प्रत्येक देशांतील कृषि, उद्योगधंदे व व्यापार यांच्यामध्यें कांही योग्य प्रमाण असेल तर त्याची आर्थिक स्थिति बऱ्याच अंशीं समाधानकारक राहण्याचा संभव आहे. खुल्या व्यापाराच्या किंवा शास्त्रीय व यांत्रिक पद्धतीच्या आधारें कांही देश सुसंपन्न राहावे व इतर दारिद्र्याच्या व उपासमारीच्या गर्तेत पडावे हें मुळीच योग्य नाही. तेव्हा जे देश, परसत्तेने आपल्या स्वार्थासाठी उत्पन्न केलेल्या आर्थिक नियंत्रणामुळें

व उद्योगधंदे बुडविल्यामुळें, अथवा इतर देशाच्या अवास्तव चढाओढीमुळें, क्षीण व दरिद्री झाले आहेत, त्यांना स्वदेशी, संरक्षण व बहिष्कार पद्धतीचें धोरण पत्करलें पाहिजे. आधुनिक राष्ट्रांचे आर्थिक हेतू व व व्यवहार हे फार हीन प्रतीचे असतात. त्यांची वैश्यनीति ही फसवेगिरीची व कुटिल वृत्तीची असते, आणि तिला राजसत्तेचें, शास्त्रीय ज्ञानाचें व संपत्तीचें पाठबळ असल्यामुळें, त्यांच्या हृया कृत्रिम चढाओढीला व आर्थिक आक्रमणाला कसून विरोध व प्रतिकार केला पाहिजे. तो मार्ग आवश्यक, न्याय्य व हितकारक आहे.

आर्थिक सुस्थितीला व उन्नतीला आज शास्त्रीय ज्ञानाचें, यांत्रिक साधनांचें, संपत्तीचें व राजसत्तेचें पाठबळ पाहिजे. त्यावांचून लोकांचे उद्योगधंदे व व्यवसाय पुष्कळ श्रम केले तरी टिकणार नाहीत. सध्याच्या काळांत गांवठी प्रकार व जुन्या पद्धति टिकणें अशक्य आहे. यांत्रिक शक्तीची व शास्त्रीय ज्ञानाची वाढ करून आणि त्यांचा फायदा घेऊन सर्व लोकांना काम व विश्रांति, संपत्ति व सवलती मिळतील असें केलें पाहिजे. राजसत्ता ही देशाच्या आर्थिक उन्नतीला पुष्कळ मदत करूं शकते. प्रथम ती शास्त्रीय व धंदेविषयक शिक्षणाच्या सोयी व शाळा निर्माण करते. नंतर शास्त्रीय शोध करणाऱ्याला द्रव्यसाहाय्य व प्रोत्साहन देते आणि उद्योगधंद्यांना रोख द्रव्याचें साहाय्य करते किंवा त्यांची स्वतः स्थापना करते. नंतर संरक्षक सवलती देऊन देशाचा व्यापार व देवघेव वाढविते. आणि संरक्षक जकाती ठेऊन परराष्ट्रांच्या खुल्या व्यापाराला प्रतिबंध करते. तद्वतच परदेशांत आपल्या व्यापाराला सवलती मिळविते.

सध्या जमिनीच्या स्वामित्वाचे प्रकार तीन आहेत. एक, जमीन ही प्रत्येक कुळाच्या मालकीची, तें कूळ राजसत्तेला आपल्या जमिनीच्या रक्षणाबद्दल नुसता कर देणारें, ती विकण्याचा व दान करण्याचा त्या कुळाला पूर्ण अधिकार. दुसरा, जमीन ही राष्ट्राच्या मालकीची व कुळें हीं राष्ट्राच्या वतीने कांही अटींवर जमीनीची नांगर पेरणी करणारीं, उत्पन्न घेणारीं आणि सरकाराला ठराविक सारा देणारीं. तो न दिल्यास सरकार त्यांच्या जमिनी जप्त करून त्या दुसऱ्यास विकूं शकतें व त्यांच्याकडून तोच सारा घेतें. त्या जमिनीकरतां पैसे दिले असले तरी सरकारी

मालकी व सारा सुटत नाही. तिसरा, सरकाराने आपले मालकी हक्क पुरे अथवा अंशाने कोणाला तरी दिलेले असतात आणि कुळें हीं त्यांना तो खंड अथवा सारा ठराविक प्रमाणांत देतात, सरकाराचा व अशा जमीनदारांचा परस्पर संबंध ठराविक पद्धतीने चालतो. कांही ठिकाणीं जमीन ही गांवाच्या मालकीची असते. तें गांव सरकाराला कर देतें, व लोकांना जमीन वांटून देतें आणि त्यांच्याकडून ठरावाप्रमाणें करवसूली करतें. या निरनिराळ्या प्रकारांना कुळाच्या मालकीची, रयतवारी, जमीनदारी व सामुदायिक अशीं नांवें आहेत. ह्या प्रत्येक पद्धतीमध्यें गुणदोष आहेत. आज मुख्य विरोध कुळाची मालकी कां राष्ट्राची मालकी यामध्यें आहे. राजसत्तेने सारा वारंवार वाढविल्यामुळें कुळांचा उत्साह व श्रम यांचें फळ त्यांना मिळत नाही व उलट ते निरुत्साही व निष्काळजी होतात. राष्ट्राची मालकी समतावाद्यांच्या तत्त्वांनी व हेतूंनी प्रेरित नसल्यामुळें एका बाजूला अडाणी, साधनरहित व निरुत्साही कूळ आणि दुसऱ्या बाजूला निष्काळजी व नियमाने सारावसूली करणारें कठोर सरकार, यांच्यामध्यें जमिनीची दशा व वाताहत झालेली आहे.

समतावादी जमिनीची मालकी राष्ट्राची मानून तिची सुधारणा व उत्तम उपज शास्त्रीय साधनाने करणें आपलें आद्य कर्तव्य समजतात. त्यामुळें जमिनीची सुपीकता राहते व वाढते आणि लोकांना अधिक धान्य व इतर गोष्टी मिळतात. ते आर्थिक साधनें व उत्पन्न समाजाच्या मालकीचें मानतात. त्यांच्या मतें वैयक्तिक मिळकतीची व मालकीची पद्धत अपवित्र, अप्रामाणिक व असमतावर्धक आहे. सर्व उत्पन्न व मिळकत हीं समाजाचीं आहेत. व्यक्तींना नुसता खाण्यापिण्याचा व इतर शारीरिक व मानसिक आवश्यकता उपभोगण्याचा सारखा अधिकार आहे. त्यांनी आपल्या शक्तियुक्तिप्रमाणें काम करावें व आपल्या भुक्तिप्रमाणें भोग भोगावे. त्यांना श्रम केल्यावांचून मात्र खावयाप्यावयाला व भोग भोगावयाला मिळणार नाहींत. प्रत्येक व्यक्तीला अशा प्रकारची समता प्राप्त करून देणें आणि समाजांतील वर्गवारी व वर्णवारी व्यवस्था मोडून त्यांच्यांतील असंतोष, विरोध व कलह बंद करणें हा समतावाद्यांचा उद्देश आहे. बुद्धिवान, धाडसी व स्वार्थी माणसांनी आपल्या प्रयत्नाने अथवा बलात्काराने

अथवा लुच्चेगिरीने उत्पन्न व स्थापन केलेले आपले अधिकार व मानपान हे प्रामाणिक व न्याय्य नसून ते चोर दरोडेखोर यांच्या मिळकती व मालकीसारखे आहेत. तेव्हा ते नष्ट करून सर्व मिळकत व मालकी समाजाची धरून त्यांनी आज समाजांतील उच्चनीचपणा दुःख दारिद्र्य, दीनदुबळेपणा व असंतोष काढून टाकण्याचा चंग बांधला आहे. त्यांच्या पक्षावर एक मोठा आक्षेप असा आहे की व्यक्ति ही बहुशः स्वार्थप्रेरणेनेच श्रम साहस करिते. नाही तर ती आळशी व चुकार बनेल आणि स्वतःच्या मालकीचें तिचें कांहीच होत नसलें तर ती कामाची टाळाटाळ करील, त्यामुळें समाजाचें आर्थिक उत्पन्न व मिळकत कमी होईल, धाडसी, उद्योगी आणि कल्पक लोक पुढे येणार नाहीत, आणि समाजाची वाढ व उन्नति होणार नाही. उत्साही व मंद वृत्तीचे लोक एकाच मापाने मोजल्यामुळें समतावाद समाजाला अधोगतीला नेईल. हा आक्षेप व हा समतावाद अजून अनुभवाच्या व प्रयोगाच्या पूर्ण कसोटीला लागावयाचा आहे. मनुष्याची वृत्ति निव्वळ स्वार्थपर आहे आणि त्याच्या उत्साहवर्धनाला व श्रमसाहसाला स्वार्थाचीच प्रेरणा पाहिजे, परोपकार व स्वाभाविक श्रमसाहसप्रियता त्याच्यामध्यें नाही, ह्या गोष्टी अजून ठरावयाच्या आहेत. तरी पण समतावाद्यांनी समाजाच्या कामकरी वर्गाचीं दुःखें वेशीवर टांगून समाजसुधारणेचे व आर्थिक समाधानाचे कांही उत्तम मार्ग दाखविले आहेत.

सध्या आणखी एक दुसरा वाद चालू आहे. तो साध्या राहणीचा व श्रीमंत राहणीचा. कांहींच्या मतें आपली राहणी मुख्यतः अन्नवस्त्र, घरदार, व औषधपाणी ह्या साध्या व नेहमीच्या सामान्य गरजा भागविणारी असावी आणि इतर श्रीमंती थाटाच्या, ऐषआरामाच्या व विशेष सुखसोयींच्या आर्थिक इच्छा वाढविणारी नसावी. तिच्या योगें मनाला विश्रांति आणि ज्ञान व विद्या यांच्या वाढीला वेळ मिळेल आणि मनुष्य त्यागवृत्तीचा, उच्च नीतीचा व परोपकारी बनेल. इतरांच्या मतें मनुष्याचे भोग सुखसोयी व आर्थिक उत्पन्न हीं वाढविलीं पाहिजेत. त्यांयोगें त्याचें मन सुसंस्कृत व प्रगल्भ होईल. तो परोपकार करूं शकेल. पोटोबाचें समाधान झालें म्हणजे विठोबाकडे त्याचें लक्ष लागेल. साधारणपणें पाहिलें तर

विशेष ऐषआरामाचीं व श्रीमंती वृत्तीचीं माणसें आपल्या आर्थिक व्यवहारांत व आकांक्षेंतच गुरफटतात व त्यांच्यामध्यें भोगवृत्तीचाच पोष होऊन त्यागवृत्ति उत्पन्न होत नाही. निर्धनतेचीं व सधनतेचीं, त्यागाचीं व भोगाचीं अंतिम टोकें सोडून मनुष्याने व समाजाने मध्यमवृत्तीचाच आश्रय केला पाहिजे. त्यायोगें समाजांतील भिन्न भिन्न प्रकृतीच्या लोकांत समाधान व संतोष नांदेल, असा अनुभव आहे. त्यागवृत्तीमुळें श्रमसाहस कमी होतात, भोगवृत्तीमुळें मानसिक व आध्यात्मिक उन्नति होत नाही. म्हणून भोग व त्याग यांचा योग्य मेळ बसला पाहिजे म्हणजे प्रपंच व परमार्थ साधावयास मनुष्य अधिकारी होईल. आपल्या कनिष्ठ परिस्थितींतून वर जाण्यास श्रमसाहसाची वृत्ति व भोगेच्छा पाहिजे आणि त्याबरोबरच मानसिक, सामाजिक व आध्यात्मिक उन्नतीकरतां त्यागवृत्तिही पाहिजे. आहे तें नुसतें रक्षण करण्याने प्रगति होत नाही. त्याची वाढ व वांटणी ही नेहमी केली पाहिजे.

आर्थिक उन्नतीला सहकारी चळवळीचा उपयोग होतो. जुळून व संघशः काम करण्याने तें काम कमी खर्चानें व श्रमाने होतें. मालाचें उत्पादन व क्रयविक्रय एकत्र होऊन करणें आणि नंतर लाभाची योग्य वांटणी करणें, भांडवल व पत एकत्र करणें व त्यापासून फायदा घेणें इत्यादि गोष्टी सहकारी चळवळ करते. त्यांतील मूळभाव एकमेकांस साहाय्य करणें व एकमेकांशीं सहकार करणें हा आहे. त्यायोगें कार्य सुकर होऊन लाभ वाढतो, कारण मध्यस्थ, व्यापारी व सावकार यांची तेथे आवश्यकता नसते. त्यामुळें लोकांमध्यें काटकसर, स्वावलंबी वृत्ति व सहकारिता उत्पन्न होते.

सध्या नैसर्गिक व यांत्रिक शक्तींच्या साहाय्याने आर्थिक मालाची वाढ अतोनात झाली आहे. जेथे पुष्कळ लोक एखाद्या जड कामाला लागत तेथे थोडे लोक तें काम यंत्राच्या साहाय्याने आज करीत आहेत व जें काम पूर्वी थोड्या प्रमाणावर होत असे तें काम आज अनेक पटीनें यंत्राच्या योगाने करतां येतें. शिवाय, यांत्रिक काम स्वस्त, सुबक, सारखें व टिकाऊ होत आहे. त्यामुळें गिरणींत अथवा यंत्रालयांत होणाऱ्या कामाला अधिक मागणी व विक्री आहे. घरांत अथवा कार्यालयांत हस्त-

कौशल्यानें केलेल्या कामाला कमी मागणी आहे. कारण तो माल मुख्यत: महाग पडतो व त्यामध्यें यांत्रिक मालाची कांही दृष्टचा झकाकी व सुबकता नसते. सामान्य लोकांना तो परवडत व आवडत नाही. कांही कला व माल यंत्राच्या साहाय्याने शक्य नसल्यामुळें त्याला नुसती श्रीमंतांकडून व गरजूंकडून मागणी आहे. पण आज गिरणीमध्यें न जातांना घरांत स्वतंत्र रीतीने मनुष्याने धंदा करणें समाजनीतिदृष्टचा व्यक्तीच्या शारीरिक व मानसिक हिताच्यां दृष्टीने अधिक श्रेयस्कर आहे, असें कांही लोक मानूं लागले आहेत. त्यांना यांत्रिक प्रगतीने समाजनीतीवर व मनुष्याच्या उच्च रहाणीवर अनिष्ट परिणाम झालेला दिसतो.

यंत्राच्या मुळें मालाची वाढ जरी झाली व मनुष्यांच्या सुखसोयी जरी वाढल्या आणि त्याला श्रम जरी करावे लागले तरी त्याचा परिणाम संपत्ति व आर्थिक सत्ता ज्या पूर्वी सर्व लोकांत वाटल्या गेल्या होत्या त्या आज थोडचा लोकांच्या हातांत गेल्या आहेत व त्यांच्या सुखसोयी, ऐषआराम, खेळ, विश्रांति व स्वातंत्र्य हीं वाढलीं आहेत. पण कामकरी वर्ग हा हीन, दीन व दु:खी स्थितींतच राहिला आहे. त्याला जें घरीं काम करण्यामध्यें व हाताने काम करण्यामध्यें सुख व स्वातंत्र्य, वेळ व विश्रांति मिळत असे तें नाहीसें झालें आहे. त्याला स्वत:चें घर व जागा सोडून दुसऱ्याच्या दारीं गिरणीमध्यें आणि आपलें स्वतंत्र काम सोडून दुसऱ्याच्या तंत्राखालीं यंत्राच्या नियंत्रणाखाली काम करावें लागतें. त्यामुळें त्याची कल्पक बुद्धि, हस्तकलाकौशल्य व शोधकवृत्ति जाऊन, त्या ठिकाणीं एकाच प्रकारचें, बुद्धिरहित व कंटाळवाणें काम करावें लागतें. त्यामुळें तो स्वत: एक प्रकारचें यंत्रच बनतो अथवा यंत्राप्रमाणें त्याला वागावें लागतें. शिवाय, त्याच्या शरीरावर व मनावर दुष्परिणाम होनात ते वेगळेच. त्याला दाट लोकवस्तीच्या शहरांत, वाईट कोंदट खोल्यांत, गलिच्छ हवेंत व जागेंत मुलांबाळांसह राहावें लागतें. त्याला तेथे कौटुंबिक सुख व स्वातंत्र्य योग्य प्रकारचें मिळत नाही. त्याच्यावरचें धर्माचें व नीतीचें बंधन ढिलें पडतें. त्याच्या मनाला उच्च विचार व शिक्षण मिळत नाहीत. त्याची परिस्थिति प्रतिकूल व संगति वाईट असल्यामुळें त्याला अनिष्ट सवयी व व्याधि, व्यथा व व्यसनें जडतात आणि सांसर्गिक रोगही लागतात. अशामुळें त्याचें व समाजाचें व पुढल्या पिढीचें जीवन खराब होतें.

इतके जरी दुष्परिणाम होत आहेत तरी यांत्रिक प्रगति व मोठ्या प्रमाणावर उभारलेले धंदे सोडतां येत नाहीत. म्हणून कामकरी वर्गाची आर्थिक व नैतिक स्थिति सुधारणें हा प्रत्येक राष्ट्राचा व राष्ट्रसंघाचा आणि देशांतील कामकरी पुढाऱ्यांचा व कामकरी संघांचा निश्चय झाला आहे. आणि त्याला अनुसरून त्यांनी नियम व कार्यक्रम आखले आहेत. राजसत्तेने त्यांच्या कामाचे तास, त्यांचें किमान वेतन, काम करीत असतां त्यांना अवश्य असलेल्या सुखसोयी, त्यांच्या आजारीपणांत मदत व शुश्रूषा; त्यांना अपघात झाल्यास साहाय्य, इत्यादि गोष्टी कायद्याने ठरविल्या आहेत. त्याचप्रमाणें कामकरी संघांना मान्यता देऊन त्यांना आपल्या मागण्या मिळविण्याकरतां चळवळ व तडजोड करण्याचे व परिषदा भरविण्याचे आणि वेळेनुसार संप व हरताळ पाडण्याचे अधिकार दिले आहेत. त्यास अनुसरून कामकऱ्यांचे व्यवसायात्मक, प्रादेशिक, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय संघ उत्पन्न झालेले आहेत. त्यांच्या सभा व परिषदा वारंवार भरून ते आपलीं ध्येयेंव मागण्या यांच्याबद्दल चर्चा व ठराव करतात. ह्या ठरावांत कामाचे तास, वेतन, पेन्शन, व शिक्षण; बेकारी, आजारीपण व म्हातारपण ह्याबद्दल विमा, अपघात व दुखापत याबद्दल नुकसान भरपाई, मुलें व स्त्रिया यांच्याबद्दलचे विशेष नियम व सोयी; संप, बहिष्कार व तंटे यासंबंधीं पंचायती; राजसत्तेंत अधिकार, राहण्याकरतां सोयीचीं व आरोग्याचीं ठिकाणें, करमणुकीचीं साधनें, विश्रांतीचीं व व्यायामाचीं स्थळें व उद्यानें, व्यसनांना व गैर वागणुकीला प्रतिबंध;—ह्यासंबंधीं ते मागण्या करतात.

राष्ट्रसंघाने सर्व राष्ट्रांतील कामकरी वर्गाचें सामान्य सुख व सोयी कशा वाढतील आणि त्यांचीं दुःखें व असंतोष कसा कमी होईल याबद्दलच्या प्रश्नांचा विचार करणारें, सर्व राष्ट्रांतील सरकारें, कामकरीवर्ग व मालकवर्ग ह्यांचें प्रतिनिधिमंडळ उत्पन्न केलें आहे. त्याचें नांव International Labour Organisation (आंतरराष्ट्रीय कामकरी संस्था) हें आहे. त्याच्या योगें आज कामकरीवर्गाच्या उन्नतीला बरीच मदत झाली आहे.

ज्या देशामध्यें लोकसंख्या, दारिद्र्य व बेकारी वाढली आहे व त्यामुळें लोकांचें आर्थिक जीवन कठीण झालें आहे, त्या देशाचे लोक देशांतर करून जेथे वसाहतीला जागा व धंद्याला सुलभता असेल तेथे जातात. पण

असा देशांतराला व वसाहतीला आज विशेष मोकळीक नाही. युरोपीय लोकांनी जगांतील सर्व नव्या वसाहतीचे देश व बेटें आक्रमिल्यामुळें स्वतंत्र वसाहतीला आज जागा नाही, आणि त्यांच्या सत्तेखालील वसाहतीच्या प्रदेशांत पौर्वात्यांना आता घेत नाहीत व आहेत त्यांना वाईट वागविण्यांत येतें. आणि आंत येण्याची परवानगी दिलीच तर कनिष्ठ प्रतीच्या मजुरासारखें किंवा गुलामासारखें त्यांना वाईट व वेगळ्या जागेंत राहावें लागतें. त्यांना नागरिकत्वाचे सामान्य व विशेष अधिकार मिळत नाहीत. देशांतर केल्याने स्वदेशांतील अधिकारांना मुकावें लागतें. पाश्चात्य लोकांना मात्र वसाहतींत व इतर देशांत नागरिकत्वाचे पूर्ण अधिकार सुलभतेने प्राप्त होतात.

देशांतील व देशाबाहेरील व्यापार हा लोकांचें मोठें अर्थप्राप्तीचें साधन आहे. कच्च्या व पक्क्या वस्तूंचा विनिमय, देवघेव व क्रयविक्रय हें व्यापाराचें मुख्य कार्य आहे. सगळ्याच लोकांनी सगळ्या वस्तू तयार करणें व सगळ्याच देशांनी सगळ्या गोष्टी पैदा करणें हें शक्य नाही. निसर्गतः निरनिराळा माल निरनिराळे प्रदेश सहज रीतीने उत्पन्न करतात व निरनिराळे लोक आपापल्या कलाकौशल्याने व यांत्रिक व शास्त्रीय साहाय्याने निरनिराळा माल तयार करतात. आणि एकमेकांला त्या कच्च्या व पक्क्या मालाची आवश्यकता असल्यामुळें देशांतर्गत व देशाबाहेरील व्यापार अनेक लोकांमध्यें सुरू होतो. मुख्यतः स्वस्त मालाला व भिन्न प्रकारच्या मालाला दुसऱ्या लोकांकडून मागणी येते व तेथे तो खपतो. मात्र त्याची ने आण करण्याला दळणवळणाचीं व वाहतुकीचीं साधनें सुलभ, स्वस्त व सुरक्षित पाहिजेत. जलमार्ग, भूमिमार्ग आणि वायुमार्ग चांगले वाढत आहेत व सुकर होत चालले आहेत. त्याबरोबर व्यापारी वर्ग धाडसी व चौकसखोर पाहिजेत. त्यांना सर्व देशांची, मोलांची, तोलांची, मापांची, नाण्यांची, लाभतोटयाची, क्रयविक्रयाची, मालाची ने आण करण्याची यथाशास्त्र माहिती असली पाहिजे. राजसत्तेचें त्याला पाठबळ, संरक्षण व सवलती पाहिजेत. त्याला पेढ्या, पत व भांडवल यांची मदत पाहिजे. म्हणजे देशाचा व्यापार व संपत्ति वाढते आणि आर्थिक सुस्थिति राहते.

तेव्हा आर्थिक स्थितीचें सांगोपांग रक्षण व वाढ करण्याला इतर सर्व साधनांबरोबर राजसत्तेने नेमलेले अधिकारी व अध्यक्ष पाहिजेत. तिने

चालविलेलें शेतकीखातें, दुष्काळखातें, उद्योगधंदाखातें व व्यापारखातें हीं पाहिजेत. त्यांचें काम म्हणजे देशांतील आर्थिक स्थितीचें सदैव निरीक्षण करणें आर्थिक प्रश्नांचें सदैव परीक्षण करणें व त्या संबंधींची यथाशास्त्र माहिती गोळा करणें व सुधारणा अमलांत आणणें हें होय. ज्यांच्या योगें आपला देश व आपले लोक यांची आर्थिक सुस्थिति राहील व भरभराट होईल त्या गोष्टी करणें हा राजसत्तेचा आर्थिक उद्देश व धोरण असलें पाहिजे.

सामाजिक स्वास्थ्याला चांगली प्रकृति, उत्साही मन, कार्यक्षम शरीर व योग्य मिळकत हीं पाहिजेत. उदरनिर्वाहाचीं भरभूर साधनें नसलीं तर आणि शरीर कार्यक्षम व मन उत्साही नसलें तर समाज बिघडेल; कारण त्यांतील माणसें दुःखित व पीडित राहतील. रोग, मृत्यु, गुन्हे, दीनता व दारिद्र्य यांची वाढ होईल. मुलांना शिक्षण मिळणार नाही, म्हणून त्यांची वाढ होणार नाही. खाण्यापिण्याची आजची ददात व उद्याची वानवा नसली पाहिजे आणि त्या उदरनिर्वाहसाधनांचें प्रमाण योग्य व शक्य तर भरपूर पाहिजे.



## प्रकरण आठवें

# धार्मिक जीवन

धार्मिक व्यवस्था व संस्था ह्या समाजनियंत्रणाचीं व पोषणाचीं साधनें आहेत. धर्म हा प्रजेची धारणा करतो म्हणजे संरक्षण व वाढ करतो व तिची सुस्थिति ठेवतो. धार्मिक श्रद्धा, समजुती व नियंत्रण हीं मनुष्य जातीमध्यें सार्वत्रिक व सर्व अवस्थांत सापडतात. कांही जणांनी नास्तिक व निरंकुश भावाचा अवलंब केला असला तरी मनुष्यस्वभावाच्या विशेष लक्षणांपैकी धर्म हें एक लक्षण आहे. मनुष्याची विवेकबुद्धि ही सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, गति व लय; त्यांचे नियम व अंतर्भूत निसर्गशक्ति, यांचा

अवश्यमेव विचार करते. त्यांच्या अनुरोधाने मनुष्य आपल्या सुखदु:खाची कारणमीमांसा करूं लागतो आणि नैसर्गिक शक्तीच्या प्रत्येक व्यक्त झालेल्या शांत व रौद्र स्वरूपामध्यें त्याला एक सृष्टिकर्ता अथवा दैवी शक्ती दिसूं लागते. त्यावरून त्याला त्या दैवी शक्तीच्या नियमाप्रमाणें राहावेंसें वाटतें अथवा अनुग्रह व प्रसाद प्राप्त करून घेण्यासाठी तिचें पूजन व भक्ति करावीशी वाटते. हें तो अर्थकामप्रधान असला तर त्या अदृश्य शक्तीच्या भीतीमुळें करतो आणि धर्ममोक्षप्रधान असला तर तिच्या-बद्दल वाटणाऱ्या आदरामुळें अथवा भक्तिभावामुळें करतो. त्यांत त्याला आनंद व सुख वाटतें. एकामध्यें स्वार्थरक्षणाची हांव असते, दुसऱ्यामध्यें आत्मविकासाची तहान आणि परमेश्वराची दया व अनुग्रह प्राप्त करून घेण्याची आकांक्षा असते.

धर्मबुद्धि, धर्मजिज्ञासा व धार्मिक समजुती यांच्या योगाने मनुष्याच्या तत्त्वज्ञानांत व नैतिक आचरणांत बरीच वाढ झाली आहे. त्यामुळें मनुष्याचें जीवन (१) उत्तम म्हणजे सदाचारी, प्रेमळ, सहनशील व न्यायबुद्धीचें; (२) सुंदर म्हणजे उच्च प्रतीचें, आदर्शवत् आणि वेडगळ व विक्षिप्त भावनांतून सुटलेलें; आणि (३) सत्यस्वरूप म्हणजे दैवी नियमाला व हेतूला अनुसरणारें व पूर्ण झालें आहे. धर्म हा मनुष्यामध्यें सर्वभूतात्मभाव व उच्चध्येयांचा आदर उत्पन्न करतो.

धर्मसंस्था ह्या अनुभवाने ठरलेल्या कांही उत्तम सामाजिक आचारविचारांचें संरक्षण करतात आणि व्यक्तीला व समाजाला कांही उच्च ध्येयें व मर्यादा घालून देतात. धर्मप्रवर्तकांनी हीं अशीं उत्तम ध्येयें व मर्यादा, आचार व विचार शोधून काढले आहेत. त्यांनी केलेल्या पारलौकिक गोष्टींचा जरी विचार सोडून दिला तरी त्यांनी घालून दिलेल्या धर्माचरणांत विशेष प्रकारचें सामाजिक तत्त्वज्ञान, व्यवस्था व ध्येयें असतात. त्यायोगें मनुष्याला एक प्रकारचें वळण लागतें व दृष्टि मिळते आणि त्याला अंतिम ध्येयाच्या व सत्याच्या दृष्टीने कसें राहावें तें कळतें.

धर्मसंस्था ह्या शिक्षणात्मक व समाजसेवापर संस्था आहेत. त्या आपल्या दृष्टीने व्यक्तीचें मन व वर्तन वळवीत असतात व त्याला आपल्या अनुयायी समाजांत त्याची सेवा करून आणतात व राखतात. त्यांच्या

हातून पुष्कळ समाजसेवेचीं कृत्यें होतात. दीन दुःखितांना साहाय्य, पतित पीडितांचा उद्धार, रोगी अनाथांना औषधोपचार इत्यादि करून त्या त्यांचें दुःख व पीडा हरण करतात. दानाचीं व परोपकाराचीं कामें त्यांनी पुष्कळ केलीं आहेत. तरीपण कांही ठिकाणीं व कांही काळीं कांही धर्मसंस्थांनी व धर्मोपदेशकांनी बळजबरीचीं, फसवणुकीचीं, अत्याचाराचीं, छळाचींही कृत्यें केलीं आहेत. आता मात्र त्या गोष्टींना बराच आळा बसला आहे.

धर्मभावना व धर्मप्रीति ह्या अजून मनुष्याच्या स्वभावाचें मोठें अंग आहेत. तो धर्मावरील श्रद्धेने आणि त्याच्या प्रेरणेने व प्रोत्साहनाने बरींचशीं सत्कृत्यें व दुष्कृत्यें करूं शकतो. तीं त्या धर्मातील विशिष्ट कल्पनांवर अवलंबून असतात. चांगल्या धर्मांनी मनुष्याच्या प्रगतीला साहाय्य केलें आहे. त्याला रानटी व क्रूर अवस्थेंतून काढून सुसंस्कृत व शीलसंपन्न स्थितींत आणलें आहे आणि आपल्या धार्मिक व सामाजिक बाबतींत समतेचें स्थान दिलें आहे. शिवाय, त्याला नुसत्या अर्थकामप्राप्तीपेक्षा या जगांत पुष्कळ अधिक गोष्टी व हेतु आहेत असें दाखवून दिलें आहे. लोकांलोकांमध्यें व शेजाऱ्याशेजाऱ्यांमध्यें सेवावृत्ति, त्यागवृत्ति, मैत्री, करुणा, सहकार व प्रेमभाव हीं उत्पन्न केलीं आहेत. आज सहिष्णुतेच्या तत्त्वावर सर्व धर्म सलोख्याने सहवास करूं पाहत आहेत.

पुष्कळ लोकांनी ऐहिक जीवनाच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक अंगांची रचना धर्मसमजुतींच्या व धर्मसंस्थांच्या आधारें केलीं आहे. धर्मामुळेंच त्यांच्यामध्यें ऐहिक व पारलौकिक कल्याणाच्या कल्पना उद्भूत झाल्या आहेत. त्यांच्या अनुरोधाने समाजसंघटनेचे नियम, भिन्न संघांमधील व वर्णांमधील व्यवहाराचे नियम, व सदाचरणाचे नियम ठरविण्यांत आले आहेत. धार्मिक कल्पनांचा परिणाम मनुष्याच्या सर्व कृतींवर व जीवनाच्या सर्व अंगांवर झाला आहे आणि त्यामुळेंच त्यांचें सापेक्ष महत्त्व व स्थान ठरविण्यांत आलें आहे.

यावरून असें म्हणतां येईल की धर्माचा उद्भव मनुष्याच्या जीवनाचें ऐहिक व पारलौकिक आपत्तीपासून रक्षण करण्याकरतां व त्याचें जगांतील स्थान व महत्त्व ओळखण्याकरतां झाला आहे आणि त्याचा उद्देश मनुष्याचें जीवन दैवी संपत्तीचें व उत्तम प्रकारचें करण्याचा आहे.

त्याकरतां त्याने विधिनिषेध व नियम-दंड घालून दिले आहेत, ते आचरिले व पाळिले असतांच ऐहिक अभ्युदय व पारलौकिक कल्याण मनुष्याला प्राप्त होईल.

धर्म हा मनुष्याच्या हेतूंना वळण लावतो. त्यामध्यें अतींद्रिय व उच्च ज्ञानाच्या योगाने दैवी गुणांबद्दल श्रद्धा उत्पन्न करतो व त्या गुणांची जोपासना करतो. तो आसुरी वृत्तीवर नियंत्रण घालतो, तिच्याबद्दल भय उत्पन्न करतो. त्यायोगें समाजांत एक प्रकारचें सलोख्याचें व सुस्थितीचें वळण राहतें आणि मनुष्यांत समाधान व सदिच्छा कायम राहते. वाईट प्रसंगीं त्याला घाबरूं न देतां तो त्याच्यांत सहनशीलता व संयम राखतो. ऐहिक दुःखाच्या तापाने त्याला किंकर्तव्यमूढ होऊं देत नाही, आणि जगांत अंतिम सुख आहे ही भावना जागृत ठेवतो.

धर्म हा आपल्या अनुयायांमध्यें आनंद, आशा, श्रद्धा व आत्मविश्वास उत्पन्न करतो व त्यायोगें मनुष्याला पारमार्थिक मुक्तीची आशा वाटून सांसारिक यातना सहन करण्याची शक्ति येते. धर्म हा मानवी जीवनाच्या श्रेष्ठ स्वरूपाला चिकटून राहण्याचा आदेश व उपदेश करतो. प्रापंचिक व स्वार्थी जीवनाला तो अंतिम कल्याणाच्या व मानवी हिताच्या दृष्टीने वळण लावतो. ह्या उच्च दृष्टीच्या अनुरोधाने धर्मसंस्थांनी मनुष्याच्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाला उपयोगी सिद्धांत व संस्कार, आचार, विधि व दंड हीं घालून दिलीं आहेत. त्यांच्यायोगें मनुष्य हा उच्च जीवन व्यतीत करूं शकतो.

ऋषिमुनींच्या, साधुसंतांच्या व महात्माविभूतींच्या स्वानुभवावर व प्रेरणेवर, अंतःकरणस्फूर्तीवर व यौगिक प्राप्तीवर धर्माचीं वचनें अवलंबून असतात. त्यांना ध्यानाने, तपस्येने व योगधारणेने प्राप्त झालेल्या दिव्य दृष्टीमुळें त्यांचें ज्ञान व वचनें हीं प्रामाण्य स्वरूपाचीं व त्रिकालाबाधित मानलीं जातात. तें ज्ञान सृष्टीच्या मुळाशीं असलेल्या गूढ तत्त्वांसंबंधींचें आणि जीवनाच्या खऱ्या स्वरूपाचें व उद्देशाचें असतें, आणि तीं वचनें सृष्टीच्या नियमाला अनुसरून असतात. असे अनेक सत्पुरुष झाल्यामुळें त्यांनी दिलेलें ज्ञान व वचनें भिन्न स्वरूपांत आढळतात. त्यामुळें निरनिराळे पंथ व उपासनाप्रकार, स्मृत्या व संस्कार हीं उत्पन्न झालीं आहेत.

बहुतेक धर्मांमध्यें परमेश्वराच्या एकत्वाची कल्पना आहे. त्याला ते सर्व सृष्टीचा व जगताचा आधार व आदितत्व आणि उत्पत्ति, स्थिति, गति व लय यांचा कर्ता समजतात. त्याच्यायोगें सर्व मानवसृष्टि अस्तित्वांत येते, टिकते व सुख दुःख पावते. तोच मनुष्याच्या प्रार्थनेला, पूजेला व हाकेला ओ देतो आणिं त्याच्या नैतिक आचरणाला मान देतो. लोक त्याची पूजा अर्चा अनेक सगुण व निर्गुण स्वरूपांत करतात आणि ती भक्ति, कर्म, ज्ञान व योग ह्या निरनिराळ्या मार्गांनी करतात. तो सर्व वस्तूंच्या व प्राणिमात्राच्या ठायीं वसत आहे. त्याचें स्वरूप व आज्ञा अनेक देशांच्या व कालांच्या ऋषिमुनींनी आपापल्या प्रमाणग्रंथांत सांगितल्या आहेत. तरी तो एकच व अद्वितीय आहे असें आपण समजतों.

भिन्न धर्मप्रवर्तकांनी सांगितलेले मूळ नीतिनियम साधारणतः एकाच अर्थाचे आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह व ब्रह्मचर्य यांच्यावर प्रत्येक धर्माचा तात्त्विक जोर आहे आणि व्यवहारदृष्टया त्यांना कमी अधिक मान आहे. मनुष्यांनी जर स्वार्थी महत्वाकांक्षा, धर्मवेडेपणा व जातिवेडेपणा सोडला तर धर्माधर्मांमध्यें सलोखा राहील व ऐहिक दुःखाचें परिमार्जन करण्यामध्यें ते सहकार करतील आणि त्यांच्या अनुयायांमध्यें साहचर्य घडेल.

धर्मनिष्ठा ही राष्ट्राला बाधक होतां कामा नये. धर्मनिष्ठेंत जर वेडेपणा नसेल आणि भूतदया व कारुण्य असेल तर ती राष्ट्रबलवर्धक व राष्ट्रीयवृत्तिपोषकच होईल. राष्ट्र जरी कुटुंब व जाति या दृष्टीने एक संग्राहक व मोठा समूह आहे तरी मानवजातीच्या दृष्टीने तो लहान व मर्यादित समूह आहे. मनुष्याचें व्यापक जीवन हें राष्ट्राच्या मर्यादांनी व्यापून टाकलें व संभाळलें जाऊं शकत नाही. त्याचा संबंध अखिल मानव जातीशीं अनेक प्रकारें येतो. तेव्हा स्वाभाविकपणें धर्माचा राष्ट्रीय जीवनाशीं संबंध येतो, कारण धर्म हा जगतासंबंधींचे सिद्धांत व विश्वव्यापी आदर्श प्रतिपादीत असतो. राष्ट्रीय भावनेपेक्षा इतर व उच्चतर भावना मनुष्यामध्यें आहेत तेव्हा त्याच्या उत्तम जीवनाच्या दृष्टीने श्रेष्ठ ऐहिक जीवन काय व श्रेष्ठ पारलौकिक जीवन काय हें समजलें पाहिजे आणि अनुकरणाने त्याने आपलें आचरण सुधारलें पाहिजे. धर्माने मनुष्यप्राण्याचें ऐक्य

व त्यांना आवश्यक असलेली शांतता, सहनशीलता व सेवा यांची समाजाला जाणीव करून दिली आहे. त्याच्यामुळें वैयक्तिक सदाचरण व सामाजिक सुस्थिति वाढली आहे. ह्या जगतांतील व्यक्तीला आपलें स्थान आणि जातीला व राष्ट्राला आपलें मर्यादित महत्त्व त्यामुळें समजलें आहे. अशा प्रकारें धर्मानें सत्याची भावना व सत्कर्मदृष्टि उत्पन्न केली आहे आणि त्यांच्या प्राप्तीकरतां असे आचारनियम घातले आहेत की ज्यांच्यायोगें आपलें दैनिक जीवन नियमित, संस्कृत व संजीवित होत आहे. त्याच्यामुळें शुद्ध अंतःकरणाने व चित्ताने समजल्या जाणाऱ्या उच्च तत्त्वांसंबंधीं श्रद्धा व नैतिक उल्हास उत्पन्न होतो व टिकतो.

धर्माचा हा आध्यात्मिक दृष्टिकोण आपल्या जीवनाला आवश्यक आहे. त्यामुळें समाजाची दृष्टि व वृत्ति व्यापक होते आणि त्याच्या ऐहिक व पारलौकिक जीवनाचा अन्योन्याश्रय समजतो. त्याच्या आध्यात्मिक प्रभावामुळें जगांतील नानाप्रकारच्या घटनांमध्यें एकत्व येतें आणि शांतता, सहिष्णुता, संयम इत्यादि गुणांना महत्त्व व मान मिळतो. त्याच्यामुळें मनुष्याचें आध्यात्मिक स्वातंत्र्य व योग्यता ओळखली जाते. मनुष्य हा दैवी संपत्तीचा धरला जातो व खरा नागरिक हा ईश्वराचा सेवक मानला जातो. त्याचें कर्तव्य हें आपली शक्ति सर्व लोकांचें हित व प्रगति पाहण्यांत आणि सलोखा व सेवा करण्यांत असावें असें ठरतें. तो राजकीय दृष्टीचा नुसता कर देणारा व मत असणारा मनुष्य नाही तर तो आपल्या धार्मिक वृत्तीमुळें समाजाचें व मानवजातीचें जीवन उदात्त करण्याविषयीं कार्य व कर्तव्यें करणारा मनुष्य आहे. रंजल्या गांजल्यांची व दीनदुःखितांची सेवा आणि रुग्णालयें, कारागृहें व समरांगणें यामध्यें पडलेले रोगी, बंदिवान व पीडित, यांचा उद्धार करणाऱ्या समाजसेवकांची वृत्ति व प्रेरणा हीं मनुष्याच्या धर्मनिष्ठेचें व धर्मप्रवृत्तीचें मूळ होत. त्याचप्रमाणें त्याच्या उदारवृत्तीचें तेंच मूळ आहे. त्याच्या योगें उत्तम जीवन व पूर्ण जीवन प्राप्त होण्यास साहाय्य होतें. खऱ्या नागरिकाचें तेंच ध्येय आहे व त्याचबद्दल त्यांना प्रयत्न करावयास पाहिजे.

धर्ममतें व धर्माचार भिन्न प्रकारचे सापडतात. निरनिराळ्या धर्मपंथांमध्यें आपलाच धर्म खरा व ईश्वरप्रणीत आणि इतरांचा खोटा

अशा समजुतीने भांडणें व छळणूक झाली आहे. ह्या प्रवृत्तीमुळें जगामध्यें शांतता व मैत्रीभाव न राहतां ठिकठिकाणीं व वेळोवेळीं रक्तपात व बलात्काराच्या बाटवणुकी झाल्या आहेत. आपल्या ऋषिमुनींनी व धर्मप्रवर्तकांनी सांगितलेलें धर्मरहस्य विसरून, धर्मानुयायांनी त्याच्या नैमित्तिक विधिउपाधींकडे अधिक लक्ष दिलें व इतरांशीं असहिष्णुता व विरोध दाखविला. पण धर्माची मुख्य प्रवृत्ति सहिष्णुतेची, बंधुतेची व सेवाभावाची असावयास पाहिजे. नुसतीं व्रतें व उद्यापनें, क्रिया व कर्मे यांचें पालन केल्याने ती पुरी होत नाही. दुसऱ्याच्या धर्ममतांकडे निर्वैर बुद्धीने पाहणें हा नुसता उपयुक्ततावाद किंवा शेजारपणाची आवश्यक गोष्ट नसून, त्यामध्यें खरें धर्मरहस्य व धर्मवृत्ति आहे. आपल्या देशांत धार्मिक स्वातंत्र्याच्या तत्त्वाची जाणीव व आचरण फार प्राचीन कालापासून दिसत आहे. अशोक राजाने तें धर्मस्वातंत्र्य आपल्या शिलालेखांत आपल्या प्रजेला दिलें आहे. तें आपल्या लोकांच्या परंपरेमध्यें व समजुतीमध्यें पूर्णपणें बाणलें आहे. त्यामुळें पूर्वी आपल्या देशांत धर्मयुद्धें झालीं नाहीत. लोकांना आपापल्या धर्मसमजुतींप्रमाणें व श्रद्धेप्रमाणें चालण्याला प्रत्यवाय नव्हता. पण यहुदी, ख्रिस्ती व मुसलमान पंथांच्या लोकांना हें धर्मस्वातंत्र्याचें व धर्मसहिष्णुतेचें तत्त्व मुळीच मान्य झालें नाही. परदेशांत गेल्यामुळें, परराज्यसत्तेमुळें अथवा कांही राजांनी राजकारणाकरतां धर्मांधता सोडल्यामुळें, इतर धर्मीयांबरोबर त्यांनी मित्रत्वाचें व नागरिकत्वाचें वर्तन कांही प्रसंगीं व कांही ठिकाणीं व्यावहारिक उपयुक्ततेच्या व आवश्यकतेच्या दृष्टीने पत्करलें आहे. पण त्यांच्या मूळ नियमाप्रमाणें तसें वर्तन अधर्म्य व अयोग्य आहे. जोंपर्यंत अशा धर्मांच्या देशांत एकच धर्म व एकच पंथ नांदतो आणि पाषंडें व नवे पंथ उत्पन्न होत नाहीत, तोंपर्यंत तेथे शांतता व सहिष्णुता टिकते. पण देशांत नवीं मतें व पाषंडें उत्पन्न झालीं किंवा आलीं की धर्माची एकता जाऊन धार्मिक तंटे व भांडणें उत्पन्न होतात.

सांप्रत कोणत्याही देशांत एकाच धर्माचे व एकाच मताचे लोक नसतात. तेव्हा राजकीय, आर्थिक व सामाजिक अभ्युदयाच्या दृष्टीने व देशांतील शांततेच्या दृष्टीने धार्मिक सहिष्णुतेचें तत्त्व आपणास ग्रहण केलें पाहिजे, मग पूर्वीचे आपले धार्मिक दुराग्रह व समजुती कांहीही

असोत. खऱ्या धार्मिकतेच्या व राष्ट्रीय आवश्यकतेच्या दृष्टीने हें सहिष्णुतेचें तत्व मान्य करून आचरणांत आणलें पाहिजे. जे नागरिक या तत्वाच्या विरुद्ध वागतात ते खरे नागरिक, राष्ट्रभक्त व मानवप्रेमी नाहीत. ते राष्ट्राचे, खऱ्या धर्माचे, नीतीचे व मानवाचे शत्रू आहेत. त्यांच्या कठोर व कनिष्ठ दुर्नीतीमुळें लोकांचें कल्याण व प्रगति कुंठित होते. कोणतेंही खरें राष्ट्र धार्मिक असहिष्णुता सहन करणार नाही. धार्मिक स्वातंत्र्य हें सांप्रतच्या जीवन-व्यवहाराचें आवश्यक लक्षण आहे. असहिष्णुता व धर्मान्धता ह्या कठोरपणाने दडपून टाकल्या पाहिजेत. उच्च प्रकारच्या आचारस्वातंत्र्यांत व विचारस्वातंत्र्यांत त्यांना स्थान नाही.

लालुचीने, बलात्काराने व फसवणुकीने धर्मान्तर करविणें हें नीतिदृष्टीने निंद्य आहे. धर्मान्तर स्वखुषीने व स्वतंत्र विचाराने करणें हें दोषार्ह नाही. पुष्कळशीं धर्मान्तरें राजकीय बलात्काराने, प्रलोभनाने व भीतीने झालेलीं आहेत, कांही धर्मगुरूंच्या उपदेशांनी व कांही उपदेशकांच्या फसवणुकींनी झालेलीं आहेत, आणि फारच थोडीं स्वतंत्र बुद्धीने व स्वखुषीने झालेलीं आहेत.

आधुनिक राष्ट्रांत जसें धर्माचें स्वातंत्र्य दिलें आहे तसें धर्माच्या उपदेशाचें दिलें तर बाधा नाही, पण धर्मप्रसाराचें स्वातंत्र्य मात्र देऊं नये. म्हणजे जगांतील बरीच धर्मान्धता, धर्मद्वेष व धर्मयुद्धें कमी होतील आणि लोकांनी आपला धर्म स्वखुषीने सोडला तर मोठी आपत्ति ओढवणार नाही.

खरें पाहिलें असतां कोणताच धर्म आज व्यावहारिक दृष्ट्या पुरा पडत नाही. कांही पारलौकिक कल्पना सोडून दिल्या तर सगळेच धर्म आज घसरत चालले आहेत. नीतिदृष्ट्या, व्यवहारदृष्ट्या व शास्त्रदृष्ट्या त्यांच्यामधील कल्पना, वचनें व नियम बरेच खुळचट, खोटे व असत्यपूर्ण आहेत. तेव्हा अशा धर्मबंधनांना पाठिंबा देणें, तीं दुसऱ्यावर गोड वचनांनी, कठोर वृत्तीने अथवा कृष्णकारस्थानांनी लादणें, त्याच्याकरतां रक्तपात व मारामाऱ्या करणें हीं किती अन्यायाचीं लक्षणें आहेत, हें सहज समजून येईल. ह्या काळांत 'धर्म' ह्या कल्पनेचेंच स्थित्यंतर व

परिवर्तन झालें पाहिजे. धर्मान्तरांत मोठेपणा नसून मनाची अधम प्रवृत्ति व्यक्त होते.

धर्मनिष्ठा ही वैयक्तिक असावी. तिला सामूहिक, राजकीय व लढाऊ बाण्याचें पंथात्मक स्वरूप देणें हें धोक्याचें आहे. कोणतेही गुण अथवा निष्ठा व्यक्तिगत झाल्यावांचून त्यांचा उपयोग मनुष्याला व समाजाला होऊं शकत नाही. औपचारिक रीतीने वागणाऱ्या आपल्या धर्मपंथांतील मनुष्यांचा पक्ष घेणें आणि नीतीने व न्यायाने वागणाऱ्या परधर्मीतील मनुष्याशीं हाडवैर करणें, हें उच्च धर्म व नीति आणि राष्ट्रीय वृत्ति यांच्या दृष्टीने फार गर्ह्य आहे. उच्च आचार, विचार व भावना ह्यांतच खरें धर्मरहस्य साठविलें आहे.

प्रत्येक धर्म हा जो मानील त्याला मोकळा पाहिजे. त्याच्या व्यवस्थेमध्यें उच्चनीचपणा व श्रेष्ठ-कनिष्ठ-अधिकार नसला पाहिजे. त्यामध्यें बंधुभाव, समता व स्वातंत्र्य हीं असलीं पाहिजेत आणि त्यांतील अंधता, अशास्त्रीय समजुती, दुराग्रह, अनुभवविरोधी वचनें हीं काढून टाकलीं पाहिजेत. त्याच्यामध्यें ज्ञानमार्गाला व ज्ञानानुसार कर्मस्वातंत्र्याला जागा पाहिजे. उच्च नीति व धर्मवचनें ह्यांमध्यें विरोध आला तर मनुष्याने नीतिगामीच राहिलें पाहिजे. सर्व धर्मांचीं सन्मान्य व उच्च तत्त्वें शिक्षणरूपाने समाजांत प्रसृत केलीं पाहिजेत. तसें केल्याने धर्मान्धता व धर्मद्वेष कमी होतील आणि मनुष्याच्या प्रगतीला वाव मिळेल. प्रत्येक धर्मामध्यें सत्याचा कांही अंश आहे, सत्य समजण्याचे व गाठण्याचे अनेक प्रकार आहेत, या गोष्टीची जाणीव झाली तर मनुष्यामध्यें सहिष्णुता सहजच उत्पन्न होते. त्यांना सत्याचा मक्ता आपणालाच मिळाला आहे असें वाटत नाही. धर्मामध्यें आज परमार्थाविषयींच्या ज्ञानापेक्षा अज्ञानच अधिक आहे आणि आजचीं भांडणें ' अंधेन नीयमाना यथान्धाः ' या न्यायानुसार चाललीं आहेत.

सर्व धर्मांचा उद्भव सारख्याच कारणांकरतां झाला आहे आणि त्यांचा उद्देश सारख्याच अंतिम कल्याणाचा आहे. मात्र रुचि व प्रकृति यांच्या वैचित्र्यामुळें, आणि परंपरा व परिस्थिति यांच्या भिन्नत्वामुळें त्यांचे मार्ग, संस्कार व विधिनिषेध भिन्न आहेत. तेव्हा प्रत्येक देशाचे स्वतःचे

जे धर्मप्रवर्तक, महर्षि व महामुनि असतात त्यांच्याच मंत्रतंत्राने जाणें सोयीचें व सौख्याचें होतें; कारण त्या त्या देशांतील लोकांच्या संस्कृतीला अनुकूल अशी त्यांची धर्मरचना व नियम असतात. त्यांनी आपली दृष्टि मात्र त्यांच्या वचनांत गुरफटून न घेतां धर्माचा उपयोग राष्ट्राच्या व नागरिकांच्या हितासाठी करून घेतला पाहिजे.

---

## प्रकरण नववें.

# सांस्कृतिक जीवन

मनुष्याला सुसंस्कृत करणें हें प्रत्येक समाजाचें कर्तव्य आहे. त्याचें मन व आचार हीं नीतिनियम, शिक्षणसंस्कार, ज्ञानप्राप्ति व विद्याकलाभिज्ञता यांच्यायोगें संस्कृत होतात, आणि त्यांचे विचार, भावना व वर्तणूक हीं उदात्त होतात. ही नीति, शिक्षण, ज्ञान व कुशलता त्याला कुलपरंपरा, कथाकीर्तन, शिक्षणसंस्था, धर्मसंस्था इत्यादिकांच्या द्वारें प्राप्त होते. सांस्कृतिक जीवनामध्यें बौद्धिक, नैतिक व भावनात्मक अंगांचा विशेष विचार येतो. त्या अंगांच्या पोषणावर व सामर्थ्यावर मनुष्याचें उदार व उच्च चरित्र व समाजाचा श्रेष्ठपणा अवलंबून आहे.

प्रत्येक सुव्यवस्थित समाजाचे कांही सामान्य नीतिनियम व कांही विशेष नीतिनियम असतात. ते त्याच्या संस्कृतीचे निदर्शक असतात. त्यांच्यायोगें त्याचें ऐक्य व विशिष्टत्व दिसतें आणि बल व शील समजतें. त्या समाजाच्या वर्तनाच्या व व्यवहाराच्या मुळाशीं त्यांचा प्रभाव असतो. यांपैकी सर्वसामान्य सामाजिक नीतिनियम म्हणजे मनूने व मोझेसने दर्शविलेला दशलाक्षणिक धर्म होय. तो बहुश: सर्व उच्च समाजांनी पत्करलेला आहे. पण त्यापैकी प्रत्येकाने कोणत्याना कोणत्या तरी गुणावर विशेष भर दिल्यामुळें त्यांच्यामध्यें विशिष्टत्व आलें आहे. विशेष नीतिनियम स्थल, काल व ध्येय यांना अनुसरून पत्करलेले असतात. आपल्याकडे वैदिक सनातन समाज, जैन व बौद्ध समाज, शीख समाज व सध्याचा आर्य-

समाज यांनी निरनिराळ्या संयमी गुणांवर विशेष भर दिल्याने त्यांची दृष्टि व वर्तन भिन्न प्रकारचें झालें आहे. त्याचप्रमाणें पाश्चात्य ख्रिस्ती समाज व मुसलमान समाज यांनी इतर साहसी गुणांचें समर्थन केल्याने त्यांची संस्कृति भिन्न झाली आहे. नैतिक नियमांचा मनुष्याच्या सांस्कृतिक जीवनाशीं निकट संबंध आहे. त्यायोगें मनुष्याची दृष्टि व वृत्ति, संयम व साहस, शील व संस्कार, यांना भिन्न प्रकारचें वळण मिळतें व तेंच त्याच्या संस्कृतीचें लक्षण होतें.

समाजाच्या नैतिक जीवनाचें रक्षण व पोषण कुटुंबपरंपरा, शिक्षणसंस्था, कथाकीर्तनें, साधुसंतांचे उपदेश, धर्माचे आदेश व विधिनिषेध आणि वृद्ध व पुढारी यांचें आचरण ह्यांच्या द्वारें होतें. तें उत्तम व्हावें म्हणून ह्या परंपरा, संस्था, पद्धति व उपदेश नीटपणें राखिल्या व चालविल्या पाहिजेत. समाजाचें नैतिक वाङमय व त्यांतील नीतिपाठ हे त्यांतील लोकांच्या मनांत अनेक प्रकारांनी, आचरणाने, उपदेशाने व पठणाने बिंबविले पाहिजेत. म्हणजे ते त्यांच्या अंगवळणीं पडतील.

सांस्कृतिक जीवनाच्या बौद्धिक अंगाला शिक्षणाची विशेष आवश्यकता आहे. त्यायोगें मनुष्याचें मन व शरीर सुदृढ होऊन त्यांना योग्यप्रकारचें वळण लागतें. त्यामध्यें तें सामर्थ्य व शील उत्पन्न करतें. मनुष्याच्या उपजत गुणांना व शक्तीला तें पोसतें व वाढवितें व त्यांना समाजोपयोगी करतें. आहेत त्या गुणांना योग्य संस्कार देऊन नव्या गुणांचा व ज्ञानाचा परिचय करून देतें आणि प्राप्त करून दिलेल्या गुणांच्या व विद्येच्या योगानें मनुष्यांमध्यें आपलें कार्य पार पाडण्याचें सामर्थ्य आणतें.

मनुष्य हा विनयशील व संयमक्षम बनूं शकतो. त्याच्या स्वयंभू शक्तींना संयम व वळण लावलें म्हणजे त्याचें सामर्थ्य वाढतें. विद्येच्या योगाने नवे गुण, नव्या शक्ति व नवें सामर्थ्य प्राप्त केल्याने तो बौद्धिक, शारीरिक व नैतिक दृष्टीने कार्यक्षम व कर्तृत्वशाली होऊं शकतो. शिक्षणाच्या व विद्येच्या योगानें आज कांही राष्ट्रें सर्व प्रकारें पुढे गेलीं आहेत. त्यांनी आपल्या लोकांचें पूर्वीचें जीवन पूर्णपणें पालटून, त्यांना सर्वांगांनी दृढ व सामर्थ्यवान् केलें आहे. म्हणून नागरिकांच्या उच्चतम व कर्तृत्वशाली जीवनाला शिक्षणाची आवश्यकता आहे.

शिक्षण हें शिक्षणसंस्थांच्या द्वारें दिलें जातें. लहान मूल अथवा प्रौढ मनुष्य हा स्वतःच्या अवलोकनाने, मननाने, व्यायामाने व उद्योगाने शिक्षण व ज्ञान हीं नेहमी मिळवीतच असतो. पण त्याला तीं सहज शास्त्रीय रीतीने, दुसऱ्याच्या अनुभवाने व मार्गदर्शकत्वाने मिळवितां यावीं म्हणून शिक्षणसंस्था निर्माण होतात. ह्या संस्था राजसत्ता, धर्मसत्ता, जातिसत्ता अथवा जनता यांच्या तंत्राने व अधिकाराने चालतात. पहिल्या तीन सत्तांचे शिक्षणसंस्था चालविण्यांत कांही सामान्य व कांही विशेष उद्देश असतात. त्यांचे सामान्य उद्देश हे शिक्षणाचे खरे उद्देश. मनुष्याला विद्या व कला प्राप्त करून देणें, त्याचें शील व वर्तन, बुद्धि व मन, शरीर व कौशल्य वाढविणें हे ते उद्देश होत. पण त्यांचे विशेष उद्देश म्हणजे आपल्या सत्तेची, मतांची व संस्थांची लोकांमध्यें भक्ति उत्पन्न करणें हे होत.

जनतेच्या तंत्राने चालणारें शिक्षण हें सामान्य व सर्वमान्य उद्देशाचें असतें. त्याला राजसत्तेने, धर्मसंप्रदायाने, व जातिसमूहाने दिलेलें विशिष्टत्व नसतें. सध्याच्या काळांत लोकतंत्री शिक्षणाकडे कल आहे. राजसत्ता जर प्रातिनिधिक व जबाबदार पद्धतीची असली तर तिचा अधिकार म्हणजे जनतेचाच अधिकार होईल व शिक्षणाला एकांगी वळण लागणार नाही. तरी पण शिक्षणसंस्था, त्यांचे अभ्यासक्रम, त्यांचे नियम व शासन हीं तज्ज्ञ व अध्यापक यांच्याच संमतीने रचिलीं व चालविलीं जाणें अधिक श्रेयस्कर आहे. राजसत्तेने व जनतेने, द्रव्य पुरविणें आणि शिक्षणसंस्था शिक्षणाचा उच्च हेतु विसरूं नयेत म्हणून त्यांचें वेळोवेळीं परीक्षण करणें, हीं कामें केलीं पाहिजेत.

मनुष्याच्या सर्व आयुष्याचा विचार केला तर त्याचें शैशव विद्याभ्यासांत व इंद्रियजयांत गेलें पाहिजे. प्रत्येक मनुष्याला कांही सामान्य व ठराविक विषयांचें व मर्यादेचें किमान शिक्षण त्या वयांत मिळालें पाहिजे, असें आज सुसंस्कृत व प्रौढ राष्ट्रांचें मत आहे. आपल्याकडे मानवी आयुष्याचे चार आश्रम कल्पून पहिला ब्रह्मचर्याश्रम सांगितला आहे. त्यामध्यें संयम, शिक्षण, शील यांच्या लाभाचा व वर्धनाचा कार्यक्रम ठरविला आहे. अशा प्रकाराने संस्कारित झालेला मनुष्य यौवनकालांतील गृहस्थाश्रमाला व नागरिकत्वाला योग्य होतो, कारण त्याच्यामध्यें

उद्योगी व व्यवहारी जीवनाला लागणारे संयम व साहस, शील व सामर्थ्य, कला व कौशल्य उत्पन्न झालेलें असतें. त्यामुळें तो योग्यतापूर्वक स्वत: जाणून व ओळखून समाजाच्या सर्व व्यवहारांत स्वतंत्रपणें भाग घेऊं शकतो.

उत्तम जीवनाचीं ध्येयें हींच शिक्षणाचीं ध्येयें असतात. पण शिक्षणाचा दुसरा एक उद्देश म्हणजे व्यवसायात्मक शिक्षण देणें हा होय. त्याकरतां मनुष्यांना निरनिराळ्या विद्या व कला शिकवावयाच्या असतात. प्रत्येक मनुष्याने आपल्याला ज्या व्यवसायाची आवड आहे किंवा जो व्यवसाय लाभाच्या व परिस्थितीच्या दृष्टीने करावासा वाटतो त्याचेंच शिक्षण घेतलें पाहिजे. आज समाजाला अनेक व्यवसायांची, कलाकौशल्याची, यांत्रिक विद्यांची व भौतिक शास्त्रांची आवश्यकता आहे. त्यायोगें लोकांचा उदरनिर्वाह, आयुष्यरक्षण, व सुखसोयी हीं साधतील. त्याचप्रमाणें समाजाची व्यवस्था व शासन नीट चालावयाला समाजशास्त्रांचा, इतिहासाचा, नीतिविद्यांचा व उच्च वाङ्मयाचा अभ्यास झाला पाहिजे. त्यांचा उपयोग अधिकारी व शासकवर्ग आणि शिक्षक व सेवक वर्ग यांना पुष्कळ होतो. पण सर्व मनुष्यांना कमींत कमी एका प्रतीच्या सामान्य बौद्धिक, शारीरिक, नैतिक व आध्यात्मिक शिक्षणाची आवश्यकता आहे आणि त्याबरोबरच कोणत्या तरी व्यवसायात्मक व ज्ञानात्मक विशेष शिक्षणाची आवश्यकता आपापल्या उद्योगधंद्याच्या, उदरनिर्वाहाच्या किंवा हौशीच्या दृष्टीने आहे. शिक्षणावाचून रहाणारा निरक्षर व असंस्कृत समाज आज अधोगतीला पोचेल.

पाठशाळा व शिक्षणसंस्था ह्याही सामाजिक संस्थाच आहेत. तेथे मुलामुलांचा, अध्याप्य-अध्यापकांचा सहवास व साहचर्य घडतें. त्यांचें मन तेथील उत्तम संगतीने व उपदेशाने सुसंस्कृत, ग्राहक, व्यापक, विवेकशील व स्वतंत्र बनावें; त्यांचा स्वभाव तेथील उच्च चारित्र्याने गुणग्राही, शीलवान्, विनयशील, आज्ञाधारक व सेवापर व्हावा; आणि त्यांचें शरीर व सामर्थ्य तेथील आदेशाने, व्यायामाने सुदृढ, संयमी, व्यवसाययोग्य असें तयार व्हावें. पूर्वीच्या संकलित व वाढत्या ज्ञानाचा तेथे सांठा असतो व तो प्रत्येक पिढीच्या उपयोगांत येतो. मुलांमुलींचें मन, शील व शरीर परंपरेला, परि-

स्थितीला व भावी प्रपंचाला अनुरूप असें तयार होतें. घरांतील शिक्षणापेक्षा तेथील शिक्षण व्यापक, विस्तृत व व्यवहारी असतें. तेथे मनुष्य समाजाच्या व्यवहारामध्यें वावरण्याला योग्य बनतो.

शिक्षण सार्वत्रिक व सार्वजनिक असावें असा सध्याच्या काळीं प्रौढ राष्ट्रांचा संकल्प असतो. प्रत्येक व्यक्ति साक्षर व सामान्य बाबतींत शिक्षित पाहिजे. प्रत्येक देशांत विशेष प्रकारच्या व उच्च ज्ञानाची पूर्ण सोय पाहिजे. सर्व प्रकारचें व सर्व विषयांचें ज्ञान देशांत उपलब्ध झालें पाहिजे.

आजच्या लोकशाही युगांत मतदार हे सामान्य रीतीने शिक्षित, शीलयुक्त, विवेकी व संस्कृत मनाचे पाहिजेत आणि त्यांचे प्रतिनिधि व अधिकारी हे विशेष रीतीने शिक्षित, शीलवान, बुद्धिमान् व संस्कृतिसंपन्न पाहिजेत. असें असेल तरच लोकसत्तात्मक राज्यपद्धति यशस्वी होईल.

तेव्हा शाळांचें महत्त्व अति मोठें आहे. तेथील वातावरण, शिक्षणपद्धति, राहणी, चारित्र्य इत्यादि फार उत्तम प्रकारचें पाहिजे. नुसत्या मुलांच्या परीक्षांचें व शिक्षकांच्या पगारांचें त्यांना क्षेत्र न करतां, विद्यार्थ्यांच्या व शिक्षकांच्या विद्यांचें, विनयाचें, सहकाराचें व सामर्थ्यप्राप्तीचें त्या केंद्र बनल्या पाहिजेत. विद्यार्थ्यांना उत्तम जीवन म्हणजे काय व गृहस्थाश्रमामध्यें उत्तम रीतीने कसें राहावें, याचें योग्य शिक्षण मिळालें पाहिजे. त्याकरतां त्यांना अनेक गत व वर्तमान संस्कृतींचें ज्ञान झालें पाहिजे, तसेंच आपल्या आयुष्यांत करावयाच्या व्यवसायांत कौशल्य प्राप्त झालें पाहिजे. धर्मशास्त्र, समाजनीति, इतिहास, भूगोल, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि समाजशास्त्रांचा व तत्त्वज्ञानांचा आणि भौतिकशास्त्रांचा सामान्य अथवा विशेष अभ्यास आपल्या नडीप्रमाणें व आवडीप्रमाणें केला पाहिजे. शिक्षण हें आपल्या बुद्धिविकासाचें, समाजस्थैर्याचें व प्रगतीचें मुख्य साधन आहे.

शिक्षणसंस्था अनेक आहेत. गृहें, शाळा, आश्रम व विद्यापीठें ह्यांच्या द्वारें शिक्षणाचें काम चालतें. त्याचप्रमाणें शिक्षणाचे प्रकार, सोयी, अभ्यासक्रम व उद्देश अनेक आहेत. मनूपासून मॉन्टेसोरीपर्यंत आणि पूर्वीचे आश्रम व विद्यापीठें यांपासून आजच्या शाळा, कालेजें व युनिव्हर्सिट्या यांपर्यंत त्यांचीं अनेक रूपांतरें झालीं आहेत. तरी त्यांच्या

मध्यें मनुष्यांत सामर्थ्य व शील उत्पन्न करणें, ज्ञानामध्यें अधिकाधिक भर घालणें आणि त्यांच्यायोगें मानवी जीवन सुखकर करणें, हेच उद्देश दिसून येतात. प्रत्येक नागरिकाने याप्रमाणें सुशिक्षित होऊन समाजऋण हें फेडलेंच पाहिजे, म्हणजे समाजाचें रक्षण, कार्य व सेवा हीं केलींच पाहिजेत.

आधुनिक शिक्षण मनुष्याला स्वतंत्र बुद्धीचा, धष्टपुष्ट शरीराचा, विनयशील, व्यायामशील व विजयशील वृत्तीचा, व्यवसायनैपुण्याचा व नागरिकवृत्तीचा करूं पाहतें. त्याला स्वतंत्र विचाराने आपलें सुखदुःख कसें पाहतां येईल व आपला हीन दर्जा कसा उच्च करतां येईल, या प्रश्नांची काळजी तें शिक्षण घेतें. प्रत्येक मनुष्याला स्वतंत्र स्वभाव, आकांक्षा व कार्यक्षमता आहे असें ठरवून, त्याला योग्य वळण त्याच्या व समाजाच्या हितदृष्टीने कसें लागेल हें तें शिक्षण पाहतें. तें राष्ट्राला तारूं किंवा मारूं शकतें. आज शिक्षणाच्या मर्यादा जातिदृष्टीने घालणें योग्य होणार नाही. त्यांचा विचार राष्ट्रहितदृष्टीने व प्रत्येक व्यक्तीच्या शक्तीला व बुद्धीला योग्य वाव मिळेल अशा बुद्धीने व भावनेने केला पाहिजे.

आज शिक्षणापासून लाभ व्हावा तितका होत नाही, याचें कारण लोकांमध्यें स्वैरसंचारी व निरंकुश वृत्ति पसरत आहे आणि नीतिबंधनांना मन अनुकूल नाही. त्यामुळें विद्यार्थिवर्ग क्षणिक मौजेच्या व सुखाच्या मागे जात आहे. त्याच्यामध्यें विद्येचें अधिष्ठान दृढ होत नाही व तिचें तो पुरें अनुष्ठान करीत नाही. विद्यार्थिदशेंत गृहस्थाश्रमाच्या इच्छा उत्पन्न झाल्यामुळें व त्यांना मोकळीक मिळाल्यामुळें आज आश्रमसंकर होऊन बसला आहे. त्यामुळें आपलें शिक्षण फलदायी होत नाही.

समाजसंस्कृति व मनुष्याच्या सौंदर्यात्मक भावना ह्यांमध्यें निकट संबंध आहे. नागरिकाचें जीवन सौंदर्य भावनेने प्रेरित झालें म्हणजे त्याची ध्येयें व रुचि उदात्त राहतात आणि त्याच्या जीवनामध्यें एक प्रकारची सुसंगतता व आनंद हीं उत्पन्न होतात. मनुष्याच्या सौंदर्यात्मक भावना त्याच्या साहित्य, संगीत, विद्या व कला यांमध्यें आविष्कृत होतात. लोक भिन्न रुचीचे, भावांचे व रसांचे असल्यामुळें त्या रुचींना, भावांना व रसांना अनुसरून त्यांचें साहित्य व संगीत, विद्या व कला हीं असतात. सौंदर्याच्या दृष्टीने कलांची विशेष आवश्यकता आहे. त्यायोगें समाजांत उच्च व उदात्त

भावना वावरतात. आपणास येथे वैयक्तिक व कौटुंबिक सुखाच्या कामकलांचा अथवा व्यावसायिक कर्मकलांचा अथवा चित्तहारी ललितकलांचा विचार करावयाचा नसून नागरिकाच्या राहणीच्या दृष्टीने वास्तुकलांचा विचार करणें आवश्यक आहे. कुटुंबाचें राहतें घर व लोकांचें राहतें नगर यांची बांधणी व रचना ह्यांच्याबद्दलची जी कला तीस वास्तुकला म्हणतात. ती बांधणी व रचना उत्तम झाली तर नागरिकांचें कौटुंबिक व सामुदायिक जीवन सुखदायी होतें.

सौंदर्य हें मनुष्याच्या सुखाला व समाधानाला कारणीभूत होतें व त्यायोगें मनुष्याची रुचि वाढते. नगराच्या व घराच्या सौंदर्यामुळें नागरिकामध्यें उच्च भावना, प्रेरणा व प्रेम उत्पन्न होतें. पूर्वीचीं व आजचीं कांही मोठमोठीं नगरें आपल्या नगररचनेच्या आणि घरें, देवालयें, बगीचे, कूप, मार्ग इत्यादि आपल्या बांधणीच्या शैलीमुळें प्रसिद्ध झालीं आहेत.

नगररचना हें एक नागरिकांच्या सुखाचें प्रमुख साधन आहे व त्याचें एक नवें शास्त्र निर्माण झालें आहे. आपल्याकडे नगरबांधणीचें शास्त्र आहे. त्यामध्यें भूमीची निवड, नदीचें सान्निध्य, हवापाण्याच्या सोयी, मार्गरचना, बाजार, शाळा, घाट, तडाग, कूप, उद्यान व देवालयें यांची जागा व बांधणी यांचा योग्य विचार केलेला आहे. तो केला नाही तर नागरिकांच्या शरीरावर व आयुष्यावर अनिष्ट परिणाम घडून येतील आणि त्यांचे व्यापार, दळणवळण व व्यवहार नीट चालावयाचे नाहीत. मनुष्याच्या आर्थिक, सामाजिक व राजकीय हालचाली नीट होण्याला व आरोग्य नीट राहण्याला नगररचना योग्य पाहिजे. त्याचप्रमाणें कौटुंबिकांचे व्यवहार सुरळीत चालण्यास व रोगराईचा प्रतिबंध होण्यास घर बांधणी व नगर बांधणी उत्तम व सुखावह पाहिजे. त्यामध्यें रुंद राजमार्ग, व्यापार व वाहतुकी यांचीं मुबलक साधनें, मोठीं उद्यानें व उपवनें, प्रशस्त पण्यवीथिका, सार्वजनिक कार्यालयें, पुस्तकालयें, प्रदर्शनें, वस्तुसंग्रहालयें, प्राणिसंग्रहालयें, आरोग्यालयें, रुग्णालयें, शालागृहें, छात्रालयें, व्यवसाय व वसती यांचीं स्थानें व पेठा, देवालयें, नाटकगृहें, व्यायामभूमि, क्रीडांगणें, धर्मशाळा, अन्नछत्रें, अनाथगृहें, अतिथिगृहें इत्यादि समाजाच्या

सर्व गोष्टींना योग्य जागा व सोयी असल्या पाहिजेत. अशा प्रकारच्या गोष्टींचा पुरवठा व त्यांची यथाशास्त्र मांडणी नगररचनेमध्यें झाली पाहिजे. त्यामुळें नागरिकांच्या सामुदायिक भावनांचें पोषण होतें व त्यांचा समाजभाव वाढतो.

नगररचनेंत व बांधणींत मनुष्याच्या व समाजाच्या उच्च भावना व ध्येयें हीं सौंदर्यरूपानें प्रगट झालीं पाहिजेत. त्यायोगें त्यांना वळण लागतें आणि त्यांचें मन व भावना उच्च राहतात आणि त्या त्यांच्या संस्कृतीच्या व आकांक्षेच्या द्योतक होतात. शिवाय, त्या जर करुणा, मैत्री, प्रेमभाव व अध्यात्म यासंबंधींच्या असल्या तर त्यांचा नागरिकाच्या उदात्त जीवनाला उपयोग होतो. सौंदर्याच्या गोष्टी व रचना मनुष्यामध्यें आकर्षणभाव व प्रेमभाव उत्पन्न करतात आणि त्यांचा सामाजिक जीवनाच्या दृष्टीनें फार उपयोग आहे. सर्वभूतीं प्रेमभाव उत्पन्न होण्यानें नागरिक जीवनाचा उद्देश सिद्ध होतो.

प्रत्येक मनुष्य हा समाजाचें धन व बळ आहे. तेव्हा त्याच्या शरीराचें मनाचें व शीलाचें योग्य पोषण व वर्धन झालें पाहिजे. त्यांच्या सुस्थितीवर व सौंदर्यावर समाजाचें सांस्कृतिक जीवन अवलंबून आहे.

---

## प्रकरण दहावें

# स्थानिक जीवन

प्रत्येक देशांतील खेडेगावाची व नगराची आर्थिक घटना व व्यवहार हीं निरनिराळ्या स्वरूपाचीं असतात. खेडें अथवा ग्राम हा मुख्यतः आर्थिक आवश्यकतेमुळें उत्पन्न होतो. तेथे वस्ती करणाऱ्या माणसांचे व्यवहार मूलतः आर्थिक प्रकाराचे असतात. शेतकी करणाऱ्या लोकांचा तेथे जमाव होतो आणि शेतकीला लागणारें नांगर औत इत्यादि सामान करणारे कारागीर व शेतकऱ्यांच्या घरकामाकरतां व धर्माकरतां लागणारे इतर व्यवसायी यांचा तेथे समावेश होतो. यामुळें त्या सर्वांमध्यें 'गांवकरी' म्हणून नातें

उत्पन्न होतें आणि पुढे तो संबंध दृढ व जिव्हाळ्याचा होतो. गावकऱ्याचा समाज हा मुख्यतः आर्थिक समाज होय. त्यांच्यामध्यें भिन्न जाती असल्या तर सामाजिक सामान्य व्यवहार होतो, सामाजिक विशेष व्यवहार होत नाही. एकच जाति असली तर सामान्य व विशेष हे दोन्ही सामाजिक व्यवहार होतात. ग्रामव्यवस्थेच्या व शेतीरक्षणाच्या दृष्टीने ते एकमेकांच्या तंत्राने वागतात. असें ते वागूं लागले म्हणजे त्यांच्यामध्यें इतर व्यवहार सुरू होतात आणि तो गाव एक घनिष्ट संबंधाचा प्रदेश बनतो. शेतकीच्या कामामुळें तेथे शेतकऱ्यांची संख्या अधिक असते आणि त्यांच्या शेतकीच्या व घरच्या आनुषंगिक गरजा पुरविणारे कारू अथवा कारागीर लोक हेही थोडे बहुत असतात. त्यांतील मुख्य हा शेतकरी असून त्याचे साहाय्यक म्हटले म्हणजे सुतार, लोहार, न्हावी, धोबी, कोष्टी, कुंभार, चांभार, धनगर, भट, भाट, भिक्षुक, जोशी, वैद्य, महार, रखवालदार, पाटील व कुलकर्णी हे होत. त्यांचीं कामें शेतकीचीं आउतें व यंत्रें तयार व दुरुस्त करणें, घरें बांधणें, वस्त्रें विणणें, भांडीं करणें, औषध देणें, आरोग्य राखणें, धार्मिक कृत्यें करणें, शिक्षण देणें, शांतता राखणें, शासन करणें, सारा वसूल करणें, इत्यादि भिन्न भिन्न अशीं असतात. त्याबद्दल त्यांना मोबदला शेतकीच्या उत्पन्नांतून पूर्वी वाट्याच्या रूपाने मिळत असे. हे सर्व कामकरी व अधिकारी गांवाच्या आर्थिक सुस्थितीला आवश्यक असत. आपल्या देशांत त्यांच्या निरनिराळ्या जाती बनल्या आहेत. पण इतर देशांत त्यांचा वेगळेपणा हळूहळू नष्ट होऊन ते ग्रामसमाजांत एकत्रित झाले आहेत.

पूर्वी आठवड्याचे बाजारहाट प्रत्येक मोठमोठ्या खेड्यांत आळीपाळीने नेमलेल्या दिवशीं भरत असत. आज सुद्धा तशी स्थिति आहे. त्यामुळे गावांतील मालाची देवघेव होऊन त्यांतील लोकांच्या आर्थिक गरजा भागतात.

जातिपंचायती ह्या गावांतील आपापल्या जातीच्या सामाजिक, धार्मिक, व्यावसायिक व शैक्षणिक गोष्टींचें नियमन करीत. त्यांच्या सभांमध्यें कुटुंबांतील वडील व कर्ते पुरुष भाग घेत. ते जातीचे, धर्माचे, कुळाचे व धंद्याचे आचार व व्यवहार चालवीत. त्यांचा राजकीय गोष्टींशीं संबंध नसे. ग्रामाच्या आर्थिक घटनेंत त्यांचें अंग असे. धंद्याचे नियम,

त्याची वाढ व नियमन, मालाची पैदास व परिस्थिति, या गोष्टी जाति-पंचायतीला पाहाव्या लागत. त्यामध्ये ग्रामाधिकारी किंवा ग्रामपंचायत ह्यांना हात घालण्याचा अथवा हरकत करण्याचा हक्क नसे. राजसत्ता ही शांतता, सुव्यवस्था व न्यायदान याव्यतिरिक्त कोणत्याही ग्रामाच्या कारभारांत लक्ष घालीत नसे. समाजांत सुरक्षितता व संतोष नांदावा एवढाच तिचा उद्देश असे.

पूर्वी गाव हा पुष्कळ अंशीं स्वतंत्र असे. त्याचे संबंध व व्यवहार गांवांतर्गत असत. जमीन त्याच्या सामुदायिक मालकीची अथवा व्यक्तिगत मालकीची आणि त्यांतील कुळांनी लागवडीस आणलेली असे. प्रत्येक कुळाचें एक घर व जमिनीचा तुकडा असे. पूर्वी गावांतील सर्व शासन-व्यवस्था गावकरी, त्यांचे अधिकारी व ग्रामपंचायत यांच्याकडे असे ग्रामाधिकारी व ग्रामपंचायती यांकडे गांवाचीं राजकीय कामें, संरक्षण, शांतता, न्यायदान व करग्रहण हीं असत. ग्रामसमाजाच्या सामुदायिक हिताकडे त्यांचें लक्ष असे. ते नुसती शासनाचींच कामें करीत नसत. ते लोकोपयोगी कामें, आरोग्य, पाणीपुरवठा, रस्ते, उद्यान, देवळें, विहिरी इत्यादि करीत असत. गांवचा मुख्य अधिकारी पाटील असे. त्याच्याकडें न्यायाचीं, शासनाचीं व रक्षणाचीं कामें असत. त्याच्या मदतीला कनिष्ठ अधिकारी असत.

ग्रामपंचायत ही अनेक जातींचे प्रतिनिधि मिळून होत असे. जातींतील प्रमुख लोक तेथे जमत असत. ते ग्रामसमाजाचे पालक समजले जात. त्यांना ग्रामवृद्ध अथवा महाजन म्हणत.

ह्या जाति-पंचायतीमध्ये व ग्राम-पंचायतीमध्ये गावांतील सर्व कारभाराचा अधिकार एकवटल्यामुळें गाव हें स्वतंत्र कारभाराचें लहानसें राज्यच असे. जेव्हा तें एखाद्या प्रादेशिक किंवा सार्वभौम सत्तेच्या हाताखाली येई, तेव्हा सुद्धा त्याचें स्वातंत्र्य बरेंचसें कायम राहत असे. राज्यसत्तेला ठराविक कर अथवा खंडणी दिली व कांही राज्यकार्यें केलीं आणि त्या राजसत्तेचें स्वामित्व मानलें म्हणजे त्या गांवचा राजसत्तेशीं प्रत्यक्ष संबंध संपला. राजसत्तेचें हित पाहण्याचें काम पाटलाकडेच असे, आणि कधीकधी एखादा वरिष्ठ अधिकारी येऊन ग्रामव्यवस्थेची

व राजसत्तेच्या मागणीची पाहणी करून जाई. गांवाचा हा स्वतंत्रपणा आज नष्ट झाला आहे आणि आर्थिक, सामाजिक व राजकीय दृष्टीनें त्याचा संबंध इतर प्रदेशांशीं घनिष्ट झाला आहे.

नगरें हीं अनेक गरजा भागविण्याकरतां उत्पन्न झालीं. त्यांचा मूळ उद्देश जरी धार्मिक, राजकीय व व्यापाराचा असला तरी त्यांचा मुख्य व्यवहार त्या प्रांतांतील व नगरांतील अनेक गरजा भागविण्यासाठी चालतो. आहे. अनेक व्यवसायाचे लोक या ठिकाणीं राजसत्तेच्या अथवा धर्मसत्तेच्या आश्रयाखाली एकत्रित होऊन नगरांतील व आसपासच्या प्रदेशांतील लोकांच्या आर्थिक गरजा पुरवितात. उद्योगधंदे व कलाकौशल्य हे तेथील प्रमुख व्यवसाय होत. त्यांची वाढ करणें व मालाची देवघेव करणें हीं उद्योगाचीं व व्यापाराचीं कामें तेथील लोक करतात. तेव्हा नगराचें महत्त्व त्याच्या स्थानामुळें, उद्योगधंद्यांमुळें, कलाकौशल्यामुळें, राजकीय अधिष्ठानामुळें किंवा धार्मिक पावित्र्यामुळें उत्पन्न होतें. तेथील लोक अनेक आकांक्षांचे, पेशाचे व व्यवसायाचे असतात. त्यांचा संबंध व व्यवहार अधिक गुंतागुंतीचा, कलाकौशल्याचा व प्रौढ प्रकारचा असतो. तेथे व्यापारी व कारागीर आर्थिक व संरक्षणाच्या सोयीमुळें व मालाच्या मागणीमुळें जमतात. नगरांतील उद्योगधंदे व व्यापार यांचे संबंध व क्षेत्र नगरांतर्गतच नसतें. त्यांच्या देवघेवीचा पसारा देशभर असतो व चालतो.

प्रत्येक धंदा अथवा व्यापार करणाऱ्यांचा स्वतंत्र संघ असतो. तोच धंदा अथवा व्यापार करणाऱ्या अनेक जातींचा तो संघ असतो. ते संघ आपले आर्थिक हिताचें व व्यवहाराचें संरक्षण व संपादन करीत असतात. मालाचें मोल व प्रत, पैदास, माप, तोल, क्रयविक्रय इत्यादि गोष्टींचें नियमन हे संघच करतात. शिवाय, ते लोकोपयोगी, दानधर्माचीं, शिक्षणाचीं कामें करतात. देवालयें, कूप, तडाग, धर्मशाळा, अन्नछत्रें, पाठशाळा, मंदिरें, पाणपोया, पांजरपोळ इत्यादि ते बांधतात.

हे व्यवसायात्मक संघ सोडले तर नगरामध्यें सामुदायिक स्वरूपाची नगरपंचायत असे, आणि ती नगरांतील मुख्य सामुदायिक कारभाराचें नियमन करीत असे. तिचे सभासद 'महाजन' म्हणून संबोधिले जात. त्यांचा अध्यक्ष 'नगरसेठ' असे. ती बाजार, क्रयविक्रय,

हुंड्या, कर, इत्यादि आर्थिक गोष्टींकडे आणि शिक्षण, धर्मकृत्यें, शासन, आरोग्य, दानकृत्यें, इत्यादि सामाजिक व संरक्षणाच्या गोष्टींकडे पाहत असत. कधी कधी त्यांना राजकीय कारभाराचे अधिकार असत. त्यास अनुसरून ते नगरांतील शांतता, सुव्यवस्था, संरक्षण व न्याय यांकडे लक्ष देत. नगर जर राजधानीचें मुख्य ठिकाण असलें तर बरेचसे संरक्षणाचे व कारभाराचे अधिकार राज्याधिकाऱ्याकडे असत.

नगरामध्यें निरनिराळया धंद्याच्या पेठा असतात व तेथेच त्या जातीचे लोक राहतात. त्यांच्या सहवासामुळें व आर्थिक अन्योन्याश्रयामुळें त्यांच्यामध्यें नवा सामुदायिक भाव आणि सारख्या सामाजिक व राजकीय आकांक्षा उत्पन्न होतात. त्यायोगें त्यांच्यामध्यें नागरिकत्वाचा श्रेष्ठभाव व एकमेकांची सेवा व साहाय्य करण्याची वृत्ति उत्पन्न होते.

कांही नगरें प्रत्यक्ष राजसत्तेच्या अधिकाराखाली असत. राज्याधिकारी सर्व राजकीय कारभार पाहत. इतर नगरें पुष्कळ अंशीं स्वतंत्र असत. त्यांना नगराचा राजकीय कारभार पाहण्याचा अधिकार दिलेला असे. नगरपंचायत आपले महाजन व नगरसेठ यांच्या द्वारें हा राजकीय कारभार पाही. ती राजसत्तेला कर व दंड देत असे आणि इतर नेमून दिलेलीं राजकार्यें करीत असे. राजसत्तेचा वरिष्ठ अधिकारी तंटेभांडणांत अखेरचा न्यायनिवाडा करीत असे. राजद्रोहाच्या महा अपराधामध्यें त्याचाच अधिकार व न्याय चाले. सध्या राजकीय अधिकार नगरसभेला नसतात. ते राजसत्तेचे अधिकारी व न्यायाधीश चालवितात.

प्रत्येक ग्रामासारख्या व नगरासारख्या स्थानिक समाजामध्यें मनुष्याचे सर्व प्रकारचे व्यवहार व संबंध घडत असतात. त्यामध्यें शिक्षण, उद्योगधंदे, धार्मिक आचरण, राजकीय कारभार, सामाजिक संबंध इत्यादि नित्यरूपाने चालतात. तेथे अन्नवस्त्राचे, आयुरारोग्याचे, शिक्षण-शीलाचे, सहवास-सहकाराचे निरनिराळे प्रश्न समाजापुढे असतात.

प्रत्येक स्थानिक समाजाचीं मुख्य अंगें म्हटलीं म्हणजे (१) त्यामध्यें रहाणारे लोक, (२) जें स्थळ ते व्यापतात तें, (३) ज्या संस्था त्यांच्या आवश्यकता पुरवितात त्या, (४) त्यांच्या सामाजिक परंपरा व परिस्थिति,

आणि (५) त्यांच्या जीवनाचा सामान्य हेतु. त्यांचे नियमनिर्बंध, नीतिधर्म, चालीरीती, संस्थासमजुती त्यांना एकत्र, एकरूप व एकजीव करतात.

प्रत्येक स्थानिक समाजाने आपली सुस्थिति व सुधारणा याकरतां त्रैवार्षिक अथवा पंचवार्षिक कार्यक्रम आखला पाहिजे. असें केल्याने ग्रामाची व नगराची, प्रांताची व देशाची योग्य वाढ होते. त्यामध्यें नागरिकाच्या धार्मिक, नैतिक, आर्थिक, राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक अंगांचा विचार झाला पाहिजे. त्याचप्रमाणें त्याचें रक्षण, पोषण, वर्धन व प्रगति या सर्वांकडे लक्ष दिलें पाहिजे. त्यांच्यांतील दु:ख व दारिद्र्य, व्याधि व व्यसनें नाहीशीं केलीं पाहिजेत. त्यामध्यें सहकार, सेवा, एकी व राष्ट्रीय भाव वाढविला पाहिजे.

स्थानिक समाजामध्यें व संस्थांमध्यें मनुष्याला नागरिकतेचें उत्तम शिक्षण मिळतें. चांगली नागरिकता अशा समाजांत सुसंस्कृत, सहकारी व जबाबदारीचें जीवन घालविण्यास शिकविते. या स्थानिक नागरिकत्वाच्या पाठापासून राष्ट्राच्या नागरिकत्वाचे उत्तम धडे मिळतात. उत्तम नागरिक हा नुसता शासन पाळणारा मनुष्य नव्हे, तर तो आपल्या स्थानिक समाजाच्या कारभारांत व कार्यांत उत्साहाने व कर्तृत्वाने भाग घेणारा मनुष्य होय. त्यामुळें त्याला अनुभव व ज्ञान मिळतें, आणि स्वत:च्या कर्तृत्वाची, नेतृत्वाची व कर्तव्याची त्याला उत्तम जाणीव होते.

स्थानिक कारभारामध्यें रस्ते, पूल, आरोग्य, पाणी, प्रकाश, शांतता. गरिबांची व दुष्काळग्रस्तांची काळजी, ग्राम व नगर यांची रचना बांधणी व ठेवण, न्याय, शिक्षण, आरोग्य, करमणुकीचीं व व्यायामाचीं साधनें आणि सार्वजनिक कामें व त्या करण्याच्या संस्था व आलयें येतात. नागरिकांना आपल्या स्थानिक पंचायती निवडणें, प्रांतीय व राष्ट्रीय लोकसभांचे प्रतिनिधि निवडणें इत्यादि गोष्टी कराव्या लागतात

औद्योगिक क्रांतीमुळें व देशांतील उद्योगधंदे बुडाल्यामुळें सध्या खेड्यांची सर्व प्रकारें दुर्दशा झाली आहे. उद्योगी व साहसी, बुद्धिमान कर्तृत्ववान लोक खेडीं सोडून चालल्यामुळें तीं ओसाड पडत आहेत. तेथील जीवन विस्कळित, दु:खी व कष्टी झालें आहे आणि ग्रामपंचायतीच्या नाशामुळें लोकांमधील एकोपा व सहकार कमी होऊन, त्यांच्यामध्यें कलह-

प्रियता, आळस व निराशा हीं वाढलीं आहेत. त्यांच्यांतील नेते व पुढारी कमी झाले आहेत.

सध्या ग्रामोद्धार करणें हें अतिशय आवश्यक आहे. आज ग्रामसंरक्षण म्हणजे आपल्या देशाच्या अन्नवस्त्राचें संरक्षण, संपादन व संवर्धन होय आणि देशांतील बहुजनसमाजाच्या जीविताच्या व सुखाच्या साधनांचें संरक्षण होय. ग्रामभूमि हीच राष्ट्राची आज मुख्य संपत्ति आहे. ग्रामोद्धार हा योग्य ग्रामसंघटनेच्याच योजनेने होईल. ग्रामसंघटना करणें हें मुख्यत: सरकाराचें कर्तव्य आहे. त्याच्या सत्तेवाचून व साहाय्यावाचून ग्रामसंघटना टिकाऊ होणें व ग्रामोद्धार सर्व बाजूने होणें अशक्य आहे. तरीपण सत्तेचें साहाय्य व पाठबळ आज नसल्यामुळें जनतेंतील पुढाऱ्यांना हें काम केलें पाहिजे, आणि त्याकरतां आपल्या नेतृत्वाखाली ग्रामसेवक नेमून ग्रामाची सुधारणा सर्व अंगांनी केली पाहिजे.

ग्रामीणाचें सुख, संपत्ति व बल वाढविणें फार आवश्यक आहे. त्याकरतां मुख्यत: साक्षरता, उद्योगप्रियता, आरोग्य, कला यांचें शिक्षण वाढविणें अत्यंत जरूरीचें आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या उद्योगधंद्यांना, दळणवळणाला गांवाच्या कारभाराला सहाय्य करणें आणि त्याबद्दल योग्यज्ञान देणें हेंही पाहिजे. ग्रामामध्यें अन्नवस्त्र व व्यवसाय आणि राहण्याच्या सुखसोयी व करमणुकीचीं साधनें ह्यांची जर व्यवस्था झाली तर कर्ती व बुद्धिवान माणसें ग्राम सोडून कमी प्रमाणाने जातील.

ग्राम हा जरी शेतकीप्रधान असला तरी त्याच्या भरभराटीला व स्वास्थ्याला उद्योगधंद्याची जोड पाहिजे. त्यांच्या संयोगानेच गांवाची आर्थिक सुस्थिति राहील. नाही तर तेथील चांगलीं माणसें निघून जाऊन गुंड, कुटाळ, भांडकुदळ, कर्जबाजारी, कज्जेदलाल यांची वाढ होईल. खेडेगांवांत अशावृत्तीच्या लोकांचें प्राबल्य वाढत आहे. त्यांना व्यवसाय करावयाला पुरेसें काम नाही व सार्वजनिक कारभाराची जबाबदारी नाही. त्यामुळें गावांतील शेतकरी, कामकरी व कारागीर यांच्या उपजत शक्तींचा व उत्साहाचा ऱ्हास होऊन त्यांची कार्यक्षमता व्यर्थ जात आहे. ती त्यामुळे टिकत व वाढत नाही.

ग्रामसंघटनेंत व ग्रामोद्धारांत स्वराज्याचा पाया व स्वराज्याचें शिखर आहे आणि स्वराज्यावांचून ग्रामांची संघटना व सुधारणा होणें अशक्य आहे. ग्रामांतील प्रत्येक व्यक्ति साक्षर व शिक्षित, निरोगी व कार्यक्षम, उद्योगी व धनवान झाली पाहिजे. तिच्यावर लादलेली वेठबिगार गेली पाहिजे. तिला आपला स्थानिक कारभार योग्य प्रकारें करण्याची संधि व सत्ता मिळाली पाहिजे. म्हणजे ती आपले नागरिकाचे अधिकार व कर्तव्यें योग्य प्रकारें बजावील.

त्याच्याचबरोबर तिला शेतकीचें योग्य संरक्षण, संपादन व संवर्धन करण्यास शिकविलें पाहिजे. शेतकीच्या उत्पादनावर लोकांचें अन्नवस्त्र अवलंबून आहे. शेतकऱ्यांना आपल्या श्रमाचा व खर्चाचा योग्य मोबदला मिळाला पाहिजे. संपत्तीच्या विनिमयांत व वांटणींत त्यांना योग्य भाग मिळाला पाहिजे. त्यांचें दळणवळण व वाहतूक वाढली पाहिजे आणि त्यांना इतर धंद्यांचें व कलांचें ज्ञान व इतर कामें करण्याची संधि मिळाली पाहिजे. अशा प्रकारच्या योजनेने त्यांना अन्न व वस्त्र, गृह व आरोग्य शिक्षण व शील, धर्म व व्यवसाय, करमणूक व श्रमापहार, इतरांशीं सख्य व सहवास, या दृष्टीने सुख मिळेल.

आधुनिक नगरांचें महत्त्व आर्थिक दृष्टीने विशेष आहे. त्यांच्यामध्यें उद्योगधंदे, व्यापार, पेढ्या, कंपन्या, राज्यकारभार, शिक्षणसंस्था आणि इतर चळवळींचीं साधनें व संस्था हीं एकत्रित झालेलीं आहेत. त्यामुळें सामाजिक जीवनांत अनेक महत्त्वाच्या संघटना व नवे प्रश्न उत्पन्न झालेले आहेत. तेथील दाट लोकसंख्या, तेथील देशीपरदेशी लोक, तेथील नाना उद्योगधंदे व व्यापार, तेथील अनेक संघ व संस्था, तेथील अनेक कारभार व कार्यें, करमणुकीचीं साधनें आणि सुखशांतीचीं व विश्रांतीचीं गृहें, ह्यांच्या योगें आरोग्य, हवा, पाणी, प्रकाश, राहतीं घरें, दळणवळणाची दाटी, गुन्हे, गरिबी, अनीति इत्यादींचे प्रश्न अति बिकट होऊन बसले आहेत. विशेषतः आरोग्य व वसतीचीं घरें याबद्दल बरीच काळजीची व व्यवस्थेची आवश्यकता आहे. नगरांतील मृत्यूचें प्रमाण, आयुष्याचें प्रमाण व जननाचें प्रमाण हीं त्यावर बरींच अवलंबून आहेत.

यांत्रिक व औद्योगिक प्रगतीमुळें आणि दळणवळणाच्या व व्यापाराच्या वाढीमुळें नगरांतील लोकसंख्या फार वाढली आहे. तेथील काम, वेतन, राहणी व सोयी ह्यामुळें लोक तेथे ओढले जात आहेत. सामान्यतः नगरांतील राहणी ग्रामांतील राहणीपेक्षा अधिक चांगली व मानाची समजली जात असते. खरें पाहिलें असतां नगरामध्यें चांगल्याबरोबर वाईट गोष्टींचाही अतिरेक असतो. तेथे व्याधि, व्यसनें, व्यभिचार, विहार, अनीति, तंटे, मारामाऱ्या, अपराध, अपघात, आत्मघात ह्या सर्वांचें प्रमाण अधिक असतें.

तेव्हा नगरांतील जीवन उत्तम व सुखी होण्यास त्याकडे तेथील अधिकाऱ्यांचें व जनतेचें पूर्ण लक्ष पाहिजे. नगररचनेचा व सुधारणेचा आखीव कार्यक्रम व योजना पाहिजे. नगर हेंच आज मुख्यतः सर्व मानवी घटनांचें, व्यवहाराचें, संघटनांचें, कार्यक्रमाचें, योजनांचें, आकांक्षांचें, व्यापाराचें व संबंधाचें आलय, आगर व स्थान होऊन बसलें आहे. तेव्हा तेथेच मनुष्याच्या सामुदायिक जीवनाचे प्रश्न सोडविले जात आहेत आणि तेथेच सर्व भौतिक शास्त्रें व सामाजिक शास्त्रें व सर्व धर्म व ज्ञान, आपले निष्कर्ष, वचनें, आज्ञा व दृष्टि, ह्यांचा प्रयोग व उपयोग करून पाहत आहेत.

ज्या समाजांत राजकीय अधिकार कांही व्यक्तींमध्यें वाटले जातात व ते वंशपरंपरागत चालतात, त्या समाजाला 'वतनी' किंवा 'सरंजामी' म्हणतात. अशा व्यक्तींना राजसेवा केल्यामुळें देशांतील कांही जमीन व व कांही अधिकार इनाम रूपाने पिढीजाद प्राप्त होतात. असे जमीनदार व अधिकृत लोक पुष्कळ देशांत वरिष्ठ म्हणून गणले जाऊन उत्तम तऱ्हेने नांदत आहेत. त्यांच्या हातीं आर्थिक संपत्ति, राजकीय अधिकार व सामाजिक मान असल्यामुळें त्यांना राजसत्ता ही अधिक मानपान देते आणि ते तिचा आश्रय करतात. त्यामुळें पुष्कळ ठिकाणीं त्यांच्या अधिकाराखाली असलेल्या लोकांवर त्यांचा बराच जाच व जुलूम होतो आणि गरीब शेतकऱ्यांना व इतर लोकांना त्यापासून सुटणें अशक्य होतें. पिढीजाद अधिकारामुळें त्यांचें वर्तन व व्यवहार पुष्कळ बाबतींत वाईट प्रकारचें दिसून येतें. तेव्हा समाजसत्तावाद्यांनी त्यांचें उत्पाटन करणें हा समाजसुधारणेचा प्रथम पाया मानला आहे. त्यायोगें अल्पसंख्याक, स्वार्थी व

दुष्ट प्रवृत्तीच्या लोकांच्या हातांत अडकलेली व त्यांनी अडकविलेली संपत्ति सुटून तिची यथायोग्य वांटणी व तिचा उपभोग सर्व कामकरी व उद्योगी लोकांना मिळेल.

अशाच रीतीने धर्माधिकाऱ्यांच्या हातांत संपत्ति व सत्ता ठिकठिकाणी एकत्रित झालेली आहे. तिची सुटका लोकहिताच्या दृष्टीने करणें हाही प्रयत्न चालू आहे. महंत व त्यांचे मठ नुसते धार्मिक व उपदेशात्मक राहिले तर ठीक आहे. ते जर नुसते भोगाच्या मागे लागले असले तर त्यांचेंही उच्चाटन करावें अशीं मतें प्रचलित आहेत.

जाहागीरदारी पद्धतीमुळें इतर स्थानिक लोक कनिष्ठ दशेस पोहोचले आहेत. त्यांना अनेक आर्थिक, सामाजिक व राजकीय बंधनाने बांधून टाकलेलें आहे. जाहागीरदार हे समाजाचे पालक, नेते व सेवक ह्या बुद्धीने आपल्या वतनाचा व ठेवीचा उपयोग करीत नाहीत. जेथे जेथे ती पद्धत अस्तित्वांत आहे तेथील स्थानिक अनुभव त्या पद्धतीविरुद्ध आहे. आज आपल्याला फुकट खाणाऱ्या, निरुद्योगी व नीतिघातक लोकांचा उपयोग नाही. समाज वारसाचे व मिळकतीचे अधिकार मानतो म्हणून त्यांची आज प्रतिष्ठा आहे. पण त्यांच्यामध्यें समाजहितबुद्धि नसल्यामुळें ते समाजाचे शत्रू झाले आहेत. त्यांच्या अस्तित्वामुळें समाजांत असंतोष व कलह पसरत आहेत. तेव्हा ही परिस्थिति आपणास सुधारली पाहिजे. त्यांची नीति व परोपकारबुद्धि वाढविली पाहिजे अथवा त्यांचे हक्क व अधिकार कमी केले पाहिजेत. त्यांना समाजसत्तावाद्यांच्या नव्या सूरांपासून फार भीति आहे.

स्थानिक जीवनाचा व सार्वजनिक आरोग्याचा विशेष संबंध आहे. लोकांचें शारीरिक आरोग्य व आयुष्य उत्तम राहिलें पाहिजे. त्याकरतां अन्न व वस्त्र, हवा व पाणी, व्यायाम व विश्रांति, घर व व्यवसाय हीं चांगल्या प्रकारचीं असलीं पाहिजेत. त्याचप्रमाणें त्यांच्या घरांतील व गावांतील आरोग्य व स्वच्छता चांगली पाहिजे. त्यायोगें त्यांचें आयुष्य वाढतें व त्यांना व्यथा व व्याधि जडत नाहीत आणि त्यांची वृत्ति व कारभार उल्हसित राहतात. शरीराच्या आरोग्याकरतां गावांतील स्वच्छता व सफाई यांची विशेष आवश्यकता आहे. प्रत्येक मनुष्याला आपलें घर व

गांव स्वच्छ व आरोग्यदायी राहील अशा तऱ्हेने वागले पाहिजे. आपलें गांव हें एकप्रकारें आपलें कुटुंबच समजून स्वच्छतेचे व आरोग्याचे सर्व नियम पाळिले पाहिजेत. शौचकूप, केरकचरा, मैलामोरी, हवापाणी, आडविहिरी, तडागतळीं, रस्ते, गल्ल्यागटारें, घरबांधणी, घाणसांचणी, थुंकी, मूत्र, विष्टा, शेण, गोठे, उबकी इत्यादि संबंधीची स्वच्छतेच्या व आरोग्याच्या दृष्टीनें विशेष काळजी घेणें हें अत्यावश्यक आहे.

नागरिकांचें सौख्य नुसत्या उत्तम आर्थिक अथवा राजकीय दर्शेत नसून, त्यांच्या शरीराच्या आरोग्यांत व आयुष्यवर्धनांत आहे. अकालीं मरण, शरीरकृशता आणि व्यथा व व्याधि यांच्या योगें मनुष्याचें जीवित दुःखी व असह्य होतें आणि त्याची बाधा त्याच्या कुटुंबाला व समाजाला सर्व प्रकारें भोगावी लागते.

ग्रामापेक्षा नगरांतील आरोग्य राखणें अधिक कठीण पण अधिक आवश्यकतेचें आहे. तेथे लोकसंख्या दाट असते, अस्वच्छता अधिक वाढते, रोगराई लवकर फैलावते. आणि घरें दाटीने बांधलेलीं असतात त्यामुळें हवापाणी बिघडतें, केरकचरा व घाण सांचते व जिकडे तिकडे पसरते आणि त्यामुळें त्या जागेचें व लोकांचें आरोग्य बिघडतें.

त्याकरितां लोकांना आरोग्याचें शिक्षण दिलें पाहिजे आणि त्याचे नियम कडक रीतीने अमलांत आणले पाहिजेत. नगरसभेने व अधिकाऱ्यांनी हें आरोग्यरक्षणाचें कठोर कर्तव्य भीडभाड न धरतां व लांच लुचपत न खातां केलें पाहिजे. अडाणी व निष्काळजी लोकांना त्याबद्दलची जाणीव शिक्षणाने व व्याख्यानद्वारें व प्रदर्शनद्वारें करून द्यावी आणि आरोग्याचे नियम प्रत्येकाला पाळावयास लावून ते मोडणाऱ्यांना कडक शासन करावें. असें केलें तरच समाजांतील वैयक्तिक व सामुदायिक आरोग्य टिकेल. त्याचप्रमाणें समाजांतील सुशिक्षित व परोपकारी लोकांनी व समाजसेवकांनीं लोकमत अनुकूल करण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे. पूर्वीच्या आरोग्यघातक चालीरीती व समजुती घालवावयाचा उद्योग केला पाहिजे.

समाजाच्या आरोग्यामध्यें व व्यक्तीच्या दीर्घायुष्यामध्यें त्यांची राहणी व संस्कृति दृग्गोचर होते. रोमी लोक, रोगट हवा, रोगांच्या

साथी, अकालीं मरणाचें अधिक प्रमाण, इत्यादि गोष्टींचा प्रतिबंध करणें लोकांचें व लोकसत्तेचें आद्य कर्तव्य आहे. औषधालयें व रुग्णालयें स्थापणें, रोगांचा शोध करणारीं कार्यालयें ठेवणें, वैद्य गावोगाव नेमणें, आरोग्याकरितां नियम व कायदे करणें, गाव सुधराई व सफाई करणें, आरोग्यविषयक प्रदर्शनें भरविणें, व्याख्यानरूपाने व चित्ररूपाने माहिती देणें व उपदेश करणें, आरोग्यपद्धतीबद्दल चर्चा करणें, आरोग्याच्या शाळा व मंडळें काढणें, आरोग्याची देखरेख करणारा अधिकारी व सेवकवर्ग ठेवणें, आरोग्याच्या ज्ञानास अनुसरून प्रत्येक गांवाची भावी रचना ठरविणें व हळूहळू ती अमलांत आणणें, आदर्श घरें, रस्ते व राहणी दाखविणें, परिचारकांचा वर्ग तयार करणें इत्यादि गोष्टी लोकसंस्थांनी व राज्यसंस्थांनी करावयास पाहिजेत, म्हणजे नागरिकजीवन सुखावह होईल लोकांचें आयुष्य वाढेल आणि ते पूर्णायुषी होऊन आपल्या आयुष्याचें सार्थक करतील.

---

## प्रकरण अकरावें

# राजकीय जीवन

राजकीय जीवन मनुष्याला आवश्यक आहे. राज्यसत्तेच्या योगाने त्याला शांतता व स्वस्थता, स्वातंत्र्य व सुस्थिति प्राप्त होते व त्याचें रक्षण होतें. राज्य हें मूलतः मनुष्यसमाजाच्या रक्षणासाठी व शिस्तीसाठी उत्पन्न होतें आणि पुढे त्याचें स्वातंत्र्य व कल्याण साधण्याचें कार्य करतें. हें कार्य तें लोकांमध्यें सहकार्य घडवून आणून, निबंध, शासन व न्याय या रूपाने करतें. तें मनुष्याच्या जीविताचें, स्वातंत्र्याचें व वित्ताचें रक्षण करितें येवढेंच नव्हे तर त्याच्याकरतां अनुकूल परिस्थिति निर्माण करतें आणि त्याच्या व्यापक हिताकडे पाहतें.

**राज्य** (State) हा शब्द सध्या सुसंघटित समाजाच्या राजकीय स्वरूपाला लावतात. राज्य म्हणजे राजकीय हेतूसाठी एकत्रित व संघटित

झालेल विशिष्ट प्रदेशांत सामावलेला लोकसमाज होय. 'राजकीय हेतु' याचा' अर्थ मुख्यत: लोकांचें व प्रदेशाचें रक्षण करणें व त्यांची स्वस्थता व स्वातंत्र्य राखणें, हा होय. त्या दृष्टीने राज्याची घटना व शासनव्यवस्था केलेली असते. तें आपल्या लोकांच्या सर्वसाधारण व सार्वत्रिक हितसंबंधांना जपतें. सामान्यत: त्याच्या प्रदेशांत वस्ती करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीवर नियंत्रण घालतें आणि त्यांच्या व्यवहारांचें नियमन करतें.

राज्याच्या आधारभूत गोष्टी म्हटल्या म्हणजे (१) लोक, (२) प्रदेश, (३) ऐक्य भावना, (४) स्वातंत्र्य भावना व (५) संघटना. राज्य शब्दांतील मुख्य कल्पना ही जाति, धर्म, भाषा किंवा संस्कृति यासंबंधाची नसून, ती एका विशिष्ट मनुष्यवती भूमीवर अधिकार व शासन चालविणाऱ्या सत्तेसंबधींची आहे. त्यांतील लोक त्या सत्तेच्या योगाने आत्मरक्षणासाठी आणि स्वातंत्र्य, शांतता व सुव्यवस्था यासाठी एकत्र झालेले व एकवटलेले असतात. राज्य ही मुख्यत: प्रादेशिक व राजकीय कल्पना असून त्यांत मनुष्याच्या निरनिराळ्या कार्यांची व कार्यक्षेत्रांची व्यवस्था लावणाऱ्या एकसूत्री व परस्परोपकारक राजकीय संस्थांचा अंतर्भाव होत असतो.

राज्याचे उद्देश, कार्य, कारभार व शासन हीं राज्यतंत्र पार पाडतें. राज्यतंत्र हें राज्याचें अनुशासन मंडळ होय. त्यामध्यें मुख्य सत्ता एक किंवा अनेक अधिकारी व्यक्तींची असते. तिच्याकडे राज्याचा नियामक,निर्णायक व नियंत्रणात्मक कारभार सोपविलेला असतो. राज्यतंत्राचीं कारभार करण्याचीं अनेक अंगें व अनेक संस्था असतात.

राज्याचें स्वरूप निरनिराळया ग्रंथकारांनी निरनिराळया प्रकारें सांगितलें आहे. कोणी त्याला निर्बंध घालणारी व शासन करणारी सत्ता म्हटलें आहे, तर कोणी त्याला समाजाची संघनाटमात्मक शक्ति मानलेलें आहे. कोणी त्याला लोकशिक्षण देणारी संस्था ठरविली आहे तर कोणी त्याला सर्वांहून श्रेष्ठ व स्वतंत्र इच्छाशक्ति असलेली दैवी प्रेरणेची व कल्याण साधणारी संघटना असें मानिलें आहे. ह्या प्रत्येक लक्षणाची त्या त्या प्रवर्तकांनी ऐतिहासिक किंवा तात्त्विक आधारानुसार चर्चा करून, त्या प्रत्येकाचें पूर्ण समर्थन केलें आहे. पण राज्य ह्या संस्थेचें निरनिराळ्या ऐतिहासिक परिस्थितीमध्यें आपण परीक्षण केल्यास आपल्यास असें

आढळून येईल की ह्यांपैकी प्रत्येक लक्षण राज्याच्या एकंदर स्वरूपाच्या कोणच्या तरी एका अंगाला प्रामुख्य देऊन ठरविलें आहे.

अर्वाचीन कालांत जीवनाच्या सर्व हालचालींवर व व्यवहारांवर राजकारणाचें वर्चस्व झालें आहे. आणि राजसत्तेला अंतिम निर्बंधप्रणेत्याचें व दंडधराचें स्थान व अधिकार प्राप्त झाले आहेत. प्राचीन काळीं राजसत्तेला केवळ सुव्यवस्था राखणारी संस्था मानीत असत. तिला निर्बन्ध (कायदे व वागणुकीचे नियम) घालण्याचा अधिकार नव्हता.नुसता निर्बन्धकारांनी घालून दिलेल्या किंवा परंपरेने चालत आलेल्या नियमनिर्बन्धांप्रमाणे कारभार पाहण्याचा व समाजव्यवस्था व नियम मोडणाऱ्यास शासन करण्याचा तिला अधिकार होता. कांही काल राज्यसत्तेचें अधिष्ठान मुख्यत: बळावर होतें, लोकांच्या संमतीवर तें तितकें नव्हतें. इतर काळीं लोकसंमतीचा पाठिंबा असला तरच तिला बळाचा उपयोग करतां येई. कधी कधी तिच्या पोषणात्मक व शिक्षणात्मक स्वरूपाला महत्त्व दिलें जाई, तर इतर वेळीं तिच्या प्रतिबंधात्मक संरक्षणात्मक कार्यांना मान्यता मिळे. कांही लेखकांनी राज्यांत अंतर्भूत असलेल्या व्यक्तींहून भिन्न असें राज्याला स्वतंत्र व्यक्तित्व आहे आणि इच्छाशक्ति असलेल्या सचेतन व सेंद्रिय पदार्थाशीं त्याचें साम्य आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे व त्याला स्वतंत्र व संघटनात्मक व्यक्तित्व दिलें आहे. इतरांनी त्याला व्यक्तींना एकत्र करण्याचें, त्यांच्या शक्ति एकवटण्याचें व त्यांच्या इच्छा पार पाडण्याचें केवळ साधन मानलें आहे. कांही तत्त्वज्ञ राज्याला लोकांच्या व्यक्तिगत इच्छांहून थोर इच्छा असलेली आणि अत्यंत सद्‌गुणी व न्यायी, सर्वोत्तम व सर्वोच्च, अनियंत्रित इच्छाशक्ति असलेली, अतिमानुष, समष्टिरूप संस्था मानतात. त्यांत व्यष्टिरूपी व्यक्तींना गौणत्व असून, त्यांना स्वतंत्र अस्तित्व व महत्त्व नाही. इतर तत्त्वज्ञ राज्याला केवळ एक कार्य संपादण्यासाठी स्थापलेलें मंडळ किंवा केलेली योजना, आणि आपल्या संयोजक, नियामक आणि शासनात्मक शक्तीच्या सामर्थ्यावर सामाजिक ऐक्य राखणारें एक साधन समजतात. अशा रीतीने राज्याच्या स्वरूपाच्या निरनिराळ्या लक्षणांना निरनिराळ्या काळीं आलेल्या प्राधान्यामुळें किंवा लेखकांच्या अनुभवाप्रमाणें किंवा प्रवृत्तीप्रमाणें महत्त्व देण्यांत आलें आहे.

राज्य हें साध्य कां साधन ह्याबद्दल भिन्न मतें आहेत. राज्यावाचून मनुष्यसमाज टिकूं शकत नाही. तें त्याच्या जीवनक्रमाचें व रक्षणाचें एक प्रमुख साधन आहे. तेव्हा चांगलें राज्य असणें हें मनुष्यसमाजाला आवश्यक आहे. तरीपण राज्य हें त्याचें मुख्य साध्य होऊं शकणार नाही. त्यामध्यें त्याचें अनेकांगी जीवन व्यक्त व समाविष्ट होऊं शकत नाही. आदर्शभूत राज्याची त्याला आवश्यकता असली तरी त्याच्या सत्तेनेच तो सद्‌गुणसंपन्न व उदात्त होतो असें नाही. मनुष्याचे अनेक पुरुषार्थ आहेत आणि ते राज्यसंस्थेव्यतिरिक्त अनेक इतर संस्थांच्या व संबंधांच्या योगें प्राप्त होतात. राज्य हें समाजाचें एक अंग व शक्ति आहे व त्याचें रक्षणाचें व नियंत्रणाचें एक कार्य आहे. समाजाचा उद्देश मनुष्याच्या हिताचें रक्षण करून त्याच्या गुणांचा व इच्छांचा उत्कृष्ट परिपोष करण्याचा आहे. तेव्हा समाजाला राज्याचा केवळ एक गौण घटक बनून चालणार नाही. जर राज्याला अंतिमतः मनुष्यापेक्षा अधिक श्रेष्ठ स्थान दिलें तर त्याचें व्यक्तिवैशिष्टय आणि आत्मिक अथवा नैतिक स्वातंत्र्य नामशेष होईल आणि त्याचें वर्तन व व्यवहार ठराविक स्वरूपाचे व विवेकशून्य होतील. वास्तविक, मनुष्य हा, त्यानेच स्थल, काल व कार्य यांना अनुसरून निर्माण केलेल्या संस्थांपेक्षा केव्हाही श्रेष्ठ आहे. संस्था त्याच्याकरितां आहेत. तो संस्थांकरितां नाही.

राज्य ( State ) व राष्ट्र (Nation) ह्या समानार्थक संज्ञा नाहीत. राज्य हें क्षेत्रमर्यादानिबद्ध संघटित व स्वतंत्र लोकसमाजाचें नुसतें राजकीय स्वरूप आहे. त्याला जगाच्या राजकीय व्यवहारांत समान, स्वतंत्र व नित्य स्थान व मान आहे.

राष्ट्र हें सुसंघटित लोकसमाजाचें राजकीय, सांस्कृतिक व नैतिक स्वरूप आहे. त्याला स्वतंत्र, समान ऐक्याच्या भावना असतात. त्याचा गत इतिहास, वर्तमान जीवन व भावी आकांक्षा हीं विशेष प्रकारचीं असतात. राष्ट्र ही ऐतिहासिक व नैतिक ह्या दोन्ही रीतींनी घडलेली एकात्मक संघटना आहे. ऐतिहासिक दृष्टीने राष्ट्राची जोपासना त्यांतील आर्थिक, राजकीय व बौद्धिक घटनांच्या योगें होते. एकराष्ट्रत्वाची भावना ही मनुष्यांनी एके ठिकाणीं राहून समाईकपणाने केलेलें श्रमसाहस, भोग-

लेल्या आशा-आकांक्षा, सोसलेलीं सुख-दुखें व पाहिलेले परीक्षा-प्रसंग, ह्यांच्यायोगें दृढ होते. त्यांच्या गत इतिहासामुळें त्यांच्यामध्यें उत्पन्न झालेली आत्मीय भावना हीच त्यांचें खरें नैतिक बंधन व बल होय. राष्ट्र हें बहुतांशीं एक भावनात्मक सत्य आहे तर राज्य हें व्यावहारिक सत्य आहे.

नुसत्या वंशाच्या, धर्माच्या, भाषेच्या, देशाच्या किंवा सत्तेच्या एकत्वावर अथवा सारखेपणावर संघटित राष्ट्राची उभारणी होत नाही. त्यांचें त्याला मोठें साहाय्य होतें. पण तीं मुख्य अथवा मूळ लक्षणें होऊं शकत नाहीत. तीं असून सुद्धा जर त्या लोकांमध्यें ऐक्याच्या समान भावना व नीति आणि एकत्र सहवासाच्या व सहकाराच्या गत गोष्टी, वर्तमान प्रसंग व नवीन आकांक्षा नसतील तर त्यांच्यामध्यें राष्ट्रीय भावना व संस्था उत्पन्न होणार नाहीत. अशीं नैतिक व व मानसिक बंधनें स्थलाच्या सान्निध्यानें, ऐतिहासिक घडामोडीनें व ध्येयांच्या एकरूपतेनें उत्पन्न होतात. खरें राष्ट्रबंधन व राष्ट्रबल हीं राष्ट्रामध्यें असणारी समानहिताची भावना, त्यानें एकत्र भोगलेलीं समान सुखदुःखें, आणि त्याच्यावर येणारे समान प्रसंग व परिस्थिति यांच्या योगानें प्राप्त होतात. त्यांतील लोकांमध्यें आपण एकच होतों व आहों व राहूं अशी बळकट भावना पाहिजे.

सांप्रत राष्ट्र हा प्रादेशिक व राजकीय ऐक्याची जाणीव झालेल्या आणि एकत्र राहण्याची समान आवड व एकत्र प्रगतीविषयीं समान इच्छा निष्ठा बाळगणाऱ्या लोकांचा समाज समजला जातो. राष्ट्राचीं मुख्य लक्षणें म्हटलीं म्हणजे (१) एक प्रदेश, (२) एक राज्यतंत्र, (३) एकतेची भावना, (४) स्वातंत्र्याची भावना, (५) समानतेची नीति, (६) देशप्रेम, व (७) विशिष्ट दृष्टि व ध्येयें, हीं होत.

राष्ट्रांतील अथवा राज्यांतील जनता म्हणजे एका जातीचे अथवा धर्माचे अथवा भाषेचे लोक नव्हेत. विशिष्ट क्षेत्रमर्यादेंत ऐक्याच्या अथवा आपलेपणाच्या भावनेनें राहणारे सर्व लोक जनतेमध्यें येतात. ती त्या राज्याची प्रजा होय.

ज्या देशांत आपण व आपले वाडवडील जन्मलों व वाढलों व जेथें आपले पुत्रपौत्र जन्मणार, वाढणार व राहणार तो आपला स्वदेश. जेथें आप-

णास अन्नवस्त्र, हवापाणी, घरदार, औषध-आराम मिळतो आणि जेथें आपले व्यवसाय व व्यवहार, श्रम व साहस, आशा व आकांक्षा सुलभतेने चालतात तो आपला स्वदेश. स्वदेश ही नुसती भौगोलिक कल्पना किंवा रचना नव्हे. तो आपल्या पूर्वजांच्या अनेक पिढ्यांनी व त्यांतील पुढाऱ्यांनी निर्माण केलेली एक मानसिक व नैतिक घटना आहे. ती देशाच्या नैसर्गिक सीमा, सुपीकता व संपत्ति आणि मनुष्यनिर्मित सत्ता, स्वातंत्र्य, संघटना, सहकार व संस्कृति, या सर्वांचें एकत्रित व संकलित फळ आहे. एकाच प्रकारच्या आर्थिक व राजकीय घटना असलेला एका प्रकारच्या ऐतिहासिक व सांस्कृतिक भावनांशीं निबद्ध असलेला जो प्रदेश तो त्या त्या लोकांचा स्वदेश होय.

स्वदेश हा जसा आपला व आपल्या पूर्वजांचा तसाच तो आपल्या वंशजांचा आहे व राहिला पाहिजे. त्याचें रक्षण, त्यांतील लोकांचें स्वास्थ्य-संपादन, पोषण व सुखवर्धन हीं प्रत्येक पिढीच्या हातून झालीं पाहिजेत. आपले सर्व उपभोग व आवश्यकता तेथेच भागतात. आपल्या पूर्वजांच्या कर्तृत्वाची स्मृति व स्मारकें तेथेच उभारलेलीं असून आपल्याला प्रोत्साहन देत असतात. आपल्या कला, विद्या व शास्त्रें यांचें उगमस्थान व निवासभूमि तोच आहे. तो वंशपरंपरेने आलेला आपला आर्थिक, नैतिक व आध्यात्मिक वारसा, मिळकत व ठेव आहे. त्याचें स्वातंत्र्य व मान राखून तो आपणास वाढविला व सुधारला पाहिजे. त्याच्या स्वातंत्र्यावर, मोठेपणावर व बलिष्ठतेवर आपणांस जगांत स्थान व मान आहे.

स्वदेशी व स्वदेशप्रीति ह्या आपल्या देशाची सीमा, सत्ता, स्वास्थ्य, संपत्ति, स्वातंत्र्य, संस्कृति व विद्याकला यांचें रक्षण व वाढ करणाऱ्या उत्कट भावना आहेत. त्या स्वाभाविक व योग्य आहेत. आपल्या कुटुंबाप्रमाणें आपण आपल्या स्वदेशाकडे पाहिलें पाहिजे आणि त्याच्या हीन दीन स्थितींत व संकटकालांत त्यच्याकरतां स्वर्थत्याग व कौटुंबिक सुखाचा त्याग केला पाहिजे. त्याचें रक्षण, हित व भरभराट यांमध्यें आपलें खरें रक्षण, हित व भरभराट आहे. त्याच्या ऱ्हासामध्यें आपल्या सर्वस्वाचा नाश आहे. मात्र आपल्या देशाचीं ध्येयें, निर्बंध, वर्तन व व्यवहार नीतीचे, न्याय्य व प्रगतिपर ठेवले पाहिजेत.

जो आपल्या देशाचें स्वातंत्र्य व संस्कृति यांचें रक्षण व वाढ करतो, आणि तद्विशिष्ट नीति व निर्बंध यांचें पालन करतो, तो खरा देशभक्त अथवा नागरिक होय. स्वदेशाच्या आपत्कालीं आपले स्वतःचे कौटुंबिक, जातीय, धार्मिक, आर्थिक व बौद्धिक व्यवहार व कर्तव्यें एकीकडे ठेऊन तो त्याच्याकरतां आपलें तनमनधन व आपला वेळ अनन्यभावें अर्पण करतो व त्याची सेवा करतो, तो खरा देशभक्त व उदारचरित नागरिक होय. त्याच्या चांगल्याकरतां त्याचें मन अहर्निश तळमळतें व त्याचें हृदय हेलावतें.

**राजनीतिशास्त्र** हें मनुष्याच्या राजकीय जीवनाचा अभ्यास करतें. तें राज्याचा योग्य अर्थ व क्षेत्र, त्याची आवश्यकता व उदय, त्याचा स्वभाव व स्वरूप, त्याचीं अंगें, व्यवस्था व प्रकार, त्याच्या संस्था व संघटना, या सर्वांचा विचार करतें. आणि त्याबरोबरच मनुष्य हा राज्याचा एक प्रजाजन ह्या नात्याने त्याच्या सामुदायिक जीवनाशीं राज्यसत्तेचा काय संबंध आहे हें दाखवितें. त्यामध्यें त्याचे व राजसत्तेचे संबंध आणि परस्परांचीं परस्परविषयक अधिकार–कर्तव्यें यांचेंही विवेचन येतें. (मागें पृ. १८ व पृ. ३८ पहा.)

कोणत्याही राजकीय समाजाला सध्याच्या कालांत त्याची लोकसंख्या सापेक्षतः मोठी असल्यावाचून बाहेरील संकट व परचक्र यशस्वितेने रोखतां येत नाही आणि आंतील सुस्थिति व संघटना नीटपणें राखतां येत नाही. राज्य हें आजकालच्या परिस्थितींत परकीय आक्रमणाचा व अंतःस्थ यादवीचा प्रतिकार करावयाला समर्थ असलें पाहिजे.

पूर्ण वाढीला पोचलेल्या राज्यांत राज्यसत्ता ही एकत्रित झालेली व नियमाने चालणारी पाहिजे. समाजाचें संघटित सामर्थ्य तिच्या हातांत पाहिजे. तिच्या शासनाला राज्यामध्यें विरोध व व्यत्यय नसला पाहिजे आणि तिचा अधिकार पूर्ण व अव्याहत राहून नियमानुसार चालला पाहिजे. परिणत स्थितींतलें राज्य सामान्यतः निर्बंधाच्या द्वाराने व ठराविक पद्धतीने आपलें शासन चालवितें. राज्यसत्ता ही आपल्या आंतील किंवा बाहेरील व्यवहारांत अनियमित व अनियंत्रित कृत्यें आपत्कालावाचून करीत नाही. आंतील कारभारांत निर्बन्धाचें (कायद्याचें) साम्राज्य परिपूर्ण असतें व

त्यायोगें नागरिकांचे अधिकार व कर्तव्यें योग्य रीतीने पाळलीं जातात. राज्यसत्तेच्या परराष्ट्रीय व्यवहारासंबंधाने सुद्धा सांप्रत कांही आंतरराष्ट्रीय निर्बंध व नियम आहेत. आज राष्ट्रसंघाच्या रचनेनें त्यांचें पालन व वाढ हीं होत आहेत.

आधुनिक काळांतील प्रत्येक उन्नत राजकीय समाजाला उच्च नैतिक कल्पनांचा व नियमांचा आधार पाहिजे. तो समाज सुधारलेला व सुधारणाक्षम पाहिजे. त्याच्यामध्यें सार्वजनिक व जागतिक हिताकरतां नैतिक बंधनें व नियम पाळण्याची भावना व तत्परता पाहिजे; आणि कालानुसार उगम पावणाऱ्या नवोनव नीतिकल्पना आत्मसात करण्याइतकी ग्रहणक्षमता पाहिजे. कारण, त्यावांचून चिरस्थायी स्वरूपाची अंतर्गत शांतता आणि परराज्यांशीं मित्रत्वाचे संधि व संबंध हीं अशक्य आहेत.

आधुनिक राज्यें परस्परांपासून तुटक व स्वयंपूर्ण राहूं शकत नाहीत. त्यांचे राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक संबंध व व्यवहार परस्परांशीं नित्यशः जडत व घडत असतात. सांप्रत मनुष्याचे सर्व संबंध व व्यवहार नुसते जाति अथवा राष्ट्र यांच्या मर्यादांनी निबद्ध राहिले नसून ते जागतिक झाले आहेत. एकमेकांच्या सुखांत, शांततेंत व हितांत त्यांची भागी व निकट संबंध असतात. यायोगें निरनिराळ्या राज्यांत सहकार व परस्परावलंबित्व उत्पन्न होतें. त्यामुळें त्यांना योग्य वळण लावण्यास कांही नीतिनिर्बंधांची आवश्यकता उत्पन्न होते. पण ते एकतंत्राने रचण्याला व अमलांत आणण्याला सर्व राज्यांना वरिष्ठ अशी, सर्वसामान्य व सर्वांना सारखें वागविणारी जागतिक अधिसत्ता सांप्रत अस्तित्वांत नाही. त्यामुळें प्रत्येक स्वतंत्र राज्य आपल्या स्वदेशी कारभारांत व परदेशीय व्यवहारांत पूर्णपणें सारखें अधिकारी समजलें जातें.

असें जरी आहे तरी राज्याराज्यांतील संधि, विग्रह व उदासीन या तीन्ही स्थितींतील व्यवहारांना वळण लावणारे कांही नीतिनियम व तत्त्वें आज प्रौढ राज्यांनी मान्य केलीं आहेत. त्या तत्त्वांना व नीतिनियमांना **आंतरराष्ट्रीय निर्बंध** (International Law) अशी संज्ञा आहे. ते राज्याराज्यांतील व्यवहारांना मार्गदर्शक झाले आहेत. त्यांनी राज्यांचें स्वातंत्र्य जाऊं न देतां त्यांच्यावर कांही स्वखुषीचीं व सामान्य बंधनें घात-

लीं आहेत. त्यांच्या पाठीमागें दंडधारी नैर्बंधिक सत्ता नाही. ते केवळ नैतिक अथवा उपयुक्ततेचे नियम आहेत.

आंतरराष्ट्रीय निर्बंध मानणाऱ्या एके ठिकाणीं आलेल्या राज्यांना एक राष्ट्रसंघ असा मानतात. त्या सर्वांच्या सल्लामसलतीने परिषदेमध्यें हे निर्बंध ठरविले जातात. नंतर प्रत्येक राज्य त्यांचा पूर्णपणें विचार करून त्यांना मान्यता देतें.

परराज्यामध्यें आपले राजकीय व आर्थिक हितसंबंध जपण्यासाठी प्रत्येक राज्याचे प्रतिनिधि, दूत व वकील नेमलेले असतात; आणि स्वराज्यामध्यें परराष्ट्रीय धोरण बांधणारा व संभाळणारा एक मंत्री असतो. त्याच्या द्वारें परराष्ट्रीय धोरण चालतें आणि संबंध व व्यवहार घडतात.

आंतरराष्ट्रीय नियमांच्या योगें राज्याराज्यांच्या व्यवहारांत व हितसंबंधांत कांही स्थैर्य, समंजसपणा व माणुसकी उत्पन्न होते. त्या नियमांचे मुख्य उद्देश कलह कमी करणें, युद्धाव्यतिरिक्त मार्गांनी पंचायतीद्वारा भांडणें मिटविणें, युद्धामध्यें शक्य तितकी माणुसकी ठेवणें, युद्धामध्यें पकडलेल्या व दुखावलेल्यांना चांगलें वागविणें, राज्यांच्या सीमा, समुद्रांतील स्वातंत्र्य, युद्धकाळांत मालाची व मनुष्याची हालचाल, परराष्ट्रांतील नागरिकांचें स्वातंत्र्य व बंधनें याबद्दलचे नियम करणें--अशा प्रकारचे असतात.

सांप्रत राष्ट्रसंघाच्या स्थापनेने ह्या गोष्टी यथासांग होत आहेत. १९१९च्या व्हेर्सायच्या संधीनें स्पष्ट ठराव करून राज्याराज्यांतील तंटे मिटविण्याकरतां, अडचणीचे प्रश्न सोडविण्याकरतां व शांतता राखण्याकरतां आणि त्यांच्यामध्यें मैत्री व सहकार वाढविण्याकरतां ही 'राष्ट्रसंघ' नांवाची संस्था निर्माण केली आहे. तिचे उद्देश व अधिकार बहुतेक सर्व स्वतंत्र राष्ट्रांनी मान्य केले आहेत. त्यामुळें युद्धें व भांडणें यांना थोडा आळा पडला आहे व निरनिराळ्या राज्यांमध्यें आर्थिक, राजकीय आणि मानवी हिताच्या आरोग्यात्मक व सामाजिक बाबींत सहकार उत्पन्न होत आहे. कामगार लोकांचे, शिक्षणाचे, रोगांचे, व्यसनांचे, गुलामांचे, मागासलेल्या देशांचे प्रश्न हातीं घेऊन ते सोडविण्याचा राष्ट्रसंघ काळजीपूर्वक प्रयत्न करीत आहे.

आंतरराष्ट्रीय निर्बन्धाच्या व व्यवहाराच्या दृष्टीने प्रत्येक राज्य हा स्वतंत्र घटक आहे. त्याला स्वतःचें स्वतंत्र स्थान आहे व त्याने इतर राज्यांशीं केलेल्या तहसलोख्याबद्दल तें वचनबद्ध आहे. ही त्याची नैतिक जबाबदारी त्याच्या शासनपद्धतींत फेरबदल झाला अथवा देशांत क्रांति झाली तरी जात नाही. ह्यामुळें राज्याराज्यांचे परस्पर संबंध रक्षिले व संपादिले जातात व त्यांना कांही तरी शाश्वतता येते.

आंतरराष्ट्रीय व्यवहारांत राज्यें हीं समान योग्यतेचीं व स्वतंत्र समजलीं जातात, मग त्यांची राज्यपद्धति व त्यांचे अंतर्गत व्यवहार कोणत्याही प्रकारचे असोत. त्यांनी इतर राज्यांशीं मात्र आपलीं वचनें व कर्तव्ये, संधि व संबंध पत्करलेल्या नियमाप्रमाणें व केलेल्या कराराप्रमाणें चालविले व पाळले पाहिजेत. राज्याच्या अंतर्गत व्यवहाराच्या व पद्धतीच्या न्याय्यान्याय्यतेशीं आंतरराष्ट्रीय निर्बंधाचा संबंध नसतो. म्हणजे ज्या प्रकारांनी राज्यपद्धतीची स्थापना झाली त्या नीतिदृष्टया समर्थनीय होत्या काय, तिचे शासनाचे मार्ग व प्रकार न्यायाला धरून आहेत की नाहीत किंवा तिच्या राजकीय उद्देशांना नीतीचा आधार आहे की नाही ह्या गोष्टी ते पाहत नाहीत.

निरनिराळ्या राष्ट्रांच्या व वंशांच्या लोकांमध्यें परस्परांबद्दल अधिक माणुसकी, सहानुभूति, सहिष्णुता व सख्य निर्माण झालें पाहिजे. वंशद्वेष व वर्णद्वेष अजून बऱ्याच अंशाने व बिकट रूपाने अस्तित्वांत आहे. विशेषतः युरोपीय गोऱ्या लोकांमध्ये त्याचा अतिरेक झाला आहे. पूर्वी धर्मद्वेष अति होता तो आतां कमी झाला आहे. पण त्याऐवजी जातिद्वेष, वर्णद्वेष व राष्ट्रद्वेष येऊन बसला आहे. बऱ्याच गौरेतर लोकांचें जीवित व भवितव्य हीं आज गोऱ्या लोकांच्या हातांत गेलीं आहेत. त्यांनी जगांतील सर्व लहान मोठे देश, बेटें व खंडें आपल्या राजकीय सत्तेने व्यापल्यामुळें तेथील साधनें व संपत्ति, तेथील लोक व त्यांचे व्यवसाय, व्यापार, जमीन, राज्यव्यवस्था व कारभार हीं त्यांच्या हातांत गेलीं आहेत. तीं त्यांनी साहजिकपणेंच स्वहितार्थ वापरलीं व राबविलीं आहेत. तेव्हा ह्या वर्णद्वेषाच्या जोडीला स्वार्थ, सत्ता व संपत्ति आल्यामुळें गौरेतरांची स्थिति सर्व प्रकारें अनुकंपनीय झाली आहे. त्यांच्या

देशांत वसाहत करून त्यांना वाईटपणाने वागविणें आणि दुसरीकडे वसाहत करूं न देणें, अशा अनेक प्रकारांमुळें गौरेतरांची स्थिति खालावलेली आहे. एक उदाहरण घ्यावयाचें म्हणजे निग्रोंचें व आफ्रिका खंडाचें आहे. तद्वतच इतर लोकांची व देशांची स्थिति आहे. त्याच्यामध्यें नुसता वर्ण द्वेष नाही, तर संस्कृतीच्या भिन्नत्वाचा द्वेष, आर्थिक स्पर्धा व सत्तास्वातंत्र्याबद्दल असूया आहे. या परपीडक भावनांचा जोर व प्रभाव कमी करणें प्रत्येक देशांतील नागरिकाचें कर्तव्य आहे.

जगाच्या प्रगतीबरोबर लोकांच्या एकीकरणाच्या कल्पना व क्रिया वाढत आहेत. टेलेग्राफ, टेलेफोन, रेडिओ, वाफेच्या व विजेच्या आगगाड्या, नौका, विमानें, बोगदे, पूल या साधनांनी, व्यापार, धर्म, राजाकारण, वाङ्मय, शास्त्रें यांच्या प्रसाराने आणि मानवजातीची एकी, समता व बंधुता या कल्पनांनी जगांतील भिन्न लोकांचें संघटन व सख्य हीं वाढत आहेत.

जगाची भाषा एक नाही. तेव्हा त्याच्या सामान्य व्यवहाराला एक सामान्य भाषा हळूहळू मान्य झाली पाहिजे. त्यायोगें विचारविनिमयाला व आचारव्यवहाराला सौकर्य प्राप्त होईल. आज जगाचें आर्थिक व राजकीय हित अन्योन्याश्रयी झालें आहे. एका ठिकाणचें आर्थिक दुःख व दारिद्र्य अथवा राजकीय हालचाल व क्रांति, हीं इतर ठिकाणच्या परिस्थितीवर परिणाम करतात. तेथील व्यापारी व धंदेवाले, मंत्री व मुत्सद्दी, त्यामुळें अस्वस्थ होतात. एका ठिकाणचा शास्त्रीय शोध किंवा नवें यंत्र दुसऱ्या ठिकाणचें आर्थिक व राजकीय स्थैर्य बिघडवूं शकतें. एका ठिकाणची नवी सामाजिक, राजकीय, आर्थिक व्यवस्था किंवा विचारक्रांति दुसऱ्या ठिकाणीं असंतोष, अस्वस्थता, बंडें, क्रान्त्या अथवा नवी चळवळ घडवून आणते.

आपसांतील भिन्नत्व, विरोध व द्वेष हीं मूळचीं व निरंतरचीं नसून, तीं स्थल, काल व कार्य यांच्या योगाने निर्माण झालेलीं आहेत. तीं विसरून आपल्या मधील साम्याचीं, सख्याचीं व सुखाचीं सूत्रें व धागे शोधणें आणि त्यांच्या स्थैर्याकरतां व वाढीकरतां नवे उत्साहाचे, उपकाराचे व सहकारित्वाचे मार्ग पत्करणें, हें आज विश्वकुटुंबीयांचें, उदार

चरितांचें, सत्पुरुषांचें व तद्वत् सामान्य नागरिकांचें कर्तव्य आहे. आपल्याला स्वतंत्रता, समता, बंधुता, न्याय, लोकसत्ता, सदाचार, सहकार, ज्ञान, विद्या व शास्त्रें यांच्या प्रसाराने लोकांतील द्वेष, विरोध, कलह, युद्धें हीं नाहीशीं केलीं पाहिजेत आणि त्यायोगें

अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम् ।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम् ।।

अशी वृत्ति व भावना आणि त्याप्रमाणें आचार व व्यवहार घडवून आणिला पाहिजे.

---

## प्रकरण बारावें

# राज्यतंत्र

राज्याचा कारभार ज्या संघटित संस्थेच्या द्वारें व्यवस्थेने चालतो त्याला राज्यतंत्र म्हणतात. राज्याचें धोरण व व्यवहार चालविणें आणि संघटना व संस्था रक्षण करणें हीं कामें राज्यतंत्र करतें. तें एका राजाच्या हातीं असो किंवा अनेक लोकनियुक्त प्रतिनिधींच्या व लोकसंमत मंत्र्याच्या हातीं असो, त्याच्यावांचून राज्याची व्यवस्था व कार्य पार पडणें शक्य नाही. राज्यतंत्र व राज्यांतील प्रजा हीं राज्याचीं दोन मुख्य अंगें आहेत. राज्यतंत्र नसलें तर राज्यामध्यें चोहीकडे अशांतता माजेल. मात्स्यन्यायाप्रमाणें बलिष्ठ दुर्बळांना छळतील व मारतील अथवा गुलाम करतील; आणि त्यांच्या वित्ताचें, शीलाचें व सत्त्वाचें रक्षण होणार नाही. मनु म्हणतात, "बलवद्भयाद्रक्षणार्थं राजानमसृजत् प्रभुः"–बलिष्ठांच्या भयापासून रक्षण करण्याकरतां राजा व राज्यतंत्र देवाने निर्माण केलें. रामायण व महाभारत या ग्रंथांमध्यें अराजकतेचे दुष्परिणाम ठिकठिकाणीं वर्णन केले आहेत. अराजकतेमुळें समाजधर्म नाहीसा होतो, 'बळी तो कान पिळी' अशी स्थिति होते, निर्बंध, नीति व नियम लयाला जातात आणि सामान्य लोकांना निर्भयता, सुरक्षितता, स्वातंत्र्य व सुख मिळत नाही. काल्पनिक भावी सत्ययुगाचें अथवा गत कृतयुगाचें स्वरूप कांहीही असो, आणि तत्त्वशास्त्र्या-

च्या नूतन समाजरजनेची परिणति कशीही होवो, ऐतिहासिक दृष्टीने आजपर्यंत राज्य चालविणाऱ्या राज्यतंत्राचें अस्तित्व व आवश्यकता दिसून येत आहे. अजून मनुष्यें पूर्ण सद्‌गुणी, धार्मिक, परोपकारी व परसहिष्णु झालीं नाहीत. त्यांच्यामध्यें षड्‌रिपु हे कांही अंशाने वास्तव्य करीत आहेत. त्यांची वृत्ति स्वार्थप्रेरित, सत्ताकांक्षी व संपत्तिलोलुप आहे. ते सर्व सामाजिक कारभार व व्यवहार स्वयंस्फूर्तीने, सलोख्याने व सत्प्रवृत्तीने करीत नाहीत. त्यांना नियंत्रणाची, नियंत्रणशक्तीची व निर्बंधाची म्हणजे दंडाची, दंडकाची व दंडनीतीची आवश्यकता आहे. व्यक्ति व समाज यांचे संबंध चांगले राहावे आणि त्यांचें कार्य व कारभार उत्तम चालावे म्हणून राज्यतंत्राची आवश्यकता आहे.

राजाच्या व राज्यतंत्राच्या उत्पत्तीविषयीं चार मतें प्रचलित आहेत व त्या मतांनुसार राज्यतंत्रांचीं लक्षणें व अधिकार त्या त्या मतप्रवर्तकांनी ठरविले आहेत. कांहींच्या मतें राजा व राज्यतंत्र हीं ईश्वरनिर्मित आहेत. मनुस्मृति व महाभारत यांमध्यें ही कल्पना सापडते. राजाला देवाने उत्पन्न केलें आणि दंडनीति व राजसत्ता ह्या त्याचे हातीं दिल्या. ह्या कल्पनेमुळें राजाला, राजाधिकाऱ्याला व दंडाला देवतेचें स्वरूप व अनियंत्रित अधिकार आहेत असें मानण्याचा प्रघात पडला. आणि ते प्रजेला कोणत्याही प्रकारें जबाबदार नाहीत व त्यांच्यावर निर्बन्धाचें बंधन नाही असें मत पुढे आलें. राजाचें वर्तन वाईट असो किंवा चांगलें असो, त्याचें शासन व कारभार स्वार्थासाठी किंवा प्रजेच्या कल्याणासाठी होत असो, तो अमर्याद सत्ताधारी, जणूं काय पृथ्वीवरील परमेश्वर समजला जाऊं लागला. न्याय व अन्याय हे नीतितत्त्वानुसार ठरणारे नसून, त्याच्या उक्तीप्रमाणें व कृतीप्रमाणें होऊं लागले. त्याला निवडण्याचा, विरोध करण्याचा किंवा काढण्याचा अंतिम अधिकार प्रजेला राहिला नाही. त्याचें पद त्याला वंशपरंपरेने प्राप्त होतें असें ठरलें आणि त्याची अधिसत्ता ईश्वरदत्त मानली गेली.

चांगल्या सद्‌वर्तनी व प्रजाहितदक्ष राजाला एकवेळ देवासारखा मानिल्यास चालेल; पण राजा, मग तो दुष्ट असला तरी तो देवासारखा,

सर्व नीतिनिर्बंधांच्या पलीकडे असणारा व सर्वांहून श्रेष्ठ; ही कल्पना व हे विचार चुकीचे आहेत.

ज्यावेळीं प्रातिनिधिक लोकसत्तात्मक राज्यपद्धति अस्तित्वांत नव्हती व देशाचें व लोकहिताचें रक्षण एका राजाच्या अधिकाराने होत होतें त्यावेळीं हा आपला राजा देवासारखा सद्‌गुणी व प्रजेचा उत्तम पालकपोषक असावा आणि त्याने प्रजेला योग्य प्रकारें शासन व दंड करावेत, असें वाटणें स्वाभाविक व अवश्य होतें. पण राजाचें पद व अधिकार वंशपरंपरागत झाल्यामुळें कांही राजे वाईटही निघूं लागले. अशामुळें राजाच्या ईश्वरदत्त व अनिर्बंध अधिकाराची कल्पना प्रजेला पीडाकारक झाली. आणि ती ऐतिहासिक, तात्त्विक व नैतिक दृष्टया सुद्धा चुकीची ठरली आहे. प्रजेच्या हिताच्या व नीतीच्या दृष्टीने तिचा परिणाम अनिष्ट झाला आहे. तिच्यामुळें लोकांची सत्ता, सुख व स्वतंत्र्य यांची वाढ झाली नाही. पुष्कळांच्या मतें राजा हा प्रत्यक्ष देव नाही. त्याला देवर्षिप्रणीत धर्माला व नीतीला अनुसरून आपलें राज्य केलें पाहिजे. दुर्वर्तनी राजाला पदच्युत करण्याचा अधिकार ऋषिमुनींना, प्रजेच्या पुढाऱ्यांना व प्रतिनिधींना आहे. प्रातिनिधिक सत्ता अस्तित्वांत येण्यापूर्वी हें कार्य धर्माधिकाऱ्यांना व समाजधुरीणांना करितां येत असे. धर्म सांगणारे ऋषि व आचार्य ईश्वरप्रेरितच मानले जात. मनुष्याला त्यांनी रचलेल्या धर्मशास्त्रा विरुद्ध जाण्याचा अधिकार नसे.

युरोपांतही राजाच्या ईश्वरत्वाच्या कल्पनेची अशाच रीतीने वाढ झाली. राजाचा अधिकार ईश्वरदत्त आहे, तो निर्बंधातीत अनियंत्रित व स्ववश आहे, लोकवश नाही, त्याला लोकमताने नियुक्त करतां येत नाही किंवा पदच्युत करतां येत नाही, इत्यादि प्रकारची ती कल्पना होती. पण ती कल्पना पुढे लोकसत्तेच्या कल्पनेमुळें लय पावली आणि राजा हा कांही ठिकाणीं नामधारी व अधिकाररहित झाला व कांही ठिकाणीं राजाचें नांव व पदच काढून टाकलें गेलें.

कांहींच्या मतें युद्धाच्या आवश्यकतेमुळें राजा निर्माण झाला. पुष्कळ ठिकाणीं राज्यें व राजवंश हीं युद्धांतील जयामुळेंच निर्माण झालीं आहेत. ऐतिहासिक दृष्टया नवीन राज्यें व राजवंश अशाच प्रकारें उदयास

आले आहेत. पण राज्यतंत्राची आवश्यकता काय व तिचा प्रथम उगम कसा झाला हे तात्त्विक प्रश्न ह्या मताने सुटत नाहीत. एखादें राज्य व राज्यतंत्र हें बळाच्या जोराने व युद्धाच्या आक्रमणाने पादाक्रांत करून घेतां येतें आणि तें कांही अंशीं बळाच्या आधाराने व कांही अंशीं लोकांच्या अनुकूलतेने व संमतीने चालवितां येतें. पण राज्यतंत्र ही संस्था कोणत्या कारणामुळें उत्पन्न झाली हा प्रश्न या मताने सुटत नाही. राज्यतंत्र चालविणाऱ्याला अथवा राज्य हस्तगत करणाऱ्याला परचक्रापासून किंवा अंतर्गत विप्लवापासून रक्षण करण्याचें सामर्थ्य पाहिजे, तरच तीं टिकतात. पण राज्यतंत्राचा उगम व त्याचे आधार काय आहेत ह्या गोष्टी त्याने कळत नाहीत. बळ ही राज्यतंत्राला एक आवश्यक व साहाय्यक गोष्ट आहे, पण तें त्याचें मुख्य लक्षण नाहीं.

राज्यतंत्र हें लोकनिर्मित व लोकसंमत आहे असें कांही जणांचें मत आहे. भीष्मांनी महाभारतांत व कौटिल्यांनी अर्थशास्त्रांत राज्यतंत्राची उत्पत्ति लोकांच्या आवश्यकतेमुळें, इच्छेमुळें व संमतीमुळें झाली अशा मतांचा उल्लेख केला आहे. पाश्चात्य ग्रंथकार हॉब्स, लॉक व रूसो यांचीं मतें याच स्वरूपाचीं आहेत.

हॉब्सच्या मतें मनुष्यांची मूळची स्थिति व वर्तणूक प्रेमाची, शांततेची व मित्रत्वाची नसून ती मारामारीची, कलहाची व शत्रुत्वाची होती. त्यांचें वर्तन लांडग्याप्रमाणें असे, आणि त्यांच्यामध्यें युद्धें व माराम्याऱ्या सतत चालू असत. ह्या आपत्कालांतून सुटण्यासाठी त्यांनी आपसांत एक मुख्य अधिकारी अथवा राजा निर्माण करण्याचा ठराव केला व त्याला आपल्या पालनाचे व प्रतित्वाचे सर्व अधिकार अर्पण करून टाकले आणि त्याच्या अधिसत्तेवर कोणतेंच बंधन घातलें नाही व त्याचे अधिकार सर्वश्रेष्ठ, स्ववश, स्वयंभू व अनियंत्रित असे मानले.

लॉकच्या मतें मनुष्यांची मूळची स्थिति व वागणूक शांततेची व मित्रत्वाची होती पण नंतर कांही कारणाने ती बिघडली आणि कलहाची व शत्रुत्वाची झाली. त्यामुळें मनुष्याचें जीवित, स्वातंत्र्य व वित्त यांची सुरक्षितता गेली. ती परत आणण्याकरतां व राखण्याकरतां लोकांनी एकत्र होऊन राजाला निवडलें आणि त्याच्याशीं आपले स्वाभाविक व आवश्यक

अधिकार राखण्याच्या दृष्टीने करार केला आणि त्याला तशा अटी घालून मर्यादित अधिकार दिला. राजाने लोकांची सुरक्षितता ठेवली नाही तर त्याला काढण्याचा अधिकार लोकांनी आपले हातांत ठेवला. त्यामुळें राजाची अधिसत्ता स्ववश व अनियंत्रित झाली नाही.

रूसोच्या मतें मनुष्याची मूळची स्थिति व वागणूक साधी व साधुतुल्य अशी होती. पण कांही कालानंतर ती बिघडली व ती सुधारण्याकरतां लोकांनी एकत्र व संमत होऊन व आपसांत ठराव करून आपलें स्वतःचें नैसर्गिक व आवश्यक स्वातंत्र्य व सत्ता आपल्या बळकटीकरतां समाजाच्या समष्टिरूपाला पूर्णपणें अर्पण केल्या आणि एक मोठी संघटनात्मक शक्ति व सामुदायिक अधिसत्ता उत्पन्न केली. ती लोकसमाजाव्यतिरिक्त कोणाही व्यक्तीच्या अथवा व्यक्तिसमूहाच्या हातांत पूर्णपणें अथवा मर्यादितपणें दिली नाही. ती त्यांनी स्वतःच्याच संघटित व सामुदायिक शक्तीच्या व सत्तेच्या हातांत ठेवली. म्हणजे मूळच्या स्थितींतील मनुष्याचें वैयक्तिक स्वातंत्र्य व अधिकार जाऊन त्याच्या संमतीने ते एका नव्या समाज अथवा समुदाय या समष्टिरूप संस्थेमध्यें प्रविष्ट व एकत्रित झाले. त्या सामुदायिक संघटनेने प्रत्येक मनुष्याला त्याचें खरें स्वातंत्र्य व अधिकार भोगण्यास अधिक वाव व सामर्थ्य मिळतें. तो त्या समुदायशक्तीमध्यें समभागी व समभोगी होऊन समाविष्ट होतो आणि त्याचा तुटकपणा, संकुचितपणा व स्वार्थ जाऊन त्याच्या इच्छा, अधिकार व स्वातंत्र्य हीं व्यापक, सामुदायिक व समाजहितकारक होतात. त्याच्या वर्तनामध्यें, व्यवहारामध्यें सार्वत्रिकपणा व मोठेपणा शिरतो. तो सामुदायिक इच्छेने व संमतीने काम करूं लागतो. ह्या मताप्रमाणें राज्यतंत्र व राज्याचे अधिकारी हे केवळ मंत्री व कारभारी गणले आहेत. त्यांना स्वतंत्र अधिकार व सत्ता ठेवलेली नाही. त्यांना नेमणें व काढणें हे दोन्ही अधिकार लोकांच्या सामुदायिक संघटनेच्या व सत्तेच्या हातीं ठेवले आहेत. अधिकारी हे सर्वस्वी नोकर ठरविले आहेत.

ह्या राज्यतंत्र निर्माण करणाऱ्या लोकसंमतीला 'राजकीय अथवा सामाजिक संमति' म्हणून संज्ञा प्राप्त झाली आहे. राजा अथवा राज्यतंत्र हें लोकसंमतीने निर्माण होतें, हा ह्या मतांतील मुख्य सिद्धांत आहे. तें

देवनिर्मित अथवा बलसंपादित नाही, असा ह्या मताचा अर्थ आहे. हें मत तात्त्विक स्वरूपाचें आहे. ऐतिहासिक घटनेस अनुसरून नाही. मात्र न्याय्य राज्यतंत्राचा तात्त्विक दृष्टया मुख्य आधार व मूळ आधार लोकसंमति हाच आहे, असें ह्यांतील सत्य आहे. राज्यतंत्राचें चिरस्थायित्व लोकांच्या इच्छेवरच अवलंबून असतें. राज्याधिकाऱ्यापेक्षा प्रजेचेंच महत्त्व समाजामध्यें अधिक आहे आणि अधिसत्तेचा, राज्यतंत्राचा व स्वातंत्र्याचा विचार त्याच्याच दृष्टीने केला पाहिजे. राज्यतंत्र हें मर्यादित अधिकाराचें आहे आणि प्रजेच्या संमतीने व तिच्या हिताच्या व स्वातंत्र्याच्या दृष्टीने त्यानें चाललें पाहिजे. बळ हा राज्यतंत्राचा केवळ साधनात्मक व आनुषंगिक भाग आहे. जरी ऐतिहासिक दृष्टया कांही जणांनी स्वसामर्थ्याने व सेनेच्या बळाने नवीं राज्यें निर्माण केलीं असलीं तरी तात्त्विक दृष्टया राज्यतंत्राचा मूळ व मुख्य आधार लोकसंमति हाच आहे. तिच्यामुळें तें उद्‌भवतें व टिकतें. नुसत्या सेनेच्या बळावर तें योग्य रूप धारण करीत नाही व टिकत नाही.

ऐतिहासिकांच्या मतें राज्यसंस्था व राज्यतंत्र हीं स्वाभाविक व आवश्यक आहेत. त्यांच्यावाचून मनुष्यें एकत्रपणें राहूं शकत नाहीत आणि त्यांचें जीवित सुखावह व सामुदायिक होऊं शकत नाही. एका विशिष्ट कालीं किंवा प्रसंगीं देवांनी, दैत्यांनी किंवा मानवांनी राजा, राज्यतंत्र अथवा राजकीय संस्था निर्माण केल्या असें नाही. त्या मुळांतच साध्या स्वरूपांत व अंकुररूपाने मनुष्याच्या नियंत्रणस्वभावांत व नीतिस्वभावांत होत्या. भौगोलिक परिस्थिति, सामाजिक स्वभावाचा परिपोष आणि सामाजिक संघटनेची व सुखाची आवश्यकता ह्यांच्या निकडीने त्यांची हळूहळू वाढ झाली आणि त्यांचे विविध प्रकार दिसूं लागले. नंतर त्यांच्यांतील फरक व गुणदोष दिसूं लागले. पुढे त्यांचें बुद्धिपुरःसर रूपांतर करण्याचे प्रयत्न झाले. राजकीय संस्थांच्या विकासाला कुटुंबांतील पित्याच्या अथवा कर्त्याच्या नियंत्रणापासून मूळ सुरवात होऊन पुढे धर्माधिकारी, मांत्रिक, धनी, शिक्षक, सेनानी, पुढारी, इत्यादिकांच्या द्वारें परिणत होत होत त्या राज्यरूपाने व्यक्त व परिणत स्वरूपांत आल्या. राज्यसंस्थेचें मुख्य लक्षण रक्षणाचें व नियंत्रणाचें. मग तें रक्षण व नियंत्रण धर्मानुसार, नीतीनुसार अथवा स्वेच्छेनुसार असो. जें प्राथमिक कुटुंबांतील पति व पिता करतो तें च

राज्यरूपी समाजांतील नरपति व राजा करतो. मनुष्याच्या सामाजिक व सामुदायिक जीवनाचें राजकीय संस्था हें स्वाभाविक व आवश्यक अंग आहे आणि सामाजिक जीवन आणि त्याची रक्षणाची व नियंत्रणाची सत्ता हीं बरोबरच वाढलीं आहेत. राज्यतंत्राचें स्वरूप, स्वभाव, वर्चस्व व प्रकार हीं स्थल, काल व कार्य ह्यांना अनुसरून पालटलीं व वाढलीं आहेत. पण त्यांचे अंकुर प्रारंभापासून मनुष्यांच्या सामाजिक जीवनामध्यें होते आणि त्याच्याच योगें मनुष्याचें सामुदायिक जीवन सुसंघटित व सुव्यवस्थित झालें आहे.

राजकीय समाजाचें प्रधान केंद्र हें त्यांतील अधिसत्तेमध्यें असतें. राज्यांतील सर्वश्रेष्ठ रक्षणसत्ता व नियंत्रणसत्ता हीच अधिसत्ता अथवा प्रभुशक्ति होय. देशांतील यच्चयावत् व्यक्ति, समूह व वस्तु ह्यांच्यावर तिचा अधिकार असतो. निर्बंधदृष्टया तिच्याहून श्रेष्ठ अशी कोणतीही सत्ता नाही. तिच्या आज्ञा व शासनें सर्वांनी शिरसावंद्य करून पाळलीं पाहिजेत, मग ती अधिसत्ता राजमुखी असो अथवा लोकमुखी असो. निर्बंध (कायदे) करणें, नियंत्रण घालणें व शासन करणें हीं कार्यें तिच्याच अधिकारांतलीं आहेत. नागरिक ज्यांचा उपभोग घेतो ते सर्व अधिकार आणि पाळतो तीं सर्व कर्तव्यें हीं तिच्याच द्वारें ठरविलेलीं असतात. त्यांना आधार, निश्चितता व स्थैर्य तिच्याच मुळें आहे.

बाहेरच्या दुसऱ्या राज्यसत्तेला तिच्या कारभारांत व शासनव्यवस्थेंत हात घालण्याचा नैर्बंधिक अधिकार नाही आणि आंतील कोणाही व्यक्तीला व समूहाला तिला विरोध करावयाचा नैर्बंधिक अधिकार नाही. तिच्या आज्ञा न्याय्य असोत वा अन्याय्य असोत त्या प्रजेने पाळिल्या पाहिजेत. राज्यतंत्र कसेंही उत्पन्न झालेलें असो, अधिसत्ता ही राज्यांतील मुख्य सत्ता आहे. ती निर्बंध घालते, रक्षण व नियंत्रण करते आणि न्याय देते. तिच्या हातांत समाजाची सर्व शक्ति एकवटलेली असते.

अधिसत्तेमध्यें तत्त्वतः जरी 'कर्तुमकर्तुम्' सामर्थ्य असलें तरी व्यवहारांत समाजाच्या चालीरीती, भावना व ध्येयें ह्यांचा तिच्या निर्बंधाच्या अधिकारावर व सामान्य कार्यव्यवस्थेवर प्रभाव पडतो. नैर्बंधिक अधिसत्ता जरी राज्यतंत्रामध्यें असली तरी नैतिक अधिसत्ता जनतेंत असते. जनतेच्या

भावना, नीति व संमति हाच कोणत्याही राज्ययंत्राचा व अधिसत्तेचा अंतिम आधार आहे.

लोकसत्तात्मक अधिसत्ता ही लोकसमाजाव्यतिरिक्त नाही. तिला लोकसमाजाविरुद्ध वागण्याचे अधिकार नाहीत. त्यामध्यें तिचें हित नाही. ती लोकसमाजाचा प्रतिनिधि व लोकसत्तेचें अधिष्ठान आहे आणि ती लोकांचें हित व स्वातंत्र्य यांचें रक्षण करते. ती लोकसमाज व लोकसत्ता यांचें सुसंघटित व निश्चित आणि अधिकार बजावण्यास व कार्य करण्यास योग्य व समर्थ असलेलें असें स्वरूप आहे. ही अधिसत्ता जरी थोड्या अधिकाऱ्यांच्या हातांत असते तरी ते लोकांचे निवडलेले व जबाबदार प्रतिनिधि असतात. लोक त्यांना काढूं शकतात. त्यांना स्वतःचे स्वतंत्र अधिकार नाहीत. ते लोकांनी दिलेले व लोकांकरतां आहेत. प्रतिनिधि हे बहुमताच्या आधारें वागतात व बहुमताने उत्पन्न होतात आणि त्यांच्यांत बहुमत प्रतिबिंबित झालेलें असतें. बहुमताचा त्यांना पाठिंबा व संमति असते व म्हणूनच त्यांना राज्य करतां येतें.

अधिसत्तेचें मुख्य कार्य समाजस्वास्थ्य व समाज संस्था यांचें सर्व प्रकारें रक्षण करणें हें होय. समाजाच्या सर्वशक्तीचें तें एकवटलेलें स्वरूप आहे. त्याला लोकमताचा व लोकांच्या शक्तीचा मुख्य आधार असला पाहिजे. सांप्रत अधिसत्ता ही नुसती स्वतंत्र व लोककल्याणेच्छु थोड्या लोकांची सत्ता नसून ती लोकसत्तेचें प्रतिबिंबित व प्रातिनिधिक स्वरूप आहे. अधिसत्तेचें केंद्र व मुख्य सूत्रें ज्या अधिकाऱ्यांच्या व संस्थांच्या हातांत असतात, त्यांच्याकडून समाजाचें शासन, पालन व नियंत्रण होतें.

समाजाची राजकीय अधिसत्ता ही तात्त्विक दृष्ट्या जरी अनियंत्रित स्वरूपाची धरली तरी ऐतिहासिक दृष्ट्या, व्यवहारदृष्ट्या व नैतिक दृष्ट्या तिला मर्यादा व बंधनें हीं आहेतच. तिच्या उगमाच्या वेळची परिस्थिति, तिची वाढ, घटना व अंतर्भूत तत्त्वें हीं सर्व तिच्या स्वातंत्र्याला व अधिकारक्षेत्राला नियंत्रण घालतात. ह्या नियंत्रणाला प्रोफेसर डायसीने 'अंतर्गत नियंत्रण' असें नांव दिलें आहे. केवळ अविवेकाने व अन्यायाने वर्तन करणारी राजकीय सत्ताधारी संस्था फार काल टिकणें संभवनीय नाही. याचप्रमाणें राजकीय अधिसत्तेच्या कृत्यांवर 'बाहेरील नियंत्रण' असतें. कोण-

त्याही अधिसत्तेला कांही गोष्टींत कांही मर्यादेच्या पलीकडे जातां येत नाही. त्या मर्यादेचें तिने उल्लंघन केलें की तिला बाहेरून प्रतिबंध होतो. गुलामगिरी, चांचेगिरी, राजकीय आक्रमणाच्या महत्त्वाकांक्षा, दडपशाही व छळ अशा गोष्टींना मर्यादा आहेत. प्रत्येक अधिसत्तेला लोकांच्या असंतोषामुळें उत्पन्न होणाऱ्या बंडाची, क्रांतीची व परचक्राची भीति असते. अधिसत्ता ही त्या काळच्या नैतिक व नैर्बंधिक कल्पना पुऱ्या झुगारून देऊन लोकमताच्या विरुद्ध सदैव वागूं शकत नाही. नैतिक दृष्टचा तिच्यावर जनतेच्या भावनांचें व ध्येयांचें आंतून नियंत्रण असतें. अधिसत्तेच्या अनियंत्रितपणाला अशा प्रकारची स्वाभाविक भीति व नैतिक प्रतिबंध आहे. मात्र कोणत्याही राष्ट्रसंघाला अथवा देशांतील संस्थेला तिच्यावर कायदेशीरपणाने निर्बंध घालतां येत नाहीत.

**निर्बन्ध** (कायदा) म्हणजे अधिसत्तेने केलेली आज्ञा अथवा राजशासन. ही आज्ञा जरी तिच्या मुखांतून व जबाबदारीवर नैर्बंधिक रूपाने निघत असली तरी तिला आपल्या समाजाचीं ध्येयें, चालीरीती, भावना व आवश्यकता ह्यांचा विचार सोडून ती स्ववशपणाने करतां येत नाही. त्यांना अनुसरून नसलेल्या निर्बंधाना लोकांचा विरोध होत असतो. लोकांच्या सदिच्छेला, न्यायबुद्धीला व नीतीला पटत नसलेले निर्बंध व्यवहारदृष्टचा सफल होत नाहीत आणि उपयोगी ठरत नाहीत. लोकांना त्यांचें महत्त्व व उपयोगिता पटल्यावाचून ते यशस्वी होत नाहीत. 'यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं नाचरणीयम्' असें आपलें नीतिवाक्य आहे. पण ह्याचा अर्थ असा नाही की लोकांच्या मूढ भावनांप्रमाणें व समजुतींप्रमाणें निर्बन्ध करावयाचे व पाळावयाचे. ते स्वातंत्र्य, सुख व प्रगति यांना पोषक असे असले पाहिजेत. ह्याचा अर्थ एवढाच धरावयाचा की नवे निर्बंध व चालू लोकभावना व समजुती ह्यांच्यामध्यें महदंतर असूं नये. लोकांना शिक्षणाच्या साहाय्याने आणि निर्बंधाच्या नियंत्रणानें व प्रोत्साहनाने हळूहळू पुढे न्यावें म्हणजे तो लोकसमाज सुधारतो व बळकट होतो.

नैतिकदृष्टचा निर्बंध हीं न्याय, नीति व सदाचार यांना अनुसरून असणारीं वचनें आहेत. राजकीय अधिसत्तेच्या दृष्टीने निर्बंध ही पालनपोषणात्मक आज्ञा आहे. नीति ही प्रायः उपदेश करते आणि सत्ता ही

आदेश व निग्रह करते. एक सदाचार, लोकसंमति व सम्यक् संकल्प यांवर अधिष्ठित आहे. दुसरी दंडधारी असून शासनावर अधिष्ठित आहे. नागरिकनीतिशास्त्राला आपला सामाजिक सदाचारी जीवनाचा व सुधारणेचा उद्देश सिद्धीस नेण्यासाठी नैतिक व राजकीय ह्या दोन्हीही प्रकारच्या निबंधांचा उपयोग आहे.

सांप्रतचे निबंध हे लोकसत्तेने निर्माण केलेल्या प्रातिनिधिक व लोकवश अधिसत्तेने केलेले असतात आणि ते लोकमताला अनुसरून असतात. तेव्हा त्यांच्यामध्यें व लोकमतामध्यें विरोधी भाव बहुधा उत्पन्न होत नाही.

ज्याप्रमाणें निबंध म्हणजे नुसतें शासन अथवा दंड नव्हे; त्याप्रमाणें स्वातंत्र्य म्हणजे केवळ स्वेच्छाचार अथवा स्वैर वर्तन नव्हे. 'मनःपूतं समाचरेत्' म्हणजे मनसोक्त वर्तन करण्याची कल्पना सामाजिक स्वातंत्र्यांत येत नाही. समाज हा अनेक माणसांचा समूह आहे आणि त्यांनी एके ठिकाणीं सलोख्याने राहण्यासाठी कांही नियंत्रण मान्य केलें पाहिजे. स्वातंत्र्यामध्यें सार्वजनिक हिताविरुद्ध न जातां प्रत्येक व्यक्तीला स्वप्रयत्नानुसार व स्वेच्छेनुसार वागण्याचा अधिकार व मोकळीक असणें हा अर्थ येतो, नुसता स्वार्थदृष्टया अनुकूल गोष्टी करण्याची मोकळीक हा अर्थ येत नाही. समाजांत राहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला समाजहितदृष्टया कांही बंधनें पाळावीं लागतात. समाजांतील स्वातंत्र्य अथवा नागरिकाचें स्वातंत्र्य म्हणजे विशिष्ट परिस्थितींत विशिष्ट उद्देशासाठी योग्य वर्तन व व्यवहार करण्याची मोकळीक. तिच्यायोगें तो उद्देश सफल झाला पाहिजे. खरें पाहिलें असतां योग्य नीतिमर्यादा व बंधनें ह्यांच्याशीं खऱ्या स्वातंत्र्याचा विरोध येऊं शकत नाही. उलट, त्यांच्या योगें वैयक्तिक कर्तृत्वाला व वाढीला आणि सामाजिक सुस्थितीला व सुधारणेला यथेच्छ अवकाश मिळतो. स्वातंत्र्य व सुव्यवस्था ह्या कल्पना अन्योन्याश्रयी व परस्परपोषक आहेत. कोणालाही कांहीही करण्याचा किंवा कोणत्याही वस्तूवर व व्यक्तीवर अमर्याद अधिकार चालविण्याचा हक्क असूं शकत नाही. असा हक्क मान्य केल्यास जिकडे तिकडे बलिष्ठांचा उन्मत्तपणा व अत्याचार बोकाळेल आणि दुर्बलांच्या दैवीं दास्य किंवा नाश येईल. म्हणन सर्वांना सारखें स्वातंत्र्य मिळण्यासाठी कांही तरी सार्व-

त्रिक नियंत्रण व सार्वजनिक नियम असणें अवश्य आहे; आणि हें नियंत्रण व नियम कोणीतरी सन्मान्य, सर्वमान्य, सर्वसामान्य व सुनिश्चित स्वरूपाच्या समाजाच्या श्रेष्ठ शक्तीनें निर्बंधरूपानें घालून दिले पाहिजेत. खरें स्वातंत्र्य अशा सुव्यवस्थेंतच प्राप्त होईल. एकानें दुसऱ्याच्या नाशाला कारण होतां कामा नये. लॉर्ड ॲक्टनच्या मतें, सत्ताधारी व बहुसंख्याक समाज, परंपरागत चालीरीती व चालू लोकमत, ह्यांचें अनिष्ट व गैरवाजवी दडपण चालूं न देतां प्रत्येक व्यक्तीच्या व समूहाच्या मताप्रमाणें त्याला आपलें कर्तव्य पार पाडावयाची मोकळीक राहील ही निश्चितता स्वातंत्र्य ह्या शब्दांत अभिप्रेत आहे.

स्वातंत्र्याचे मुख्यतः चार विभाग करतां येतील. एक **व्यवहारस्वातंत्र्य**. व्यक्तीव्यक्तीमध्यें आणि व्यक्ति व राज्यतंत्र यांमध्यें होणाऱ्या परस्पर संबंधांत नागरिकाला कांही व्यवहाराचे, वागणुकीचे व साहचर्याचे नियम आणि तसेच जीवित, स्वातंत्र्य व वित्त या विषयींचे कांही अधिकार व कर्तव्यें पाळावीं व मानावीं लागतात. हे नियम, अधिकार व कर्तव्यें व्यवहारविषयक व दंडविषयक निर्बंधांमध्यें समाविष्ट केलेलीं असतात. त्याच्या योगें मनुष्याच्या व्यवहारस्वातंत्र्याचें रक्षण व वाढ होते.

दुसरें **राजकीय स्वातंत्र्य**. त्याचा अर्थ नागरिकांना आपल्या देशाच्या राज्यतंत्रांत व राज्यसंस्थांच्या कारभारांत पूर्णपणें भाग घेण्याचा अधिकार मिळणें हा होय. त्यामध्यें सार्वत्रिक मताधिकार, राज्यतंत्राच्या कार्यकारी विभागावर निर्बंधकारी विभागाचें वर्चस्व, नवीन धोरणाची व निर्बंधाची योजना करण्याचा नागरिकाचा अधिकार, महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं व निर्बंधासंबंधीं सर्व नागरिकांची मतमोजणी, प्रतिनिधींना परत बोलावण्याचा अधिकार, कार्यकारी मंडळाची लोकांना जबाबदारी, नागरिकांच्या मूलभूत अधिकारांची घोषणा, निर्बंधांचें सर्वांवर सारखें नियंत्रण, अपराधांचा चालू सामान्य न्यायालयाकडून निवाडा, स्थानिक स्वराज्य आणि नागरिकांना राजकीय अधिकार व सत्ता प्राप्त करून देणारीं तत्त्वें व नियम इत्यादि गोष्टींचा समावेश होतो.

तिसरें **देशस्वातंत्र्य**. तें राज्याच्या आंतील स्वयंशासनावर व बाहेरील स्वाधीनतेवर अवलंबून असतें. अशाच देशाला आंतरराष्ट्रीय व्यवहारांत

स्वतंत्र स्थान व सारखा मान असतो. बलशाली व प्रगतिपोषक असें राजकीय, नैतिक व सांस्कृतिक जीवन प्राप्त व्हावयाला ह्या देशस्वातंत्र्याची अत्यंत आवश्यकता असते. एका देशाच्या दुसऱ्या देशावरील वर्चस्वानें त्यांतील जनतेच्या जीवनाच्या अनेकविध अंगांचा व व्यापक स्वरूपाचा ऱ्हासच आटून जातो. तसल्या परिस्थितींत तेथील नागरिकांची अधोगति होते आणि त्यांच्या स्वभावांतील प्रगतीचीं बीजें व स्वातंत्र्याचे अंकुर मृतप्राय होतात.

चौथें मतस्वातंत्र्य. त्यामध्यें धर्मस्वातंत्र्य व शिक्षणस्वातंत्र्य हीं येतात. आपल्या भावनेनुसार आपल्या आवडीच्या उपास्य दैवताची पूजा, अर्चा, स्मरण, भजन इत्यादि आपल्याला अनुकूल अथवा प्रिय मार्गानें करण्याचा अधिकार म्हणजे धर्मस्वातंत्र्य होय. अमुकच धर्माच्या मतांचें, मार्गाचें, आचारांचें किंवा विधींचें अनुसरण केलें पाहिजे असा कोणावर बलात्कार न होतां त्या संबंधांत व्यक्तीला मतस्वातंत्र्य असणें आणि आपल्या सदसद्विवेकबुद्धीप्रमाणें कोणालाही वर्तावयाची मोकळीक असणें हें धर्मस्वातंत्र्याचें लक्षण आहे. शिक्षणाच्या बाबतींतही शिक्षकांना, शिक्षितांना व शिक्षणसंस्थांना बरेंच मतस्वातंत्र्य पाहिजे. त्यांवर राजसत्तेचें, धर्मसत्तेचें व जातिसत्तेचें विशिष्ट दडपण नसलें पाहिजे. त्या स्वातंत्र्याच्या योगानें मनुष्याची बौद्धिक, नैतिक व आध्यात्मिक उन्नति होऊं शकते. शक्य तोंपर्यंत मनुष्याची आंतून वाढ व्हावयाला पूर्ण मोकळीक पाहिजे.

मनुष्याचें स्वैर व स्वेच्छाचारी स्वातंत्र्य हें वर वर्णिलेल्या चार प्रकारच्या सुसंस्कृत स्वातंत्र्याहून भिन्न आहे. तें अनियंत्रित, वैयक्तिक व उनाड स्वातंत्र्य होय. तें मर्यादित, नैतिक व उपयुक्त स्वातंत्र्य नाही. ह्या पाशवी स्वातंत्र्यांत कोणचीही संघटना व सुव्यवस्था टिकणें व उद्देश पार पडणें शक्य नाही. त्यांच्या अभावामुळें सुखमय जीवन तर दूरच राहो पण नुसतें शांततेचें जीवनही शक्य होत नाही. म्हणून त्या स्वैर स्वातंत्र्याला योग्य बंधनें व मर्यादा घालण्यासाठी मनुष्याचे अनेक प्रयत्न व योजना चालल्या आहेत.

राज्यतंत्राच्या सर्वांगीण व्यवस्थेला राज्यघटना म्हणतात. सामान्यतः ती तेथील लोकांनी स्वप्रयासानें व स्वमतानें निर्माण केलेली असते.

एका लोकसमाजाने ती दुसऱ्या लोकांवर बळाने लादावयाची नसते. राज्यघटनेचा खरा आधार व उगम त्यांतील लोकसमाजाची संमति हाच होय. वास्तविक पाहिलें असतां राज्यघटना ही लोकांनी राज्यतंत्राला घालून दिलेलें नियमरूपी नियंत्रण होय. तिच्यामध्यें राज्यतंत्राचें वर्णन, विभाग व कार्यें हीं दिलेलीं असतात, त्याचे नियमित अधिकार सांगितलेले असतात आणि घटना बदलण्याचे अंतिम अधिकार लोकांच्या हातांत ठेवलेले असतात. राज्यघटनेमध्यें राज्याचें स्वरूप व व्यवस्था हीं येतात आणि राज्यतंत्राची सत्ता व स्वातंत्र्य, नागरिकाचे अधिकार व कर्तव्यें आणि उभयतांचे परस्पर संबंध व मर्यादा ह्या सर्वांचा समन्वय करणारीं तत्त्वें व नियम ग्रथित केलेले असतात.

सांप्रत राज्यघटना ह्या बहुतेक लिखित प्रकारच्या आहेत. पूर्वी त्या प्राधान्येंकरून अलिखित प्रकारच्या असत. कांही राज्यघटना बदलण्यास सुलभ म्हणजे लवचीक असतात आणि इतर बदलण्यास अवघड म्हणजे दृढबद्ध असतात. लवचीक राज्यघटना कायदेकानू करण्याच्या सामान्य पद्धतीने बदलतां येते. दृढबद्ध राज्यघटना कांही खास योजनेनुसारच बदलतां येतात. इंग्रजी राज्यघटना ही पुष्कळ अंशीं अलिखित व लवचीक स्वरूपाची आहे आणि अमेरिकन राज्यघटना ही लिखित व दृढबद्ध स्वरूपाची आहे. ह्या भिन्न रचनेचा नागरिकांच्या अधिकार–कर्तव्यांवर व सत्ता-स्वातंत्र्यावर कांही कमी अधिक परिणाम होतो.

राज्यघटनेमध्यें घालून दिलेल्या नियमांव्यतिरिक्त अनेक रूढि व परंपरा तिचा उद्देश पुरा करण्याकरतां उत्पन्न होतात. घटनेच्या मूळ तत्त्वांशीं त्या सुसंगत असतात आणि त्यांच्या योगाने तिचें कार्य सुलभतेने व शांततेने होतें.

राज्यघटनेमध्यें फेरफार व सुधारणा करणें हें प्रत्येक राज्याला कालाच्या व कार्याच्या निकडीमुळें करावें लागतें. तसें केल्याने लोकांच्या नवीन विचाराला व कार्याला वाव मिळतो आणि राज्यघटनेचें बंधन बाधक न होतां लोकांच्या प्रगतीला साधक होतें. राज्यघटना बदलण्याची आवश्यकता उत्पन्न झाली म्हणजे लोकांमध्यें खळबळ व अनेक सहकारी व विरोधी पक्ष निर्माण होतात.

राज्यतंत्राचीं तीन मुख्य अंगें असतात. त्यांच्यामध्यें सर्व सत्ता व अधिकार विभागलेले असतात. एक अंग निर्बंध करण्याचें काम करतें, दुसरें न्यायदानाचें काम करतें व तिसरें कारभाराचें काम करतें. ह्या तीन अंगांच्या योग्य व्यवस्थेवर आणि त्यांच्या मधील अधिकारवाटणीवर व परस्पर संबंधावर राज्यतंत्राचें कार्य व प्रकार अवलंबून असतात. यांच्या-मध्यें वाटलेली सत्ता स्वतंत्र असावी कां सहकारी असावी कां परस्परावलंबी असावी, अशा अनेक प्रश्नांचा आपणास विचार करावा लागतो; कारण नागरिकांचे अधिकार व स्वातंत्र्य हीं त्यांवर अवलंबून असतात. अधिकार-विभागणीच्या सिद्धांताप्रमाणें राज्याचीं, निर्बंधाचीं, कारभाराचीं व न्या-याचीं कार्यें निराळया व स्वतंत्र संस्थांनी व अधिकाऱ्यांनी करावीं व त्यांनी परस्परांच्या कार्यक्षेत्रामध्यें व अधिकारामध्यें हात घालूं नये. त्यायोगें व्यक्तिस्वातंत्र्य टिकतें आणि राज्यकारभार सुलभ होतो. जर सर्व सत्ता एका व्यक्तीच्या अथवा एका अंगाच्या अथवा एका संस्थेच्या हातांत असली तर तिच्यावर नियंत्रण राहत नाही. ती स्वैर व स्ववश होते. सर्व अधिकार एका हातीं राहिले तर तें शासन प्रजेला उपद्रवी होतें. परंतु अशी अधिकारविभागणी प्रत्यक्ष राज्यकारभारांत सुलभ व योग्य नसते. राज्यतंत्राचें कार्य सुलभ व योग्य प्रकारें चालण्यास ह्या तीन अंगांमध्यें एकचित्त व सहकार पाहिजे आणि मुख्यत: निर्बंध करणाऱ्या लोक-सभेचें सर्वांवर वर्चस्व पाहिजे. प्रत्येक अंगाला दुसऱ्या अंगाचे कांही नियमित मुखत्यारीचे व कांही प्रासंगिक अखत्यारीचे अधिकार असावे लागतात. म्हणजे राज्यतंत्र सुरळीत चालतें. राज्यतंत्र उत्तम प्रकारें चालण्यास निर्बंध-कारी व कर देण्याऱ्या सत्तेची कार्यकारी सत्तेशीं नेहमी घासाघीस किंवा विरोध येतां उपयोगी नाही. तसें झाल्यास इंग्लंडमध्यें निर्बंधकारी लोकसभा कार्यकारी प्रधानमंडळावर अविश्वासाचा ठराव करून किंवा त्यांच्या धोरणाला व कृतीला नापसंती दर्शवून त्याला अधिकारत्याग करावयास लावते. तसेंच, प्रधानमंडळ हें लोकसभा फार विरोधी झाली तर राजा-मार्फत तिचें विसर्जन करून नवी निवडणूक घडवून आणतें. प्रधानमंडळ हें लोकसभेने नेमलेलें व त्यावर अवलंबून असतें. अमेरिकेमध्यें तीन्ही अंगें स्वतंत्र निवडलेलीं असतात आणि त्यांना एकमेकांशीं सहकार कवारा

लागतो. इंग्रजी पद्धतींत सत्तेचें केंद्रीकरण आहे. अमेरिकन पद्धतींत सत्तेची विभागणी आहे. इंग्लंडमध्यें राज्यकारभार अमेरिकेपेक्षा लोकमताला अधिक जबाबदार आहे. त्यामुळें नागरिकांचें स्वातंत्र्य अधिक सुलभ आहे.

राज्यतंत्राच्या अनेक पद्धती व प्रकार आहेत. त्यांचें वर्गीकरण नियंत्रित व अनियंत्रित, लोकसत्ताक व राजसत्ताक प्रकार असें करतां येईल. अरिस्टॉटलने राज्यतंत्राचे तीन न्याय्य प्रकार व तीन विपरीत प्रकार सांगितले आहेत. त्याच्या मताप्रमाणें राज्यतंत्र हें एका राजाच्या अथवा अल्पजनांच्या अथवा बहुजनांच्या हातांत असतें. जेव्हा त्यांचा राज्यकारभार सर्व लोकांच्या हिताच्या दृष्टीनें चालतो तेव्हा ते न्याय्य प्रकार समजावे. जेव्हा तो राज्यकर्त्यांच्या स्वार्थासाठी चालतो तेव्हा ते विपरीत प्रकार समजावे. राज्यतंत्र हें प्रजाहिततत्पर असलें पाहिजे. नाहीतर राज्यकारभार जुलमाचा होतो. अरिस्टॉटलचें वर्गीकरण, सध्याच्या कालाला पुरेसे पडत नाही. सांप्रत राज्यतंत्राचें अनियंत्रित राज्यसत्तात्मक व नियंत्रित लोकसत्तात्मक असें वर्गीकरण करून पुढे लोकसत्तात्मक पद्धतीचें प्रधानमंडळात्मक व अध्यक्षात्मक, सांघिक व एककेंद्रात्मक असें वर्गीकरण करतात.

निबंधाचें व घटनेचें नियंत्रण नसलेलें राज्यतंत्र हें अनियंत्रित राजसत्तात्मक पद्धतीचें होय. उलट, घटना व निबंध यांनी बांधलेलें राज्यतंत्र हें नियंत्रित लोकसत्तात्मक पद्धतीचें होय. तें लोकमतानुवर्ती असतें, व राजसत्तात्मक पद्धतीसारखें स्वेच्छाचारी व निरंकुश नसतें. कांही राज्यांत राजे असूनही ते लोकनिर्मित घटना व निबंध यांनी बांधलेले असतात. ते नामधारी राजे असतात, सत्ताधारी व दंडधारी नसतात. त्या राज्यप्रकाराला नियंत्रित राजसत्तात्मक पद्धति म्हणतात. इतर राज्यांत राजा नसतो. तेथे लोकनियुक्त अथवा लोकसभानियुक्त अध्यक्ष असतो. त्यांना लोकसत्तात्मक पद्धति म्हणतात.

लोकसत्तात्मक राज्यपद्धतीच्या प्रधानमंडळात्मक प्रकारामध्यें कारभारी प्रधानमंडळ हें लोकनियुक्त प्रातिनिधिक सभेला सर्वस्वीं जबाबदार असतें. प्रधानमंडळनिविष्ट कार्यकारी सत्ता ही लोकसभानिविष्ट निर्बंधकारी सत्तेला उत्तरदायी असते. तिचें व त्यांतील प्रधानांचें आयुष्य प्रति-

निधिक सभेच्या मर्जीवर अवलंबून असतें. हे सर्व अधिकारी प्रधान तिच्या प्रातिनिधिक सभासदांतूनच निवडलेले असतात. त्यांची कार्यकारी मंडळा-करतां स्वतंत्र अशी लोकांकडून निवडणूक होत नाही. ज्या मताच्या अथवा पक्षाच्या सभासदांचें प्राबल्य प्रतिनिधिसभेंत असतें त्यांच्या पुढाऱ्यावर प्रधानमंडळाचें काम येऊन पडतें आणि त्यांच्या हातीं कार्यकारी व योजक सत्ता जाते. ते राज्याचे कारभारी व प्रधान मंत्री होतात. ह्या पद्धतीचें मुख्य लक्षण म्हणजे निबंध करणाऱ्या लोकप्रतिनिधिसभेचें राज्यकारभार पाहणाऱ्या प्रधानमं डळावर व अधिकाऱ्यांवर असणारें सर्वस्वीं नियंत्रण होय. त्या सभेने प्रधानमंडळाच्या कार्याबद्दल विरोधाचा अथवा अवि-श्वासाचा ठराव केल्याबरोवर त्याने आपल्या अधिकाराचा त्याग केला पाहिजे.

अध्यक्षात्मक राज्यतंत्रांत कार्यकारी मंत्रिमंडळाचें व अध्यक्षाचें आयु-ष्य निर्बंधकारी प्रतिनिधिसभेवर अवलंबून नसतें. त्यांची निवडणूक त्या सभेच्या सभासदांतून होत नाही. अध्यक्ष हा मतदार लोकांनी स्वतंत्रपणें कांही निश्चित वर्षांकरतां राज्यतंत्राच्या कार्यकारी अंगाचा प्रमुख म्हणून निवडलेला असतो. ह्या पद्धतीमध्यें निर्बंधकारी, कार्यकारी व न्यायकारी अशा राज्यतंत्राच्या त्रिविध अंगांची व अधिकारांची विभागणी केलेली असते. कार्यकारी सत्तेच्या अध्यक्षाचें अस्तित्व, स्थान व आयुष्य निर्बंधकारी सत्तेच्या मतावर अवलंबून नसतें. त्याला आपला कारभार मात्र तिच्या निर्बंधानुसार चालवावा लागतो. त्याचा अधिकार व स्थान स्वतंत्र आहे, पण त्याचा कारभार तिला उत्तरदायी असतो. निर्बंधकारी सत्तेने अविश्वासाचा अथवा विरोधाचा ठराव केला तरी अध्यक्षाला व त्याच्या मंत्रिमंडळाला अधिकार व स्थान यांचा त्याग करणें आवश्यक नसतें. अध्यक्षाला व कार्य-कारी मंडळांतील मंत्र्यांना निर्बंधकारी लोकसभेंत स्थान व सभासदत्व नसतें. अध्यक्ष हा आपल्या कार्यकारी मंडळांतील मंत्र्यांना स्वतः नेमतो व काढून टाकतो. मंत्री हे त्याला जबाबदार असतात.

जेव्हा कांही स्वतंत्र असलेलीं राज्यें किंवा संस्थानें स्वतःच्या संम-तीनें आपली प्रभुता व स्वातंत्र्य सर्वांच्या मिळून बनलेल्या एका मोठ्या मध्यवर्ती अधिसत्तेमध्यें विलीन करतात आणि स्वतः त्या नव्या संघा-

त्मक राज्याचीं अंगभूत संस्थानें म्हणून राहतात, तेव्हां तशा राज्यांच्या नव्या राजकीय संघटनेला संघात्मक अथवा संयुक्त राज्य म्हणतात. अधिसत्तेचें अधिष्ठान कांही अंशीं त्या मध्यवर्ती संस्थेमध्यें जातें आणि कांही अंशीं त्या अंगभूत संस्थानांमध्यें राहतें. त्यांच्या अधिकारमर्यादा त्या नवीन संघात्मक राज्याची जी घटना परस्पर संमतीने निश्चित केलेली असते तदनुसार ठरविलेल्या असतात. आणि त्या मर्यादांचें अतिक्रमण होत आहे किंवा काय याचा निर्णय करण्याचा अधिकार मुख्य न्यायसत्तेकडे दिलेला असतो. मध्यवर्ती संस्थेला व अंगभूत संस्थानांना ठरवून दिलेली सत्ता, अधिकार व कार्यें असतात. कांही संघात्मक राज्यघटनांमध्यें अंतिम व शेष अधिकार मध्यवर्ती संस्थेकडे असतात तर इतरांमध्यें ते अंगभूत संस्थानांकडे ठेवलेले असतात. ही दोन प्रकारची अधिकारविभागणी त्यांच्या ऐतिहासिक व चालू परिस्थितीवर आणि राजकीय भावनेवर अवलंबून असते.

यावरून दिसून येईल की **संघात्मक राज्यतंत्र** हें दोन किंवा अधिक राज्यांनी एकत्र व संमत होऊन स्थापन केलेल्या नव्या राज्यसंघाला व मध्यवर्ती राज्यसंस्थेला दिलेलें नांव होय. सामान्यतः त्याची राज्यघटना लिखित असते आणि तिच्यामध्यें राज्याधिकाराची व कामाची विभागणी व वाटणी संघांतील अंगभूत स्थानिक राज्यांमध्यें आणि मध्यवर्ती संयुक्त संस्थेंत करून दिलेली असते. मध्यवर्ती संयुक्त राज्यतंत्र हें अंगभूत राज्यांच्या राज्यतंत्राहून कांही राज्यकार्यांमध्यें अधिक महत्त्वाचें व समर्थ असतें. कांही ठिकाणीं अंतिम व शेष अधिसत्ता त्याच्याकडे ठेवलेली असते. संयुक्त राज्याच्या स्थापनेबरोबर त्यांतील अंगभूत राज्यांची स्वतंत्र अधिसत्ता नष्ट होते आणि तीं सर्व राज्यें मध्यवर्ती संयुक्त राज्याचा घटकाप्रमाणें होऊन त्यांच्याकडे राज्यघटनेने सोपविलेलेच अधिकार व कामें राहतात आणि बाकीचे राखीव व राहिलेले अधिकार, कामें व अंतिमसत्ता संयुक्त राज्यतंत्राकडे जातात. घटक राज्यांच्या सोपीव अधिकारामध्यें व कामामध्यें हात घालण्याचा अधिकार संयुक्त राज्यतंत्रास नसतो.

एककेंद्रात्मक राज्यतंत्र हें एकमुखी असतें. त्यामध्यें प्रांतिक व स्थानिक राज्यसंस्था आणि त्यांचे अधिकार व कामें हीं मध्यवर्ती राज्यसंस्थेने दिलेल्या सत्तेमुळें अस्तित्वांत येतात. ते अधिकार व तीं कामें मुळांत

मध्यवर्ती सत्तेचीं असतात आणि तिने आपले कनिष्ठ स्थानिक विभाग या नात्याने त्यांच्याकडे तीं सोपवून दिलेलीं असतात. राज्यकारभाराचे स्थानिक घटक हे कोणत्याही प्रकारें स्वतंत्र नसून मध्यवर्ती राज्यसंस्थेने निर्माण केलेले असतात. त्यांच्यांतील अधिकारी हे मध्यवर्ती अधिसत्तेचे प्रतिनिधि व हस्तक असतात. त्यांच्या कारभारासंबंधी निर्बंध व नियम करण्याची सत्ता मध्यवर्ती अधिसत्तेलाच सर्वस्वीं असते. हेंच एकमुखी राज्यतंत्राचें मुख्य लक्षण आहे.

स्थानिक स्वातंत्र्याच्या व स्वराज्याच्या दृष्टीने संघात्मक राज्यपद्धति अधिक हितकारी आहे. एकमुखी राज्यपद्धति ही अधिकार व अधिसत्ता यांचे एके ठिकाणीं केंद्रिकरण झाल्याने अधिक सामर्थ्यवान असते.

राज्यतंत्राच्या निर्बंधकारी अंगामध्यें लोकांच्या एक किंवा दोन प्रातिनिधिक सभा असाव्या हा प्रश्न अजून वारंवार पुढे येतो. कांहीचें मत असें आहे की श्रीमंत व कुलीन वर्गाचें स्थान, मान व अधिकार यांचें संरक्षण करण्यास सामान्य प्रातिनिधिक सभेच्या शिवाय जमीनदार, मिळकतवाले व हक्कदार अशा लोकांची एक निराळी विशेष सभा पाहिजे. त्यायोगें सामान्य सभेचे निर्णय व निर्बंध हे विशेष सभेमध्यें योग्य प्रकारें तपासले जाऊन राज्यामध्यें अविचारी कारभार व समाजस्थितीवर क्रांतिकारक आघात करणारे कायदे चालू होणार नाहीत आणि समाजाला ह्या थोर लोकांच्या ज्ञानाचा, अनुभवाचा व विद्येचा फायदा मिळेल, समाजाची व्यवस्था टिकेल व सुधारणा योग्यप्रकारें होईल. ह्या विशेष सभेमध्यें विद्वान, अनुभवी, थोर व राज्यसेवा केलेल्या लोकांना स्थान असावें असें मत आहे. त्यांची नेमणूक न होतां लोकांकडून निवडणूक व्हावी. इतरांच्या मतें सर्व लोकांच्या तर्फे एकच सामान्य प्रातिनिधिक सभा असावी. तिला दुसऱ्या विशेष सभेचें नियंत्रण नसावें. तें असलें तर देशाची प्रगति होणार नाही आणि नाफेर पक्षाच्या मताचें प्राबल्य होईल. हीं दोन्ही बाजूचीं मतें पुढे दिलेल्या उद्‌गारांत ग्रथित झालीं आहेत:—

"थोर लोकांच्या विशेष सभेवांचून सामान्य लोकांच्या प्रातिनिधिक सभेंत शहाणपण येत नाही. आणि सामान्य लोकांच्या सभेवाचून थोर लोकांच्या सभेंत प्रामाणिकपणा येत नाही."—हॅरिंग्टन (१६११–१६७७).

"जर विशेष सभेचा सामान्य सभेशीं मतभेद असला तर ती घातक आहे आणि नसला तर ती अनवश्यक आहे."–अबेसिएय (१७४८–१८३६).

राज्यतंत्राच्या कार्याचें अंगभूत अथवा आवश्यक आणि हितकारक अथवा ऐच्छिक असे विभाग करतात. अंगभूत कामें केलीं नाहीत तर राज्यतंत्र टिकणार नाही आणि हितकारक कामें केलीं नाहीत तर लोक सुखी व सद्‌गुणी होणार नाहीत. अंगभूत किंवा आवश्यक कार्यें हीं राज्याच्या अस्तित्वाला अवश्य असलेल्या गोष्टींच्या संग्रहाचीं व संरक्षणाचीं असतात. राज्यघटना संभाळणें, परचक्रापासून रक्षण करणें, समाजव्यवस्था व शांतता राखणें, निर्बंध करणें, देशाचें आंतरराष्ट्रीय स्थान, धोरण व महत्व संभाळणें, लोकांचें जीवित व वित्त राखणें, अपराध्यांना दंड व बंदी करणें, न्याय देणें, कर घेणें, प्रजेचीं अधिकार कर्तव्यें ठरविणें, देशांतील चलन ठरविणें आणि इतर तत्सम राज्यतंत्राच्या आवश्यक गोष्टी करणें हीं सर्व कामें त्यामध्यें येतात. स्थूलमानाने वरील कार्यें मनुष्यांचें जीवित, वित्त, स्वातंत्र्य, नागरिकसंस्था न्याय आणि राज्याचा आयव्यय ह्या संबंधींचीं आहेत.

ऐच्छिक अथवा हितकारक कार्यें मुख्यत: लोकांच्या स्वास्थ्यासंबंधींची असतात. मनुष्याची स्थिति सुधारावी व हित वाढावें असा त्यांचा प्रयत्न असतो. त्यामध्यें शिक्षण, आरोग्य, स्वच्छता, उद्योगधंद्याचें संरक्षण व त्यांना उत्तेजन, व्यापार व देवघेव यांचें नियंत्रण, दीन दु:खितांची व्यवस्था व औषधोपचार, मोलमजुरी करणारे व कामकरी यांच्या हितासाठी उपाययोजना, दुष्काळयोजना, मापें व वजनें यांचें नियंत्रण व देखरेख, सहकारी चळवळ, आगगाड्या व नौका यांचे मार्ग, बाल अपराधी सुधारण्याच्या शाळा व विश्रांतिगृहें यांची स्थापना, मादक पेयांचा व द्रव्यांचा प्रतिबंध अथवा नियमन, अन्नसामग्रीचें व पाण्याचें परीक्षण व व्यवस्था, नगररचना, नगरोद्यानें, पदार्थसंग्रहालयें इत्यादि गोष्टींचा समावेश होतो.

हिंदुशास्त्रकारांनी राज्यतंत्राच्या कार्याचे निग्रह व अनुग्रह असे दोन विभाग अथवा क्षेमकारक व योगकारक असे दोन प्रकारचे अधिकार वर्णिले आहेत. एकाचा उद्देश 'कंटकशोधनम्' म्हणजे

वाईट गोष्टींचें व दुष्टांचें निराकरण करण्याचा असून दुसऱ्याचा 'धर्मस्थीयम्' म्हणजे धर्मस्थापनेची लोकहितात्मक व पुण्यसंचयात्मक कामें करण्याचा आहे.

दुष्टस्य दंडः सुजनस्य पूजा न्यायेन कोशस्यच संप्रवृद्धिः ।
अपक्षपातोऽर्थिषु राष्ट्ररक्षा पंचैव यज्ञाः कथिता नृपाणाम् ॥
(अत्रिसंहिता)

दुष्टांना दंड, सुजनांचा सन्मान, न्यायाने केलेली कोश समृद्धि, नि:पक्षपाती न्यायदान आणि राज्याचें संरक्षण हीं राजाची पांच कर्तव्यें सांगितलीं आहेत.

समाजाच्या प्रारंभींच्या अवस्थेंत मनुष्यांच्या अधम किंवा दुष्ट प्रवृत्तींना आळा घालण्यासाठी आणि त्यायोगें त्याला अधिक समाजशील व सहकारयोग्य करण्यासाठी नियंत्रण व शासन ह्यांचा उपयोग अधिक विस्तृत प्रमाणांत, अधिक कडकपणें व अधिक वेळां अधिसत्तेला करावा लागत असे. लहान अपराधांना त्या मानाने कडक शिक्षा करीत असत. मनुष्यांना समाजहिताच्या दृष्टीने आज्ञाधारकता, शांतता, सहिष्णुता व सेवा ह्या गुणांची जाणीव व सवय होण्यासाठी प्रथम कठोर दंडाची आवश्यकता असते. एकदा ह्या सामाजिक व नैतिक गुणांची जाणीव व सवय झाली म्हणजे पुढे मनुष्याला उच्च जीवनाकडे नेण्यासाठी सौम्य मार्गाचा उपयोग अधिकाधिक केला जातो. अपराध्याला कायिक शिक्षा विशेष न देतां त्याच्या मानसिक व नैतिक शिक्षणाकडे अधिक लक्ष दिलें जातें. त्याचें मन सुसंस्कृत व सद्गुणी करण्याकडे शासनाची प्रवृत्ति होते. कठोर शिक्षेमुळें अपराधी न सुधारतां कोडगा होतो म्हणून त्याच्यांत आपल्या दोषांची जाणीव व सद्गुणाची प्रीति उत्पन्न केली पाहिजे. म्हणजे तो समाजामध्यें सहवास व सहकार यांना योग्य होतो.

राज्यतंत्राच्या कार्यक्षेत्राविषयीं व अधिकार क्षेत्राविषयीं भिन्न मतें आहेत. लोकांच्या जीवनक्रमांत राज्यतंत्राचा हात किती असावा, तो शक्य तितका अधिक असावा किंवा शक्य तितका कमी असावा? सर्व लोकांच्या हिताच्या दृष्टीने राज्यतंत्राच्या कार्याचें योग्य क्षेत्र काय असलें पाहिजे? या प्रश्नांना निरनिराळ्या संप्रदायांकडून निरनिराळीं उत्तरें मिळतात.

**व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांचें** असें मत आहे की राज्यतंत्राचें कार्य शक्य तितकें मर्यादित व नियंत्रण शक्य तितकें अल्प असावें; कारण राज्यतंत्र ही कांही उत्तम संस्था आहे असें नाही. ती लोकरक्षणाच्या दृष्टीने अवश्य आहे, एवढेंच. तिचें काम रक्षण करण्याचें व न्याय दानाचें आहे. इतर कार्यांत व गोष्टींत व्यक्तीला मोकळीक व स्वातंत्र्य पाहिजे.

**समाजसत्तावाद्यांचें** असें मत आहे की राज्यतंत्राचें कार्य, व त्याचें नियंत्रण शक्य तितकें व्यापक व अधिक असावें, कारण राज्यतंत्र ही नुसती रक्षणात्मक व इतर कांही अपरिहार्य गोष्टी करण्याच्या उपयोगी पडणारी संस्था नसून ती लोकहितकारक संस्था आहे. तिने शैक्षणिक, सांस्कृतिक व लोकहितसंवर्धक कार्यें करणें व तत्संबंधीं व निर्बंध नियंत्रण घालणें हें इष्ट आहे. व्यक्तीला आपलें संपूर्ण हित कळत नाही आणि कळलें तरी राजसत्तेने त्याकडे लक्ष दिल्यावाचून व तिला साहाय्य केल्यावाचून तें सुलभतेने साधतां येत नाही.

**अराजकतावादी, समाजसमतावादी व समुदायवादी** यांच्या मतें राज्यतंत्राची, त्याच्या नियंत्रणाची व साहाय्याची मुळीच गरज नाही. मनुष्य हा स्वभावतःच चांगला असल्यामुळें तो अपराध व कलह करणार नाही. तेव्हा त्याच्या रक्षणाची व नियंत्रणाची आवश्यकता नाहीं. त्याला आरंभींच योग्य व समानतेची सामुदायिक परिस्थिति प्राप्त करून दिली तर तो स्वेच्छेने संघ व समुदाय निर्माण करून आपलीं कामें करील आणि आपल्या सामाजिक इच्छा व आकांक्षा तृप्त करील. इतरांशीं भांडण्याचें व लढण्याचें त्याला प्रयोजनच उरणार नाही, कारण वैयक्तिक मिळकतीचें व वैयक्तिक सत्तेचें तत्त्व अशा समाजांत प्रतिष्ठित नसल्यामुळें काम, क्रोध व लोभ ह्यांच्या द्वारें होणारे अपराध घडणार नाहीत. आणि प्रत्येक श्रम करणाऱ्या मनुष्याची अन्नवस्त्राची, औषधपाण्याची, राहण्याची, विश्रांतीची व सुखाची योग्य व्यवस्था झाली म्हणजे समाजांत अपराध घडणार नाहीत आणि त्याला आपलें जरूरीचें रोजचें काम करून मानसिक, सांस्कृतिक व आध्यात्मिक उन्नतीला पुष्कळ अवसर मिळेल.

**व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांच्या** मतें प्रत्येक मनुष्याने आपला कारभार व कार्य आपणच स्वतंत्रपणें करावीं. तें करण्याचा त्याचा अधिकार आहे.

स्वातंत्र्य हा मनुष्यमात्राचा अमूल्य ठेवा होय. मनुष्याला आपलें स्वतःचें हित अधिक कळतें व तें साधतां येतें. त्याला स्वतःच्या उन्नत्यर्थ आपल्या इच्छेप्रमाणें श्रमसाहस करावयाला आणि आपल्या योग्यतेप्रमाणें यशस्वी किंवा अपेशी व्हावयाला मोकळीक असावी. या मतामध्यें मनुष्याच्या व्यक्तित्त्वाला व स्वातंत्र्यवृत्तीला जागा आहे. तेथे सर्वांत योग्य मनुष्यें पुढें येतील व जगतील. तीं अनेक प्रकारचे प्रयत्न व साहस करणारीं निघतील. आळशी व चुकार माणसें मागे पडतील. त्यामुळें समाज तितका संपन्न व बळकट होईल. पण ह्या मताचे कांहीं दुष्परिणामही आहेत. विशेष समर्थ लोक स्वार्थानें प्रेरित झाले तर समाजांत दुःस्थिति उत्पन्न करून देतील, त्यांच्या हातांत संपत्ति, सत्ता व स्वातंत्र्य एकवटल्याने त्यांचा दुरुपयोग होईल. यामुळें सद्‌गुणी व दुर्बल यांना त्रास व दुःख सोसावें लागेल. सामान्य मनुष्यांना स्वातंत्र्य दिलें तरी त्यांना आपलें खरें हित समजत नाहीं व साधतां येत नाही. तेव्हा वाईट परिस्थितींत व समर्थांशीं चढाओढ करून त्यांना तें कसें साधतां येईल? राज्यतंत्राच्या तटस्थपणामुळें पुष्कळ सामान्य लोकांना छळ व जाच, दुःख व दारिद्र्य हीं सोसावीं लागलीं आहेत. त्यांना जीवनाला आवश्यक व आरोग्याला पोषक अशा गोष्टी मिळालेल्या नाहीत. उलट, त्यांच्या स्वाभाविक इच्छा आणि कायिक व मानसिक आकांक्षा अतृप्त राहून त्यांना रोगराई, अकालीं वार्धक्य, पंगुपणा अथवा मृत्यु यांनी ग्रासिलें आहे, आणि कौटुंबिक व सांस्कृतिक जीवनाचें स्वास्थ्य, आश्रय व आनंद त्यांना मिळालेला नाही. तेव्हा समर्थ व्यक्तींच्या नाही तरी सामान्य व्यक्तींच्या जीवनाच्या व सुखाच्या दृष्टीने व्यक्तिस्वातंत्र्यवाद हा अनिष्ट आहे. नुसतें त्याच्या रक्षणाच्या दृष्टीने नव्हे तर हिताच्या दृष्टीने सुद्धा व्यक्तिस्वातंत्र्याचें योग्य नियंत्रण पाहिजे. स्वार्थी चढाओढीने नव्हे तर एकमेकांच्या सहकारितेने आणि राज्यतंत्राच्या साहाय्याने प्रत्येक व्यक्तीचें हित साधणें शक्य व सुलभ आहे.

समासत्तावाद्यांचें मत व्यक्तींच्या सामुदायिक प्रयत्नावर व सामाजिक सत्तेच्या नियंत्रणावर बसविलेलें आहे. त्यायोगें श्रमाचा व्यर्थ व्यय वांचतो आणि घातक चढाओढ थांबते. संपत्तीचें उत्पादन अधिक होतें. संपत्तीची वाटणी सम व न्याय्य होते. सर्वांना सारखी संधि मिळते. दुर्बल निराश्रित

व विपद्ग्रस्त ह्यांचें बलिष्ठांपासून रक्षण होतें. सत्ता व संपत्ति थोड्यांच्या हातांत एकवटत नाही. सामुदायिक प्रगतीमध्यें व सुखामध्येंच वैयक्तिक प्रगतीचा व सुखाचा सर्वोत्तम मार्ग आहे. विषम परिस्थितीमध्यें साप-डलेला मनुष्य एकटाच असला तर खचून जाईल आणि कपटी व पापपुण्य न मानणाऱ्या लोकांच्या भक्ष्यस्थानीं पडेल. अव्यवस्थित व व्यक्तिप्रधान समाजांत योग्य चढाओढ होऊं शकत नाही. ज्याच्या प्रतिबंधासाठी राज्य सत्तेचा उदय झाला तो मात्स्यन्याय पुन्हा निराळ्या पण अधिक हानि-कारक स्वरूपांत अवतीर्ण होतो व मनुष्यांमनुष्यांमध्यें शांतता, समता व सख्य नांदत नाही. बलिष्ठांचें भय जिकडे तिकडे पसरतें.

प्रचलित मत मध्यमवृत्तीचें आहे. कोणत्याही तत्त्वाचा अतिरेक न करतां, ज्याच्या योगाने समर्थ किंवा अलौकिक व्यक्तींचा कोंडमारा होणार नाही आणि दुर्बळ, निराश्रित व सामान्य लोकांचेंही योग्य रक्षण व पोषण समाजसत्तेच्या नियंत्रणाखाली होईल अशी व्यवस्था अमलांत आणावी असें आजकालच्या तत्त्वज्ञांचें व समाजधुरीणांचें मत दिसतें. त्याच्या योगें वर्गावर्गांतील, वर्णावर्णांतील, श्रीमंत व दरिद्री, उच्च व नीच, सुखी व दुःखी यांच्यांतील कलह नाहीसे होतील. राज्यतंत्राची कार्यें रक्षणात्मक व पोषणात्मक असावींत, आणि त्याने लोकांची क्षमता व आवश्यकता लक्षांत घेऊन त्या कार्याची योजना करावी. त्याने सर्वां-च्या हिताकडे लक्ष पुरवावें, सर्वांना आर्थिक व नैतिक, कायिक व मान-सिक सुरक्षितता द्यावी आणि श्रेष्ठजीवन घालविण्याची संधि व परि-स्थिति उत्पन्न करावी.

राजतंत्राचा देशांतील व्यक्तीशीं व धार्मिक पंथ व संघ, आर्थिक संघ व संस्था, शिक्षणसंस्था व विद्यापीठें इत्यादि राजकीय नसलेल्या संस्थांशीं असलेल्या संबंधांचा दोन प्रकारें विचार करतां येईल. राज्य हें जर सर्व-क्षम व सर्वातीत किंवा परिपूर्ण व बुद्धिमय किंवा समाजाचें खरें हित व इच्छा प्रकट करणारें किंवा मनुष्याच्या समाज प्रवृत्तींचें सर्वश्रेष्ठ साध्य असें मानलें तर व्यक्तीवर व व्यक्तिसमूहांवर त्याचें पूर्ण नियंत्रण पाहिजे. अर्थात् या तत्त्वानुसार व्यक्तीच्या व समूहाच्या स्वतंत्र वृत्तींचें व विरोधाचें सामान्यतः समर्थन करतां येत नाही. पण राज्य हें केवळ साधन धरलें

तर किंवा अवश्य आपत्ति आहे असें मानलें तर व्यक्तींच्या व समूहांच्या मार्गांतील कंटक व अडथळे दूर करण्या पुरतेंच नियंत्रण व सत्ता त्याचे हातांत असावी हें योग्य ठरेल. ह्या मताच्या दृष्टीने व्यक्तींना व समूहांना खरें अस्तित्व व स्वतंत्र अधिकार असतात. त्यांच्या मधील विरोध व कलह नाहीसे करण्यासाठी आणि दुसऱ्या व्यक्तींच्या व समूहांच्या हित संबंधाचा निर्णय करण्यासाठी राज्यसत्तेचें कांही नियंत्रण मान्य केलें पाहिजे यांत शंका नाही. तरी पण नीतिदृष्टया, विवेकदृष्टया किंवा समाजदृष्टया अमर्याद सत्ताधारित्व राज्यसत्तेकडे येऊं शकत नाही.

या दोन्ही मतांमध्यें कलह होणें हें अपरिहार्य आहे, किंवा त्या दोहोंचा समन्वय करून कांही मध्यम मार्ग काढतां येईल हा सध्याच्या तत्त्वज्ञांपुढे, मुत्सद्यांपुढे व राष्ट्रधुरीणांपुढे एक मोठा प्रश्न आहे.

---

## प्रकरण तेरावें

# लोकसत्ता

पूर्वीची राजसत्तात्मक, वर्णसत्तात्मक व अल्पजनसत्तात्मक राज्यपद्धति जाऊन सांप्रत लोकसत्तात्मक पद्धतीला विशेष मान आला आहे व तिचा विशेष प्रचार झाला आहे. ज्या राज्यपद्धतीमध्यें जनतेंतील बहुसंख्येच्या हातांत राजकीय अधिसत्ता असते व त्यांच्या प्रतिनिधींच्या सभेच्या हातांत नैर्बंधिक अधिसत्ता असते ती लोकसत्तात्मक राज्यपद्धति होय. या पद्धतीचें स्वरूप व घटना स्थलकालानुसार बदललेली आहे. अमेरिकेचे प्रेसिडेंट ॲब्रहाम लिंकन यांच्या मतें "लोकांचे, लोकांनी व लोकहितांसाठी चालविलेलें राज्य" हें लोकसत्तात्मक राज्य होय. तें राज्य सर्वांचे व सर्वांसाठी असते. सांप्रत लोकसत्तात्मक राज्यपद्धति निर्माण करण्याकडे राजकीय चळवळीचा मुख्य कल आहे. ही पद्धति पूर्वीसारखी सर्व नागरिकांची प्रत्यक्ष परिषद अशा स्वरूपाची नसून त्यांच्या प्रतिनिधींची सभा या स्वरूपाची आहे. ह्या सभेमध्यें सर्व नागरिक स्वतः उपस्थित

नसून ते आपल्या प्रतिनिधींच्या द्वारें हजर असतात. आणि त्यांच्या संमतीने, त्यांनी केलेल्या निर्बन्धाने व त्यांना जबाबदार राहून राज्यकारभार चालतो.

प्राचीन राजनीतिकारांनी प्रतिपादलेलें तत्त्वज्ञान व इतिहासांतील राजकीय घटना व गोष्टी यावरून निष्पन्न होणारें तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासाने आणि गत व वर्तमान राजकीय संस्थांच्या गुणदोषांच्या अनुभवाने राज्यशास्त्राचा विचार करणाऱ्या पुरुषांची, लोकसत्तात्मक राज्यपद्धति ही उत्तम पद्धति आहे, हें मत स्वीकारण्याकडे व प्रतिपादण्याकडे प्रवृत्ति झाली आहे. त्यांच्या मतें मनुष्यांच्या व्यवहाराचें नियमन, हिताचें पालन व नीतीचें पोषण हीं करण्याचा पूर्ण अधिकार लोकमताला असला पाहिजे. समाजाची अंतिम अधिसत्ता राज्यघटनेनुरूप लोकांमध्यें वास्तव्य करीत असली पाहिजे. लोकांनी निवडलेल्या व रचलेल्या प्रातिनिधिक सभांच्या द्वारें त्यांचा सर्व व्यवहार व कारभार चालला पाहिजे.

लोकसत्तेच्या मुळाशीं व्यक्तींच्या समानतेची, स्वातंत्र्याची व शीलत्वाची मुख्य कल्पना आहे. प्रत्येक सामान्य मनुष्याला सामाजिक व राजकीय घटनेमध्यें आणि आर्थिक व धार्मिक व्यवहारांमध्यें स्वातंत्र्य व सिमानता दिली पाहिजे. त्याला योग्य संधि मिळाली तर तो आपली आर्थिक, नैतिक, मानसिक व आध्यात्मिक उन्नति करून घेईल आणि त्यायोगें समाजाची उन्नति होईल. तेव्हा सामाजिक, राजकीय व इतर कारभारांत व व्यवहारांत त्याला योग्य स्थान व मान, भाग व वाव मिळाला पाहिजे. त्याच्या मार्गांतील कृत्रिम अडथळे दूर झाले पाहिजेत. मनुष्यें कोणत्याही बाह्य सत्तेचे दास व पराधीन होऊं नयेत. तीं स्वाधीन व स्वतंत्र असावींत. कोणत्याही सत्तेचा उगम त्यांच्यापासून असावा व ती त्यांच्या अनुरोधाने व मताने चालावी. सत्तेला स्ववश व स्वेच्छाचारी स्थान नसावें. मनुष्यांच्या रक्षणाचें व हितवर्धनाचें ती मुख्य साधन आहे. सत्ताधीश लोकांचे अधिकार स्वैर नसून ते लोकाधीन असले पाहिजेत.

समतेच्या दृष्टीने कोणत्याही मनुष्याला, जातीला अथवा संघाला विशेष मान व अधिकार नसावेत आणि प्रत्येक मनुष्याला समाजांत सारखें स्थान मिळावें. स्वातंत्र्याच्या दृष्टीने प्रत्येकाला आपल्या इच्छा व शक्ति

यांना अनुसरून पुरे वाढण्याची व वर्तण्याची संधि असावी. बंधुतेच्या दृष्टीने प्रत्येक मनुष्याला सहकार्याला व सेवेला मोकळीक असावी. लोकसत्ता ही सामान्य मनुष्यांची सार्वजनिक दृष्टि, समाजशीलता, सामर्थ्य व योग्यता यांच्यावर अधिष्ठित आहे. तेव्हा सामान्य मनुष्याला या दृष्टीने अधिकारी पुरुष करणें अवश्य आहे. त्याचा लोभ व भीति, स्वार्थ व स्वच्छंद कमी केला पाहिजे. लोकांची योग्यता, समजुती, शिक्षण, कार्यक्षमता व सार्वजनिक दृष्टि ह्या उच्चतर नसल्या तर लोकसत्ता यशस्वी होणार नाही. त्यांचें मन व दृष्टि कनिष्ठ प्रतीची असली तर त्यांच्या हातांत सत्ता ठेवणें विशेष धोक्याचें आहे. सत्ताधारी व धोरण बांधणारे हे शहाणे, दूरदृष्टीचे, समतावृत्तीचे, सार्वजनिक हितबुद्धीचे, न्यायशीलतेचे व लोकहितार्थी पाहिजेत.

लोकसत्ता सुसंघटित व फलदायी कशी करावयाची हा सांप्रतचा मोठा प्रश्न आहे. तद्वतच, ह्या घटनेमध्यें लोकांच्या इच्छा व विचार बरोबर कसे प्रदर्शित करावयाचे आणि कोणत्या संस्थांच्या व समजुतींच्या द्वारें त्यांचें दिग्दर्शन व अंमल करावयाचा? लोकसत्तेला शासनव्यवस्थेंत व राज्यतंत्रांत अधिष्ठित व मुद्रित करावयाचे योग्य प्रकार कोणते?—हें आपणास पाहावयाचें आहे. म्हणून राज्यतंत्राच्या निबंधकारी, कार्यकारी व न्यायप्रकारी सत्तेचें नियमन करण्याबद्दलचीं लोकशाहीचीं तत्त्वें व योजना कोणत्या आहेत ह्याचा विचार झाला पाहिजे.

ज्या अनेक मार्गांनी व उपायांनी लोकसत्ता संघटित करावयाचा प्रयत्न आज चालला आहे त्यांपैकी लोकप्रतिनिधित्वाची पद्धत हा एक मुख्य व महत्त्वाचा मार्ग आहे आणि सर्व लोकसत्तात्मक संस्थांचा व समाजांचा तो मुख्य आधार आहे. त्याच्याच योगें लोकसत्ता यशस्वी होणें शक्य आहे. पूर्वी प्रतिनिधित्वाची पद्धत स्थानिक लोकसभांत, ग्राम व जातिपंचायतींत एक प्रकारें चालू होती. पण आज तिचा उपयोग व योजना मध्यवर्ती व प्रांतिक राज्यतंत्राच्या रचनेंत परिणत स्वरूपांत केला जात आहे. प्रातिनिधिक राज्यपद्धतींत दोन उद्देश दृष्टीसमोर ठेवावे लागतात. एक राज्यतंत्र हें जनतेच्या आधीन व तिला उत्तरदायी असलें पाहिजे;

आणि दुसरा, त्याने राज्यसत्ताधारी जी जनता तिची इच्छा व मत योग्य-प्रकारें प्रदर्शित केलें पाहिजे.

ह्या लोकप्रतिनिधिसत्तात्मक राज्यतंत्राची रचना करतांना अनेक प्रश्नांचा विचार व निर्णय करावा लागतो आणि तो लोकांचा अनुभव, इच्छा व समाजस्थिति यांवर अवलंबून असतो. त्यांपैकी मुख्य प्रश्न म्हणजे मताधिकाराचें क्षेत्र व पद्धत. प्रत्येक वयांत आलेल्या, राज्यनिष्ठ, शरीरानें पंगु व मनानें भ्रमिष्ट नसलेल्या आणि विशेष शिक्षा न झालेल्या व्यक्तीला मतदानाचा अधिकार असला पाहिजे. प्रत्येकाला स्वहित समजतें म्हणून तें दिग्दर्शित करण्याची त्याला संधि, साधन व अधिकार मिळाला पाहिजे आणि लोकसभेंत आपला प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार त्याला असला पाहिजे. त्यायोगें त्याला नको असतील त्या गोष्टींचा विरोध करणें व पाहिजे असतील त्या मागणें हें करतां येतें. मतदानाचा अधि-कार दिल्यानें सार्वजनिक कार्याविषयीं त्याच्यामध्यें जाणीव व आवड उत्पन्न होते, त्याचें मन राजकारणामध्यें विचारी व सुशिक्षित होतें आणि आपलें हित समाजहिताशीं निगडित झालें आहे अशी त्याची भावना व समजूत होते. महत्त्वाच्या व गुंतागुंतीच्या सार्वजनिक प्रश्नांचा विचार करण्याची आवश्यकता व संधि प्राप्त झाल्याने त्याच्या बुद्धीचा व हितकल्पनेचा विकास होतो आणि तो राज्याचा एक कार्यक्षम, विचारी व उत्साही घटक होतो.

व्यक्तिस्वातंत्र्यवादी व व्यक्तिसमतावादी हे दोघेही सार्वजनिक मताधिकाराचा पुरस्कार करतात. दोघेही लोकशाही आपलें ध्येय आहे असें सांगतात. व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांचें मत दोन सिद्धांतांवर अवलंबून आहे. एक व्यक्तीला स्वहित समजतें आणि तें पाहण्याचें त्याला स्वातंत्र्य व अधिकार पाहिजे. दुसरा, पुष्कळांचें पुष्कळ सुख पाहणें. ह्या दोन सिद्धांतांला अनुसरून सर्वांना मत देण्याचा व प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार असला पाहिजे. म्हणजे व्यक्तींना स्वातंत्र्य व स्वहित प्राप्त होईल.

व्यक्तिसमतावाद्यांचें मत दोन सिद्धांतांवर अवलंबून आहे. एक व्यक्तींची समता आणि दुसरा राज्याच्या सर्व कारभारावर व व्यवहारा-वर समाजाचें पूर्ण स्वामित्व व सत्ता असणें, ह्या दोन सिद्धांतांला अनु-

सरून सर्वांना मत देण्याचा व प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार असला पाहिजे. म्हणजे सर्वांच्या हितसंबंधाचें अधिकांत अधिक पालन पोषण होऊन व्यक्तीची समता व सामाजिक हित साधेल. तेव्हा एकाच्या मतें व्यक्तीच्या हिताच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने आणि दुसऱ्याच्या मतें समाजहिताच्या व व्यक्तिसमतेच्या दृष्टीने मताधिकार हा अवश्य आहे.

ह्या सार्वजनिक मतदान पद्धतीच्या विरुद्धही मतें आहेत. त्या विरोधकांचें प्रतिपादन असें आहे की प्रत्येक वयांत आलेल्या व्यक्तीला आपलें हित समजण्याची पात्रता नसते. म्हणून त्याला त्याचें रक्षण किंवा प्राप्ति करतां येत नाही. व्यक्ति ह्या समान नसतात व पूर्ण स्वतंत्रतेसही योग्य नसतात. त्या बहुतेक गोष्टींविषयीं उदासीन असतात. त्यांना सार्वजनिक हितबुद्धि नसते. मताधिकाराचें त्यांना महत्त्व वाटत नाही आणि मतही देण्याची अंगीं पात्रता नसते. स्वतःचें हित ज्यांना समजत नाही त्यांना सार्वजनिक हित काय समजणार ? त्यांच्या अज्ञानामुळें त्यांची वृत्ति व दृष्टि संकुचित असते आणि ते आपलें कुटुंब, जाति किंवा गांव यापुरतें पाहतात. आपले आप्तेष्ट, चालीरीती व स्थानिक हितसंबंध यांच्यामध्यें ते गुरफटलेले असतात. सामान्यतः ते तात्कालिक उमाळ्यामुळें व भावनाविवश होऊन वागतात. त्यांना विचार, दूरदृष्टि व दूरचा पोंच नसतो. दारिद्र्यामुळें, अज्ञानामुळें व लोभामुळें आपल्या व समाजाच्या उच्चतम कल्याणाचा विचार न करतां जो सर्वांत अधिक मोल देईल त्याला ते आपलें मत विकतात. सर्वांत चांगला मनुष्य असेल त्यालाच ते मतें देतील असें नाही. साधारणतः पुराणमताच्या पक्षाकडे आणि चालू संस्था व धोरण चालविण्याकडे त्यांचा कल असतो. ते पुष्कळसे परंपराप्रिय व गतानुगतिक वृत्तीचे असतात. समाजाच्या सुधारणेकडे त्यांचें मन वळत नाही. तिचें त्यांच्या बुद्धीला आकलन होत नाही.

तेव्हा जेथे राज्याचें शासन व कारभार अधिकाधिक गुंतागुंतीचे व सूक्ष्म निरीक्षणाचे होत चालले आहेत आणि जेथे विशेष ज्ञान, विस्तृत अनुभव व आकलनबुद्धि यांची जरूरी भासते, तेथे अशा मूढांचें व स्वार्थी लोकांचें काय काम आहे ? सर्व व्यवहारांना आधारभूत असणाऱ्या आर्थिक व सामाजिक शास्त्रांचें ज्ञान त्यांना असलें तरच ते नवे हितकर

निर्बंध करूं शकतील, उत्तम धोरण ठेवतील व चांगला न्याय देतील. अशा कामाला तज्ज्ञांची व शहाण्यांची आवश्यकता दिवसेंदिवस अधिक भासत आहे. पण हे तज्ज्ञ व पुढारी निःस्वार्थी शीलाचे व समाजहितदृष्टीचे पाहिजेत आणि समाजाचा त्यांच्या प्रामाणिकतेवर विश्वास पाहिजे. असें ज्ञान, शील व परोपकारबुद्धि प्रत्येक मतधारी व्यक्तीमध्यें सापडतील अशी अपेक्षा आपण करतां कामा नये. सामान्य व्यक्तीच्या येण्यामुळें निर्बंधमंडळाचें व निर्बंधाचें स्वरूप सामान्यप्रतीचें व स्थितिपोषक होईल. त्यांच्या बहुमतांमुळे थोर व्यक्तींना व थोर कार्यांना मागे पडावें लागेल.

आतां, व्यक्तींतील स्वाभाविक शक्ति जागृत करावयाची आणि त्याला व त्याच्या समाजाला वरच्या पदवीला नेऊन पोचवावयाचा जर आपला उद्देश असेल तर तो त्याला स्वतःची वाढ करावयाला संधि दिल्यावाचन साधणार नाही. प्रथम या कामांत अपयशही येईल. पण अपयशामुळे मिळालेल्या अनुभवाच्या साहाय्यानेंच समाजाला प्रगतीच्या योग्य मार्गाला लावतां येईल. व्यक्तीला प्रयत्न करण्याची संधि मिळाली पाहिजे. त्याला राज्यशासनांत व राज्यकारभारांत भाग व मताधिकार मिळाला पाहिजे, नुसते मूक प्रजाजन राहून त्यांच्यामध्यें आत्मविश्वास व कर्तृत्व उत्पन्न होणार नाही. स्वराज्याचे भागीदार व सहकारी झाल्यावाचून त्यांची प्रगति होणार नाही; त्यांच्यामध्यें उत्साह व उल्हास उत्पन्न न होतां त्यांचा उत्कर्षही होणार नाही; त्यांना अनुभव, समयसूचकता व धीर येणार नाही आणि ते स्वराज्याचे समजदार, बळकट व आपत्तीस तोंड देणारे नागरिक बनणार नाहीत.

सांप्रतची प्रवृत्ति वयांत आलेल्या प्रत्येक जाणत्या व्यक्तीला मत देण्याची आहे. मात्र त्याने राज्याच्या बळकटीला व शांततामय प्रगतीला विघातक असा राज्यद्रोही अपराध केलेला नसला म्हणजे झालें. जर तो राज्याचा द्रोही असला तर तो त्या राज्याचा खरा नागरिक होऊं शकत नाही. ह्या अपवादाव्यतिरिक्त मतदानाचा अधिकार प्रत्येक व्यक्तीला देण्यामध्यें सामान्यतः दुसऱ्या अटी नसतात. पण प्रत्येक राज्यघटनेंत राज्याच्या आवश्यकतेप्रमाणें व आकांक्षेप्रमाणें शिक्षण, वास्तव्य, करदान, मिळकत, वंश इत्यादि संबंधीं एखाददुसरी अट घातलेली असते. त्या

अटींचा उद्देश विशेषत: नागरिक हा जबाबदारवृत्तीचा आणि देशहिताशीं व संस्कृतीशीं सुलभतेने तद्रूप होणारा पाहिजे असा असतो. नाहीतर अशा अटी लोकशाहीच्या सार्वजनिक मतदानपद्धतीच्या विरुद्धच आहेत. पण त्या देशाच्या हितरक्षणार्थ घालाव्या लागतात. देशहिताशीं तादात्म्य होणारी व देशाच्या हिताबद्दल खरी कळकळ असणारीं माणसेंच मतदानास योग्य आहेत. जॉन स्टुअर्ट मिल्लच्या मतें "सामान्य मताधिकारी वर्गाच्या मनांत आपलें मत द्यावयाला जाण्याइतकी राज्यसंस्थेविषयीं आस्था उत्पन्न झालेली नसेल अथवा त्यांनी जाऊन मत दिलेंच तर तें सार्वजनिक दृष्टीने न दिलें जातां त्याची विक्री करून अथवा त्यांच्यावर ज्यांचें वर्चस्व आहे व त्यांना ज्यांना प्रसन्न करावयाचें आहे अशा व्यक्तींच्या सांगण्या-वरून दिलें जात असेल तर तसल्या प्रातिनिधिक संस्थांचा कांही उप-योग नाही. अशा स्थितींत त्या संस्था म्हणजे दुसऱ्यावर अत्याचार करावयाचें व कारस्थानें रचावयाचें एक साधन होतील. अशा रीतीने झालेली निवडणूक कुराज्याला प्रतिबंधक न होतां, उलट त्याच्या यंत्रसामग्रींतलें आणखी एक चक्र बनते." आधुनिक लोक-सत्तेची कल्पना ह्या मताहून थोडी भिन्न आहे. तुम्हाला वाटेल तर योग्य अशीं बंधनें घाला; पण प्रत्येक वयांत आलेल्या जाणत्या स्त्री-पुरुषाला मतधारक संघांत स्थान देऊन सार्वजनिक कामांत त्याला भाग घेऊं द्या. बंधनें घालणें अवश्य आहे, कारण वर पुरस्कारलेल्या मतदान पद्धतींत स्वार्थाकडे कल असतो आणि अज्ञानाचा गौरव होण्याचा संभव असतो. सर्वांचें राज्य असलें म्हणजे तें तेवढ्यामुळें सर्वांच्या हिताचें होतें असें नाही. त्यांत स्वार्थरहित व बुद्धिप्रधान लोकांना वाव असावा म्हणजे लोकांचें सार्वजनिक हिताकडे लक्ष जाईल आणि ज्ञानाची व नवी-नतेची उणीव भरून निघेल.

प्रतिनिधींच्या पात्रतेवर प्रातिनिधिक लोकसत्तेचें यश अवलंबून आहे. प्रत्येक निवडलेल्या सभासदाला प्रतिनिधीनें काम सर्वांत चांगल्या रीतीने कसें पार पाडावयाचें हें समजण्याची शक्ति पाहिजे. निरनिराळ्या महत्त्वाच्या व गुंतागुंतीच्या प्रश्नांचा त्याला अभ्यास करतां आला पाहिजे; त्यांचें महत्त्व ठरवितां आलें पाहिजे आणि एकंदर देशाच्या व आपल्या

मतदारसंघाच्या हितावर त्यांचा काय परिणाम होईल याविषयीं स्वतःचें स्वतंत्र मत बनवितां आलें पाहिजे. याकरतां तो सुशिक्षित, स्वतंत्र विचाराचा, निःस्वार्थी, समजूतदार व दूरदृष्टीचा पाहिजे; नुसता मान डोलविणारा नको. सामान्य लोकांना राज्याच्या महत्त्वाच्या व तांतडीच्या कारभारासंबंधीं मतें बनवावयाला पुरेसा वेळ, संधि, शिक्षण, योग्यता व इच्छा हीं नसतात.

प्रत्येक प्रतिनिधीमध्यें सभासदत्वाच्या कामाचा भार अंगावर घ्यावयाची पात्रता पाहिजे. त्याला अत्यंत आवश्यक असणारे गुण म्हणजे तो भीति व लोभ यामुळें शीलभ्रष्ट होता कामा नये. नाही तर त्याच्याकडून आपल्याच मतदारसंघाचा व राज्याच्या हिताचा घात व्हावयाचा. राष्ट्रहिताचा त्याला प्रामाणिकपणें पुरस्कार करतां आला पाहिजे आणि त्याला राज्याची सुस्थिति व कल्याण कशांत आहे हें समजण्याची पात्रता पाहिजे. म्हणजे त्याच्यावर राजकीय अधिकार सोपविणें इष्ट होईल. उद्योगाची व सार्वजनिक कामाची गोडी आणि कोणत्याही कठिण, भीतीच्या व मोहाच्या प्रसंगीं बुद्धीचा स्थिरपणा व मनाचा करारीपणा, हे गुण त्याच्यांत सामान्यतः असले पाहिजेत. त्याचें वय, वित्त, वास्तव्य, व्यवसाय, शिक्षण इत्यादि संबंधाच्या अटी ह्या ज्या त्या देशाच्या परिस्थितीनुसार ठरतील व पालटतील. राज्यद्रोह हा प्रतिनिधित्वाला अपात्र करणारा अपराध आहे. अशा योग्य प्रतिनिधींच्या योगें सामान्य मतदारांचें अज्ञान व स्वार्थ यांना राज्यकारभाराच्या दृष्टीने आळा बसतो.

निवडलेला सभासद हा मतधारकांचा प्रतिनिधि असावा कां प्रतिध्वनि असावा म्हणजे मतधारकांचें आपल्या सभासदावर कितपत नियंत्रण व कितपत विश्वास असावा व त्याने लोकसभेंत कसें वागावे, हें समजणें आवश्यक आहे. खऱ्या प्रतिनिधित्वाचें लक्षण सामान्यतः मतधारकांच्या मतांचा पुरस्कार करणें आणि त्यांचा विरोध व विपर्यास न करणें हें होय. निवडणुकीच्या वेळेसच प्रतिनिधीची योग्यता, नीतिमत्ता व बुद्धिमत्ता ह्या पाहिल्या पाहिजेत. प्रतिनिधि झाल्यावर त्याने कसें वागावें हें महत्त्वाचें आहे. त्या सभासदाने मतदारसंघाच्या मतांचें प्रतिबिंब व प्रतिध्वनि व्हावें कां सभेच्या पुढे येणाऱ्या प्रश्नांचा त्याने मतदारांच्या वतीने पण स्वतंत्र-

पणें व लोकहितदृष्टया विचार व निर्णय करावा? एक प्रकार, त्याने मतदारसंघाच्या तंतोतंत निर्देशाप्रमाणें व आदेशाप्रमाणें त्यांचा हस्तक म्हणून वागण्याचा; दुसरा प्रकार, त्याने सामान्यतः त्याच्या धोरणाप्रमाणें व इच्छेप्रमाणें पण स्वतंत्रपणें व प्रसंगानुसार आपली बुद्धि चालविणाऱ्या एखाद्या कर्त्याप्रमाणें वागण्याचा. नुसतें मतदारसंघाचें लोकमतच प्रदर्शित करावयाचें असेल तर पहिला प्रकार योग्य धरावा लागेल. परंतु जर त्याला मतदारांच्या वतीने विचारविनिमय व वाटाघाट करावयाची आणि प्रसंगानुरूप स्वतंत्र बुद्धीने मत द्यावयाचें असेल तर दुसरा प्रकार योग्य धरावा लागेल.

प्रत्येक सभासदाला कांहीतरी स्वातंत्र्य पाहिजे व स्वतःच्या योग्यतेबद्दल विश्वास पाहिजे. म्हणजे तो सार्वजनिक व महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं योग्य विचार करील व निर्णय देईल. मतदारांचीं मतें सामान्यतः अज्ञानमूलक व भावनामूलक असतात. प्रतिनिधींचीं मतें अभ्यासाने, अनुभवाने व विचाराने बनलेलीं असतात. तेव्हा प्रतिनिधीवर मतदारांचें नियंत्रण विशेष असूं नये. म्हणजेच तो राज्याचा खरा हितकर्ता आणि लोकांचा खंबीर प्रतिनिधि होईल.

प्रतिनिधि हे सामान्यपणें लोकमताचे निदर्शक व त्याला जबाबदार रहावेत म्हणून निवडणुकीच्या व प्रतिनिधित्वाच्या मर्यादा ठरविणें अवश्य असतें. मतदार हे वारंवार पालटत असतात. त्यांचीं मतें स्थिर असतात असें नाही. त्यांच्यापुढे नवे नवे प्रश्न उत्पन्न होतात. निवडलेले सभासदही त्याच वृत्तीचे, मताचे व योग्यतेचे राहतात असें नाही. ह्या सर्व पालटणाऱ्या गोष्टींमुळें लोकसभा ही खरी प्रातिनिधिक स्वरूपाची राहावी, लोकांचें मत सामान्यपणें तेथे प्रदर्शित व्हावें आणि तेथे नवा उत्साह यावा ह्याकरतां तीन ते पांच वर्षांच्या ठराविक अवधीने नव्या निवडणुकी करण्याची आवश्यकता उत्पन्न होते. त्यायोगें मतदार हे आपल्या मतांची व प्रतिनिधींच्या मतांची व योग्यतेची फेरतपासणी करूं शकतात आणि त्यांना आपल्याला जबाबदार ठेऊं शकतात. अत्यंत महत्त्वाचे राष्ट्रीय प्रश्न व प्रसंग उत्पन्न झाल्यास ह्या निवडणुकीच्या कालमर्यादा कमी अधिक करण्याचा अधिकार राज्यघटनेप्रमाणें कोणा तरी मोठ्या अधिकाऱ्याकडे ठेवलेला

असतो. प्रत्येक नवीन पणम हृत्त्वाची योजना संमत करण्यापूर्वी जर लोकसभेची पुनः निवडणूक केली तर आणि तिच्या बहुमताने ती मान्य झाली. तर, ती मोठी उपयुक्त योजना होईल असें ह्या विषयावरील लेखकांचें मत आहे. ह्या प्रकाराने खोटया व स्वार्थी प्रतिनिधींच्या निवडणुकीला कांही तरी आळा बसेल.

प्रत्येक मनुष्याने नुसतें आपलें स्वतःचें हित काय आहे ह्याचें ज्ञान करून घेतलें व तें साधण्याची खटपट केली आणि सार्वजनिक हिताकडे दुर्लक्ष केलें म्हणजे सर्व समुदायाचें हित साधेल असें नाही. प्रत्येक व्यक्तीनें आपल्या उदरनिर्वाहाची काळजी घेतली, स्वार्थवृत्ति धारण केली व स्वतःचेंच तेवढें हित साधण्याचा प्रयत्न केला तर त्याचें स्वतःचें तरी खरें हित साधेल काय ? मग सामुदायिक हित कोठून साधणार ? सर्वांच्या व्यक्तिगत हितांत सामुदायिक हित अंतर्भूत नाही. तें याहून विशेष, भिन्न व उच्च स्वरूपाचें आहे. समुदायाला स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व व स्वरूप त्यांतील परंपरा, एकामागून एक येणाऱ्या पिढ्या व त्यांच्या आकांक्षा ह्यामुळें प्राप्त होतें. त्याचे अंतर्गत घटक व्यक्तिशः सतत पालटत असतात. त्यामुळें प्रत्यकाने आपलें चालू हित साधल्याने समुदायाचें भावी व खरें हित साधत नाही. तें साधतां येण्यासाठी नुसता व्यक्तिवाचक हिताचा विचार करून चालत नाही; तर व्यक्तींना सार्वजनिक हिताचा विचार करण्याची सवय लागली पाहिजे व तसें त्यांना शिक्षण दिलें पाहिजे.

त्याचप्रमाणें बहुसंख्याकांचें मत हें खरें मत व अल्पसंख्याकांचें मत हें खोटें मत असें कांही नव्हे. पण आज प्रातिनिधिक लोकसभेंत बहुसंख्याकांचेंच मत ग्राह्य धरावें लागतें व अल्पसंख्याकांचें त्याज्य ठरवावें लागतें, कारण आज खऱ्याखोटयाची शास्त्रशुद्ध व सन्मान्य कसोटी आपणापाशीं नाही. त्यांतल्या त्यांत बहुसंख्याकांचें हित अथवा पुष्कळांचें पुष्कळ हित हें आपणास पाहावें लागतें. नाहीतर बहुसंख्याक आपल्या बलाने दुसरें मत मान्य करणार नाहीत आणि त्यामुळें कोणतीच समाजव्यवस्था टिकणार नाही. तिला बहुजनांचा पाठिंबा पाहिजे.

जरी अल्पसंख्याकांचा निर्णय आपणास मान्य करतां येत नाही तरी त्यांचें मत लोकसभेंत मांडण्याचा, त्याबद्दल विचारविनिमय करण्याचा

व बहुसंख्याकांच्या मताला विरोध करण्याचा त्यांना अधिकार असला पाहिजे. त्यांचें मत लोकसभेला पटविण्याला त्यांना संधि दिली पाहिजे. त्यांना मात्र बहुमताचा निर्णय मान्य करणें अवश्य आहे. तो बदलणें हें त्यांच्या चळवळीवर व आपल्यातर्फे बहुमत तयार करण्यावर अवलंबून आहे.

लोकशाहीच्या राज्यघटनेंतील महत्त्वाचा आणखी एक प्रश्न म्हणजे निवडणुकीच्या क्षेत्राचा व पद्धतीचा. लोकसभेंत निरनिराळ्या पक्षाचे प्रतिनिधि त्यांच्या संख्याप्रमाणाने यावयास पाहिजेत. त्यामध्यें नुसत्या एका बहुसंख्याक *पक्षाच्या लोकांचेच प्रतिनिधि येणें हें लोकशाहीच्या तत्त्वाविरुद्ध होईल. लोकशाही ही बहुसंख्याक पक्षाच्या मताची अनुगामी पद्धति नव्हे. लोकसभेंतील बहुमत हें अनेक भिन्न व विरोधी मतांच्या ऊहापोहानें उत्पन्न झालेलें पाहिजे. त्यासाठी लोकसभेंत सर्व पक्षांचे प्रतिनिधि पाहिजेत आणि त्यांच्या गुणदोषचर्चेने व सहकाराने राज्यकारभार चालला पाहिजे. मात्र अशा अल्पसंख्याक पक्षांना कांहीतरी विशिष्ट लोकसंख्येचा पाठिंबा असला तरच त्यांना प्रतिनिधि निवडतां येतील. कधी कधी अल्पसंख्याकांचेंच मत बरोबर असूं शकेल. तेव्हा तें मांडण्यास प्रतिनिधिसभेंत त्यांना प्रवेश व स्थान मिळालें पाहिजे. मनुष्यांचीं मतें अनुभवाने, विचाराने व प्रसंगाने पालटतात. म्हणून तेच लोक व पक्ष बहुसंख्याक अथवा अल्पसंख्याक राहत नाहीत. त्यांचें पक्षांतर व मतांतर वारंवार होतें.

प्रत्येक राज्यांत विशिष्ट व्यावसायिक वर्गांना व स्थानिक हितसंबंधांना विशेष आश्रयाची आवश्यकता असते. प्रतिनिधिसभेंत त्यांना योग्य स्थान देऊन त्यांचें विशेषत्व मान्य केलें नाही तर त्यांचें महत्त्व उरणार नाही व त्यांच्या हिताची हेळसांड होईल. त्यामुळें अडाणी व दरिद्री लोकांचें प्राबल्य वाढेल आणि ते दुसऱ्याची व देशाची हानि करतील. देशसमाज हा निरनिराळ्या वर्गांचा, हितांचा व स्थळांचा समुदाय आहे. त्यांचे सामान्य हितसंबंध एकच असले तरी त्यांचे विशेष हितसंबंध भिन्न असतात. तेव्हा कोणत्याही एका विशिष्ट वर्गाच्या, हिताच्या अथवा स्थानाच्या हातांत राज्यकारभार जाऊं नये आणि त्याला केवळ आपलें स्वतःचेंच हित साधण्यासाठी तिचा उपयोग करतां येऊं नये म्हणून राज्य-

कारभारांत सर्वांचीं मतें प्रतिध्वनित व प्रतिबिंबित झालीं पाहिजेत. त्यांच्या परस्परविरोधी हितसंबंधाविषयीं तेथे मध्यस्थी झाली पाहिजे व त्यांचा मेळ बसला पाहिजे. ज्या लोकसभेंत सर्व हितसंबंध प्रदर्शित झाले आहेत आणि सर्व पक्षांचे प्रतिनिधि उपस्थित आहेत त्या लोकसभेनें केलेले निबंध सर्व समाजाच्या विचारांशीं व भावनांशीं जुळण्याचा फार संभव आहे.

आता हे अल्पसंख्याक संघ व पक्ष आणि स्थानिक गट व हित यांचें प्रतिनिधित्व योग्य प्रकारें साधलें पाहिजे. देशाचे अगदी सारख्या क्षेत्रफळाचे किंवा लोकसंख्येचे विभाग करून त्या प्रत्येकांना एक अथवा सारखे प्रतिनिधि दिले तरी देशभर पसरलेल्या अल्पसंख्याक पक्षांचें व स्थानिक संघांचें प्रतिनिधित्व साधतां येणार नाही. कारण त्या प्रत्येक विभागांतून सामान्यत: एकच प्रतिनिधि पाठविण्याचा असल्यामुळें तेथील बहुमतवाल्यांचा प्रतिनिधि बहुतेक पाठविला जाईल आणि इतर अल्पमतवाल्यांचे प्रतिनिधि अयशस्वी होतील. मात्र एखाद्या दुसऱ्या ठिकाणीं जर त्यांची मतदार संख्या अधिक असेल तर त्यांचा प्रतिनिधि तेथे येऊं शकेल, इतर ठिकाणीं तो सहसा निवडून येणार नाही. राज्यांत सर्व देशभर पसरलेले अनेक पक्षांचे लोक असतात. त्यांपैकी कांहींचें कोणत्याच विशिष्ट ठिकाणीं बहुमत असत नाही. तेव्हा अशा पक्षांना आपल्या संख्येनुसार प्रमाणशीर प्रतिनिधि मिळणें हें एका विभागाला एक प्रतिनिधि या पद्धतींत कठीण जातें. म्हणून एक नवीन प्रमाणशीर-प्रतिनिधि-पद्धति सुचविली आहे. मात्र प्रत्येक संघटित पक्षाची लोकसंख्या निदान एक प्रतिनिधि निवडून येण्यास आवश्यक असलेल्या मतदारांच्या संख्येइतकी कमींत कमी असलीच पाहिजे. प्रमाणशीर पद्धतींत निवडणुकीचें क्षेत्र मोठें करावें लागतें आणि त्यामधून अनेक, पण लोकसंख्येच्या मानानें ठराविक प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार ठेवावा लागतो. ह्या प्रत्येक क्षेत्रामध्यें प्रत्येक मतदाराला जितके प्रतिनिधि तितकीं मतें असतात आणि त्याला तीं ठराविक मतें आपल्या आवडीच्या क्रमानुसार, उमेदवारांमध्यें, पहिलें अमक्याला दुसरें तमक्याला अशीं द्यावीं लागतात. त्यानें आपल्या आवडीचा क्रम आपलीं सगळीं मतें उपयोगांत आणून दाखविला पाहिजे असें नाही. आपल्याला जे उमेदवार संमत असतील तेवढ्यांच्या नांवांपुढे पसंतीची

फुली आवडीच्या क्रमानुसार केली म्हणजे झालें. ज्या उमेदवारांना निवडून येण्याला आवश्यक इतकीं पहिल्या पसंतीचीं मतें मिळतील तो खास निवडून येईल. ह्या आवश्यक मतांची संख्या निवडणुकींत मतदारांनी दिलेल्या मतांचें प्रतिनिधींच्या संख्येशीं जें प्रमाण पडेल त्यावर अवलंबून असते. एखाद्या उमेदवाराला जर पहिल्या पसंतीचीं मतें पुष्कळ मिळालीं तर त्याला निवडून येण्याला लागणारीं आवश्यक मतें तेवढीं त्याच्या नांवावर ठेवून बाकीचीं मतें पसंतीच्या दुसऱ्या उमेदवाराला दिलीं जातात. ह्या रीतीनें ठराविक प्रतिनिधि निवडले जातात. ह्या प्रमाणशीर मतदान पद्धतीच्या योगें अल्पसंख्याक पक्षांना, त्यांचे मतदार त्या क्षेत्रामध्यें जर प्रतिनिधित्वाला आवश्यक असणाऱ्या मतांइतके असले तर, आपल्या पसंतीच्या पहिल्या मतानें आपल्या मतदार संख्येच्या प्रमाणांत प्रतिनिधि मिळवितां येतात.

आणखी एक मतदारसंघ करण्याचा नवा प्रकार म्हणजे समाजाच्या धार्मिक, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक अंगांचे निरनिराळे स्थलात्मक विभाग करून त्यांना आपल्या अंगातर्फें प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार द्यावयाचा. यांतील मुख्य गुण म्हणजे त्या त्या अंगाचें त्यांचें खरें प्रतिनिधित्व होय. जुन्या प्रकारच्या प्रतिनिधीला त्या विशिष्ट क्षेत्रांतील समाजाच्या सर्व अंगांचें व मतांचें, त्यांची खरी ओळखसुद्धा नसतां, प्रतिनिधित्व करावें लागे. एखाद्या अंगाबद्दल त्याचें ज्ञान चांगलें असलें तरी दुसऱ्या अंगासंबंधीं त्याचें मत म्हणजे न जाणत्याचें मत व कधी कधी विरोधकाचें मत असतें. या नव्या प्रकाराप्रमाणें प्रतिनिधीनें आपल्या बुद्धीनुसार प्रत्येक गोष्टीचा नुसता न्याय व निर्णय करावयाचा नसून आपण ज्या अंगातर्फें निवडलों गेलों आहों त्याच्या मतांची व हितसंबंधांची वकिली केली पाहिजे. तो नुसता राष्ट्राचा पंच नसून आपल्या स्थलाचा व अंगाचा वकील आहे.

सध्या बहुतेक सर्व प्रतिनिधि कोणत्या ना कोणत्या तरी संघटित पक्षाचे अनुयायी असतात. त्या पक्षाच्या संघटित बळाच्या साहाय्यानें त्यांच्या निवडणुकी सुलभ प्रकारें होतात. स्वतंत्र व लोकशाही राज्यांतील लोकांचे राजकीय दृष्ट्या मोठे मोठे सुसंघटित पक्ष झाले आहेत. त्यांच्या

देशहिताच्या राजकीय कल्पना आणि सामाजिक व आर्थिक बाबतींतील मतें भिन्न असतात. त्यांचे अनुयायी सर्व देशभर पसरलेले असतात. त्यांचे पुढारी आपल्या कर्तृत्वाने व उपदेशाने आपले अनुयायी वाढवितात आणि त्यांच्या मतांच्या साहाय्याने लोकसभेंत आपलें बहुमत व राज्यकाभारांत आपलें वर्चस्व करूं पाहतात. त्यांची इच्छा व प्रयत्न हीं राज्यकारभार आपल्या धोरणाप्रमाणें चालावा अशीं असतात. सांप्रत मोठमोठ्या गोष्टींचा, हालचालींचा व धोरणांचा अंतिम निर्णय राज्यतंत्राच्या द्वारें होतो आणि तो राजदंडाच्या भयाने पाळला जातो. देशांतील इतर संघ व समूह त्याच्याच निर्बंधाच्या अनुरोधाने वागतात. त्यांच्या कार्यक्षेत्राची व अधिकारक्षेत्राची मर्यादा ठरविण्याचा अधिकार राज्यतंत्राकडेच असतो. सध्या राज्यतंत्र हें लोकमतानुवर्ती आहे. त्याचा कारभार प्रतिनिधींच्या संमतीने व जबाबदार राजमंडळांच्या द्वारें चालतो. अर्थात लोकमत हेंच ह्या सर्व कारभाराचा मूळ व मुख्य आधार आहे. परंतु हें लोकमत म्हणजे काय व कोणाचें ? तें कसें हुडकून काढावयाचें व कोणी प्रदर्शित करावयाचें? लोक जर सार्वजनिक कामाबद्दल अज्ञानी असतील तर त्यांना सज्ञान करून मार्ग कोणी दाखवावयाचा ? ते उदासीन असतील, तर त्यांनी आपलें मत व इच्छा प्रदर्शित कराव्या आणि राज्यकारभारांत समंजसपणें व कर्तव्य म्हणून भाग घ्यावा अशा-साठी त्यांच्यामध्यें उत्साह व शिस्त कोणीं उत्पन्न करावयाची ? हें लोकांच्या जागृतीचें व शिक्षणाचें आणि त्यांच्यामध्यें सार्वजनिक हित-बुद्धि, चातुर्य व अगत्य उत्पन्न करण्याचें काम झालें पाहिजे. तें सध्या संघटित राजकीय पक्ष व त्यांचीं पत्रें व पुढारी करतात. मत असलेले मतधारक व मत नसलेली जनता यांना आपल्याकडे आकर्षण करून घ्यावयाचें ही त्यांची मुख्य खटपट असते. प्रत्येक मतदाराला निवडणुकी-मध्यें आपलें मत उपयोगांत आणलेंच पाहिजे इतका उत्साह व जबाबदारी वाटत नाही. त्याचा आळस, उदासीनता व बेफिकिरी यांतून त्याला हलवून उठविलें पाहिजे. आणि मत देण्याच्या स्थळीं येण्यापूर्वी विचार करावयाला लावले पाहिजे. हें काम पक्षांचे पुढारी, पत्रें व व्यवस्थापक करतात. लोकसत्तेने मूळ धरावें, तिचा वेल वाढावा व तिला फुलें यावीं

म्हणून मतधारकाला मत द्यावयाचा उत्साह पाहिजे. सांप्रतच्या प्रातिनिधिक स्वराज्यव्यवस्थेचा मुख्य विशेष म्हणजे मतधारक संघांत व प्रतिनिधिसभेंत बहुमताचें प्राबल्य हा होय. तेव्हा प्रत्येक उत्साही व आकांक्षी राजकीय पक्षाला आपल्या मताचे मतधारक व प्रतिनिधि हे अधिक असावेत असें स्वाभाविकपणें वाटतें आणि त्याकरतां पक्षाची संघटना व कार्यक्षमता वाढवावी लागते. त्यायोगें मतदार व प्रतिनिधि वाढतात व पक्षाला चिकटून राहतात. त्यांच्या पाठिंब्यावांचून कोणताच पक्ष राज्यारूढ होणार नाही व त्याचें प्रधानमंडळ टिकणार नाही. त्यांच्याच पाठिंब्याने रंकाचे राजे होतात व राज्यकारभाराचीं सूत्रें चालवितात.

जाणत्या व सार्वजनिक कामाकडे लक्ष देणाऱ्या मतधारकांच्या दृष्टीने पाहिलें तर निवडलेले प्रतिनिधि व नेमलेलें प्रधानमंडळ अथवा अध्यक्षमंडळ यांनी त्यांच्या इच्छेप्रमाणें वागलें पाहिजे आणि त्यांच्या विरुद्ध ते जाणार नाहीत असें त्यांच्यावर नियंत्रण पाहिजे. निवडलेल्या प्रतिनिधींना, प्रधानांना व मंत्र्यांना आपलें काम चांगलें व निर्भीडपणें करतां येण्यासाठी आपल्या मतधारक संघाचा पाठिंबा व साहाय्य पाहिजे. तेव्हा पुढाऱ्यांचें कार्य, प्रतिनिधींचा कारभार व मतधारकांची इच्छा योग्य प्रकारें पार पाडण्याकरितां प्रत्येक राजकीय पक्षाची योग्य संघटना होणें आवश्यक व उपयोगी आहे. एकदा लोकांचें आधिपत्य मान्य केलें आणि राज्यशासन चालविण्यासाठी त्यांचे प्रतिनिधि कोण असावे हें ठरविण्याकरितां त्यांना मताधिकार दिला, म्हणजे मग ज्यांना त्यांचे प्रतिनिधि व्हावयाचें असेल आणि त्यांच्या कल्पनेप्रमाणें, तत्त्वाप्रमाणें व काम करण्याच्या पद्धतीप्रमाणें राज्यकारभार करावयाचा असेल त्यांनी बहुमताचा पाठिंबा मिळविला पाहिजे. मोठाल्या स्थानिक विभागांतून प्रांतांतून व देशांतून हें घडवून आणावयाला पक्षांची चांगली संघटना व प्रयत्न यांची जरूरी असते. ह्याकरतां मतदारांचे पक्षरूपाने स्थानिक संघ असावयास पाहिजेत आणि त्या संघांची एक मध्यवर्ती संयुक्त संस्था असली पाहिजे. सध्याच्या काळांतील राज्याची प्रचंड अधिसत्ता ही मूढ, आळशी व उदासीन धन्याच्या हातून निसटते आणि बुद्धिमान, उत्साही व चतुर मंत्र्याच्या हातांत खेळते.

सांप्रतच्या प्रातिनिधिक पद्धतीच्या राजकारणांत पक्ष हे हालचाल करणारे व दुवे जोडणारे आहेत. ते राजकीय अधिसत्तेच्या मूलभूत गोष्टींत एकसूत्रता आणतात व एकत्र विचार करून एक मत तयार करतात. ते अधिसत्ता एका हातीं आणून आपल्या आकांक्षेप्रमाणें व अनुभवाप्रमाणें देशाच्या स्वातंत्र्यासाठी व संपन्नतेसाठी तिला झटावयाला लावतात. त्यांच्याच द्वारें लोकमत व लोकशक्ति जागृत राहते व प्रदर्शित होते आणि पक्षापक्षांच्या ऊहापोहाने, चढाओढीने व निरनिराळया उपाययोजनेने देशकल्याण कशांत आहे, हें जनतेला कळतें आणि ती आपल्या आवडी-नुसार या पक्षाला किंवा त्या पक्षाला वळते, त्याचें राज्यकारभारांत बहुमत करते आणि त्या पक्षाच्या मताचा व योजनेचा रंग देशाच्या राज-कारणाला चढविते.

ह्या राजकीय पक्षांच्या संघटनेमुळें स्वतंत्र विचाराच्या मतदा-राला व प्रतिनिधीला राज्यकारभारांत स्थान मिळत नाही. त्यामुळें त्याचें मत व प्रतिनिधित्व वाया जातें. शिवाय, सांप्रतच्या गुंतागुंतीच्या राज्य-घटना, त्यांचीं विविध प्रकारचीं अवघड कामें व कारभार आणि त्यांना वारंवार सोडवावे लागणारे महत्त्वाचे व गुंतागुंतीचे प्रश्न, यांच्यामुळें राजकीय अधिकाराचीं सूत्रें पक्षांतील मतदारांच्या व प्रतिनिधींच्या हातां-तून सुटून तीं त्यांतील महत्त्वाकांक्षी पुढाऱ्यांच्या, प्रधानांच्या व तज्ज्ञांच्या हातांत केंद्रित होतात. लोकांचें प्रत्यक्ष अथवा प्रतिनिधिरूपी वर्चस्व नाममात्र राहतें. पक्षामध्यें सुद्धा संपन्न धेंडांचें व कूटांचें प्राबल्य होतें व मतदारांचीं मतें 'मुकीं बिचारीं कुणी हका' अशा मासल्याचीं बनतात. आणि राज्यतंत्र व अधिसत्ता हीं लोकमुखद्वारा व प्रतिनिधिद्वारा कां होईना थोडचा पण हुशार, समर्थ व कर्तृत्ववान लोकांच्या हातांत जाणें अपरिहार्य होतें.

प्रतिनिधींचा व पक्षाचा परस्पर संबंध पाहिला तर त्यांना एकमे-कांची आवश्यकता आहे आणि ते एकमेकांवर अवलंबून असतात. प्रतिनि-धींचें निवडून येणें, त्यांचें सभेंतील काम योग्य होणें, त्यांच्या विचारांस व मतांस यश मिळणें आणि राज्यकारभारांत त्यांचा प्रभाव पडणें ह्या गोष्टी पक्षाच्याच साहाय्याने बव्हंशीं घडतात. त्या नुसत्या त्याच्या वैय-क्तिक योग्यतेवर अवलंबून नसतात. त्यांना निवडून येण्याला मतदारांचा

पाठिंबा पाहिजे, काम करण्याला योग्य माहिती व वळण पाहिजे, प्रभाव पडण्याला साहाय्य व सहकारी पाहिजेत. ह्या सर्व गोष्टी त्यांचा पक्ष सहज पुरवूं शकतो. खरें पाहिलें तर ते स्वपक्षाचीं बोलणारीं मुखें, समर्थन करणारे हस्तक व साहाय्य करणारे सहकारी आहेत. पक्षसंस्था त्यांना आपलें काम करण्याला आदेश व उपदेश करते व लागेल ती माहिती व मदत देते. ही पक्षसंस्था म्हणजे मतदार लोकांचा प्रतिनिधींवरचा पहारेकरी होय. पक्षांच्या वर्तमानपत्रांतून त्यांच्या सर्व कृत्यांना लोकसभेंतील भाषणांना व दिलेल्या मतांना प्रसिद्धि मिळते आणि त्यावरून त्यांच्या मतदारसंघाला त्यांच्या कार्याची व वर्तनाची माहिती होऊन त्यांच्याविषयीं मत बनवितां येतें. त्यामुळें प्रतिनिधींना आपल्या वरच्या जबाबदारीची जाणीव होते. पक्ष हे मतदारसंघ व शासनसंस्था यांच्या मधील दुव्यासारखे झाले आहेत. ते प्रसंगानुसार त्यांच्यामध्यें ऐक्य किंवा विरोध उत्पन्न करतात.

याचा परिणाम असा होतो की प्रतिनिधींना नुसतें आपल्या स्थानिक मतदारसंघाशीं एकनिष्ठ राहून किंवा आपल्याच तंत्राने वागून चालत नाही. आपल्या राजकीय पक्षाशीं एकनिष्ठ असावें लागतें. कधी कधी स्थानिक हितसंबंध, स्वतःची सदसद्‌विवेकबुद्धि व पक्षाचे हितसंबंध यांमध्यें विरोध उद्‌भवला तर पक्षाचें हित व धोरण राखण्यासाठी इतर सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करावें लागतें. प्रतिनिधि हा पक्षाचें काम करणारा बाहुलेंच बनतो. स्थानिक मतदार हे कोणत्याना कोणत्या तरीं पक्षाचे अनुयायी असतात. तेव्हा त्यांना पक्षाच्या अनुरोधाने जावें लागतें. म्हणून त्यांना प्रतिनिधीला विरोध करतां येत नाही. यावरून दिसून येईल की लोकमत तयार करून त्याची संघटना करून तें प्रदर्शित करण्यास राज्यघटनेच्या कक्षेबाहेर असलेल्या पक्षसंस्थांची जरी आवश्यकता असली तरी स्थानिक हितसंबंध व वैयक्तिक मतस्वातंत्र्य यांची पक्षसंस्थेच्या रणगाड्याखाली गळचेपी होण्याचा पुष्कळ संभव असतो. बर्कच्या मतें पक्ष हा सर्वांना मान्य असलेल्या तत्वाप्रमाणें आपल्या संयुक्त प्रयत्नांनी राष्ट्रीय हित साधण्यासाठी एकत्र झालेल्या लोकांचा संघ होय. प्रत्येक पक्षाचा विशिष्ट कार्यक्रम असला पाहिजे, तो त्याने लोकांना शिकविला

पाहिजे; त्याने आपले अनुयायी वाढविले पाहिजेत आणि एकोप्याने काम करून तो कार्यक्रम पार पाडला पाहिजे. पक्ष हा आपली संघटना व शिस्त निर्माण करून आपल्या अनुयायांना राजकीय कामाचें शिक्षण देतो. तो राष्ट्रांतील निर्बन्धकारिणी व कार्यकारिणी संस्थांमध्यें एकसूत्रता आणतो आणि अधिकारी मंडळावर परिणामकारक टीका करण्याचें उत्कृष्ट काम करतो. त्याच्या दृष्टीपुढे जातिभेद, संपत्तिभेद व धर्मभेद नसतात; निदान नसावे. नुसत्या राजकीय मतभेदानुसार त्याची स्वतंत्र संघटना निर्माण होते.

प्रातिनिधिक राज्यपद्धतींत उत्पन्न होणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी आणखी कांही उपाय योजिलेले आढळतात. बहुमताचें प्राबल्य हें लोकसत्ताक पद्धतीचें मुख्य लक्षण आहे. तेव्हा बहुमताकडून होणारा अतिप्रसंग व अत्याचार टाळण्याला कांही तरी उपाय पाहिजे. बहुमताला राज्य चालविण्याचा मुळांतच ईश्वरी किंवा नैतिक अधिकार आहे असें नाही. अनेक प्रसंगीं बहुमतवाल्यांपासून प्रागतिक व कर्तृत्ववान अल्पमतवाल्यांना अपाय होण्याचा संभव असतो. शिवाय, मोठाल्या राज्यांत मध्यवर्ती राज्यसंस्थेचें स्थान फार दूर असतें आणि त्यामुळें स्थानिक प्रश्न व सुधारणा यांच्याकडे दुर्लक्ष होतें, कारण त्यासंबंधीं इतरांना ज्ञान व अगत्य विशेष नसतें. तेव्हा अशा स्थानिक प्रतिनिधींच्या संघांना, कित्येक अल्पमतवाल्यांना व विशेष हितसंबंधाच्या लोकांना ज्या प्रश्नांशीं त्यांचाच विशेष संबंध असतो त्यांचा स्वयंनिर्णय व स्वयंशासन करण्याचे मर्यादित अधिकार द्यावे. ते प्रश्न त्यांना जिव्हाळ्याचे असतात व त्यांच्याच संबंधाचे असतात. त्यांची काळजी व अगत्य त्यांनाच असतें. तेव्हा विशिष्ट जनसमूहाच्या जिव्हाळ्याचा संबंध असलेल्या प्रश्नांपुरता त्या त्या समूहाला स्वयंशासनाचा अधिकार दिला पाहिजे. म्हणजे त्यांना स्वयंनिर्णयाचें ज्ञान अनुभवून सामर्थ्य प्राप्त होईल. अंतिम निर्णयाचा अधिकार अर्थात मध्यवर्ती सत्तेकडे असावा. अशा रीतीने मध्यवर्ती राज्यसंस्थेची सत्ता व कामें प्रादेशिक, धार्मिक, औद्योगिक, जातीय व सांस्कृतिक संघांमध्यें वाटून दिल्यास मध्यवर्ती सत्तेकडून कोणत्याही बाबतींत अतिप्रसंग किंवा अव्यापारेषु व्यापार होणार नाही. स्वतःचा हितसंबंध ज्यांत निगडित झालेला नाही अशा प्रश्नाविषयीं लोकांमध्यें सामान्यतः

अज्ञान असतें. म्हणूनच ज्या प्रश्नांशीं ज्यांचा विशेष संबंध आहे त्यामध्यें त्यांना कारभाराचे अधिकार प्रथम देणें व अधिक देणें उत्तम आहे. लोकांना आपल्या सार्वजनिक कारभारांत लक्ष घालावयाला लावलें पाहिजे. नाहीतर राजकीय व सामाजिक दृष्टीने ते खुरटू लागतील. त्यांचें लक्ष तिकडे लागण्यासाठी त्याच्या हातांत राज्यशासन चालविण्याची सत्ता असली पाहिजे. प्रत्येक व्यक्तीला जेथे सार्वजनिक कामाचा अनुभव मिळेल असें एखादें स्थान पाहिजे.

लोकसत्ता ही केवळ नामधारी राहूं नये व ती लोकमताच्या अनुरोधाने चालावी म्हणून बरेचसे अधिकार स्थानिक संस्थांकडे सोपविणें, या पद्धतीला अधिकाराची सोपवणूक ( Devolution of power ) म्हणतां येईल.

प्रातिनिधिक संस्थांमध्यें प्रत्येक नागरिकाला प्रत्यक्ष रीतीने भाग घेतां येत नाही म्हणून कांही देशांत त्यांना महत्त्वाच्या गोष्टींत प्रत्यक्षपणें होय अथवा नाही असें म्हणण्याचा अधिकार दिला आहे. या योजनेला लोकनिर्णय (Referendum) असें म्हणतात. हा निर्णय नागरिकांच्या मतमोजणीने होतो. प्रतिनिधिसभेला त्यावर अधिकार नसतो. अशा रीतीने मधून मधून राज्यघटना सुधारणेचे आणि इतर महत्त्वाचे प्रश्न प्रत्यक्ष जनतेपुढे मांडल्याने जनतेची इच्छा व निर्णय हीच राज्यांत सर्वश्रेष्ठ व सार्वभौम सत्ता आहे हें तत्त्व प्रत्यक्ष व्यवहारांत प्रस्थापिलें जातें. ह्या पध्दतीने सर्व नागरिकांमध्यें स्वतःच्या प्रत्यक्ष जबाबदारीची भावना उत्पन्न होते आणि आपल्या देशाच्या राज्यकारभारांत त्यांना प्रत्यक्ष स्थान मिळून निर्णायक मत देतां येतें. त्यामुळें सार्वजनिक कामाची जाणीव त्यांच्यांत उत्पन्न होते.

ह्या पद्धतींत कांही दोष आढळून येतात. पहिला दोष, पुष्कळ नागरिक अशा महत्त्वाच्या ठरावावर आपलें मत देत नाहीत. त्यामुळें लोकनिर्णय नुसता नांवाचा होतो. दुसरा दोष, निवडून दिलेले प्रतिनिधि अधिक शिकलेले, प्रगल्भ विचाराचे, अनुभवी व लोकहिताला अधिक जपणारे असतात आणि सामान्य जनता तुलनेनें अडाणी, पुराणप्रिय, संकुचित वृत्तीची आणि स्वपक्षाच्या सूत्रचालकाच्या हातांत सहज जाणारी

अशी असते, म्हणून तिचा निर्णय खरोखरी लोकहिताचा होतो असें नाही. तिसरा दोष, त्यामध्यें प्रत्यक्षपणें एकत्र विचारविनिमयाचा व तडजोडीचा लाभ घ्यावयाला मुळीच वाव राहात नाही. चौथा दोष, नागरिकापुढे मतासाठी मांडलेली योजना सामान्यपणें अंगोपांगांसह शिजवून सिद्ध केलेली असते. त्यामुळें त्यामध्यें फेरफार करण्याला वाव नसतो. त्याबद्दल नुसतें 'होय' अथवा 'नाही' म्हणावयाचें असतें. तिची चर्चा व पारख करावयास आणि नव्या सूचना करावयास तेथे जागा नाही. आहे त्या रूपांत ती मान्य अथवा त्याज्य ठरते.

लोकांनी आपले निर्बंध स्वतःच सुचवावयाचे व त्यांची योजना स्वतःच तयार करून प्रतिनिधिसभेकडे व प्रधानमंडळाकडे पाठवावयाची आणि ती पुन्हा त्यांनी तपासल्यावर परत आणून त्याच्यावर आपला निर्णय द्यावयाचा अशा प्रकारच्या निर्बंध करण्याच्या पद्धतीला **लोकांचा निर्बन्ध उपक्रम** ( Initiative ) म्हणतात. ठराविक संख्येच्या नागरिकांनी असा निर्बंधाचा उपक्रम करून एखादी योजना करावी लागते. कांही ठिकाणीं कालमर्यादा संपण्याच्या अगोदर आपला प्रतिनिधि परत बोलावण्याचा व त्या जागीं दुसरा निवडण्याचा अधिकार मतदारसंघाकडे राज्यघटनेनुसार असतो. या योजनेला **प्रत्याहरण** ( Recall ) म्हणतात. राज्यकर्त्यांना आपलें धोरण ठरवावयाला उपयोग व्हावा या हेतूने लोकांचें म्हणणें काय हें समजण्यासाठी कधी कधी सर्व जनतेचें मत एखाद्या प्रश्नावर घेतलें जातें. या प्रकाराला **लोकाभिप्राय** ( Plebiscite ) म्हणतात तो बंधनकारक नसतो.



प्रकरण चवदावें

# नागरिकांचे अधिकार, त्यांचीं कर्तव्यें आणि त्यांच्यावरील बंधनें

योग्य रीतीने संघटित झालेल्या व प्रौढ राजकीय समाजाच्या नागरिकांना असलेले सर्व अधिकार आणि त्यांचीं कर्तव्यें यांचा नागरिकतेमध्यें अंतर्भाव होतो. नागरिकांचे अधिकार व कर्तव्यें हीं निर्बंधानुसार प्राप्त होणारीं अथवा राजकीय आणि नीतिकल्पनांनुसार प्राप्त होणारीं अथवा सामाजिक स्वरूपाचीं असतात. त्यांचा उद्देश एका दृष्टीने व्यक्तीचें रक्षण करण्याचा व त्याचें स्वातंत्र्य व स्वास्थ्य राखण्याचा असतो आणि दुसऱ्या दृष्टीने व्यक्तींच्या स्वार्थाचें सामाजिक हिताकरतां नियंत्रण करण्याचा असतो.

प्रत्येक नागरिकाने आपला स्वार्थ व समाजाचें हित यांमध्यें विरोध उत्पन्न झाला असतां त्यांचा योग्य मेळ घातला पाहिजे आणि स्वार्थाला समाजहितापेक्षा कमी लेखलें पाहिजे. हें उत्तम नागरिकतेचें खरें लक्षण होय. प्रत्येक नागरिकाने आपलीं वैयक्तिक कर्तव्यें उत्तम प्रकारें केलीं पाहिजेत आणि तसेंच समाजाचें हित साधण्यासाठी अवश्य असेल त्यावेळीं सार्वजनिक कामांत निरलसपणें भाग घेतला पाहिजे. परंतु या अधिकार-कर्तव्यांचें योग्य पालन व पोषण होण्यास त्यांच्यावर योग्य नियंत्रण पाहिजे. लोकांचा एके ठिकाणीं योग्य प्रकारचा सहवास व सहकार होण्यास समाजाच्या मुख्य सत्तेने केलेल्या नियमांची आवश्यकता आहे.

समाजाच्या सुस्थितीकरतां व व्यक्तींच्या व समूहांच्या स्वातंत्र्याकरतां जे नियम प्रथम अस्तित्वांत आले व मान्य झाले ते अहिंसा, अस्तेय, सत्य, ब्रह्मचर्य व अपरिग्रह ह्या स्वरूपाचे होते. त्यांच्या योगें व्यक्तींचें प्राणरक्षण, वित्तरक्षण, सत्वरक्षण, सदाचाररक्षण व नीतिरक्षण झालें. कोणत्याही प्रकारचा सहवास होण्यास अशा प्रकारच्या नीतिनियमांची

विशेष आवश्यकता आहे. त्यांच्या योगें समाजाची सुस्थिति राहते, संबंध टिकतात व व्यवहार चालतात.

मनुष्य हा भावनात्मक आहे. तो विकारवश होतो. त्याला स्वतःच्या इच्छा, आकांक्षा व ध्येयें असतात. त्यांच्या प्रेरणेमुळें तो बंधनें व मर्यादा तोडून इतरांच्या जीवितावर, स्वातंत्र्यावर, वित्तावर, सत्त्वावर व सुखावर आक्रमण करतो आणि अनेक प्रकारें इष्ट अथवा अनिष्ट मार्गानें वागतो. तरीपण त्याच्यामध्यें नैसर्गिकरीत्या समाजभावना व शीलप्रवृत्ति असल्यामुळें तो समूहाने राहूं लागल्यावर स्वतःला व त्याचप्रमाणें इतरांना अनुकूल व प्रतिकूल वर्तन काय आहे ह्याची त्याला जाणीव होत असते आणि आपल्या सामाजिक समागमाला कांही मर्यादा व बंधनें पाहिजेत असें वाटूं लागतें. म्हणून सामाजिक जीवनाच्या दृष्टीने ज्या संस्था, साधनें व समजुती त्याने मान्य केल्या त्यांच्या रक्षणार्थ नियम घालावे लागतात.

हे नियम दोन प्रकारचे असतात. एकाचें स्वरूप समाजाच्या सामान्य विवेकबुद्धीने योग्य म्हणून ठरविलेल्या नैतिक समजुतींचें व आचारांचें असतें आणि दुसऱ्याचें स्वरूप राज्यसत्तेची मान्यता मिळाल्याने सर्वांना पाळाव्या लागणाऱ्या कायदेशीर बंधनाचें असतें. पहिल्यांना आपण समाजनीतिनियम म्हणून पाळतों आणि दुसऱ्यांना राज्यशासन अथवा निर्बंध म्हणून मानतों. पहिले उपदेशात्मक असतात; ते न पाळल्यास समाजाची निंदा, उपहास व बहिष्कार सहन करावा लागतो. दुसरे आदेशात्मक असतात; ते न मानल्यास राजदंड व कारागृहवास सोसावा लागतो. राजसत्तेप्रमाणें धर्मसत्तेने व इतर कार्यात्मक व उद्योगात्मक संघांनी आपापल्या अनुयायांना व सभासदांना आपल्या उद्देशानुसार व हितानुसार नियम घातलेले असतात. ते सर्व नियम निर्बन्धांच्या स्वरूपाचे नसतात. त्यांचा आधार त्या संघाच्या समजुती व कार्य हा असतो. ते न पाळल्यास दंड प्रायश्चित्त किंवा बहिष्कार सोसावा लागतो. त्यामुळें कांही लोक स्वेच्छेनुसार धर्मान्तर व व्यवसायान्तर करतात. कांही ठिकाणीं या संघांचे नियम राज्यसत्तेचें पाठबळ असल्यास किंवा तिने मान्य केले असल्यास

त्या त्या लोकांना पाळावे लागतात आणि ते न पाळल्यास त्यांना दंड व शिक्षा होतात.

राज्यसत्तेने घालून दिलेलें बंधन सक्तीचें असतें. तें व्यक्तीच्या खुषीवर अवलंबून नसतें. नैतिक व नैबंधिक नियमांमध्यें हाच मुख्य फरक आहे. प्रत्येक निबंधामध्यें कांही अंश न्यायनीतीचा असतो आणि जरी त्याला पाठबळ राजदंडाचें असलें तरी तो अंतीं लोकसंमत असावा लागतो. नाहीतर त्याला लोकांचा विरोध होईल व राज्यांत विप्लव माजेल. कोणताही निबंध अंगवळणीं पडण्यास व त्याचा समाजाला उपयोग होण्यास जनतेची त्याला संमति मिळाली पाहिजे.

प्रत्येक समाजामध्यें व्यक्तीचें स्थान व मान काय आहे हें ठरविणें अवश्य आहे. व्यक्तींच्या गुणदोषाने स्वातंत्र्य-सामर्थ्याने, रक्षण-पोषणाने, शिक्षण-शीलाने, नीति-न्यायाने व कारभार-कर्तव्याने समाजाची सुस्थिति राहते व प्रगति होते. तेव्हा समाजाच्या सार्वजनिक हिताकरतां जरी कांही बंधनें पाहिजेत तरी त्याच्या वाढीकरतां त्याला बरेंच स्वातंत्र्य व शिक्षण पाहिजे. त्यायोगें त्याचे गुण व सामर्थ्य हीं वाढतील आणि समाज त्यामुळें बळकट होईल. स्वातंत्र्य, सुस्थिति व प्रगति ह्या अन्योन्यपोषक कल्पना आहेत. व्यक्तीचें जीवित, स्वातंत्र्य व वित्त हें जरी तिच्या उपयोगाचें व उपभोगाचें असलें तरी तें तिने समाजाच्या दृष्टीने ठेव म्हणून जिम्मेदारीने वापरलें पाहिजे. त्यांचा उपयोग करतांना व उपभोग घेतांना त्यांच्या सामाजिक मर्यादा व परिणाम ओळखले पाहिजेत. त्यांचा उपयोग मालकाप्रमाणें न करतां पालकाप्रमाणें समाजदृष्ट्या केला पाहिजे.

प्रत्येकाचें हित व स्वातंत्र्य यांचा संबंध व्यवहारदृष्ट्या इतरांशीं येतो. म्हणून निबंध हा सार्वजनिक हितदृष्ट्या प्रत्येकाच्या स्वैरस्वातंत्र्यावर मर्यादा व बंधनें घालतो आणि त्यांच्या समाईक कल्याणासाठी योग्य परिस्थिति निर्माण करतो. मनुष्याच्या बाह्य वर्तणुकीवर नियमन घालून योग्य व्यवहार कोणता व त्याज्य कोणता हें निबंध दाखवितो.

नैतिक बंधन हें स्वतःच्या आंतरिक भावनेच्या व सदसद्विवेक बुद्धीच्या बळावर अथवा स्वतःला लागणाऱ्या बाह्य सुखसोयींच्या आवश्यकतेवर अवलंबून असतें. तें मोडल्यास स्वतःव्यतिरिक्त दंड करणारी,

प्रायश्चित्त देणारी व पश्चात्ताप करविणारी बाह्य व संघटित संस्था अथवा सत्ता नसते.

नैर्बंधिक नियम हे संघटित संस्थांनी व राज्यसत्तेने घालून दिलेले असतात. त्यांनी मनुष्याला कांही अधिकार व कांही कर्तव्यें हीं आखून दिलेलीं असतात आणि कांही स्वातंत्र्य देऊन कांही बंधनें घातलेलीं असतात. नैर्बंधिक अधिकार म्हणजे निर्बंधाने प्रस्थापित केलेल्या समाजव्यवस्थेंत व्यक्तीला आखून दिलेलें स्वतंत्र वागणुकीचें क्षेत्र होय. समाजाच्या दृष्टीने अनियंत्रित व्यक्तिस्वातंत्र्य शक्य व इष्ट नाही, त्याचें क्षेत्र व दिशा ठरविल्या पाहिजेत. अधिकार म्हणजे मनुष्यावर व वस्तूंवर आणि त्याच्या व्यवहारावर सत्ता व नियंत्रण होय. तो अधिकार मनुष्याला स्वतःच्या जीविताच्या रक्षणासाठी आणि स्वतःच्या वित्ताचें व मिळकतीचें अर्जन, रक्षण, वर्धन व उपभोग यासाठी दिलेला असतो. तो इतरांना प्रतिबंधात्मक व कर्तव्यात्मक असतो. त्यांना तो मानावा लागतो. इतर मनुष्यांनाही त्याच प्रकारचा व तितकाच अधिकार स्वतःचें जीवित, वित्त व व्यवहार यांबद्दल दिलेला असतो. तोही तसाच दुसऱ्यांना मानावा लागतो. यावरून एकाचा अधिकार तो इतरांचें कर्तव्य असतें असें दिसून येईल. व्यक्तीव्यक्तींमधील आणि व्यक्ति व अधिकारी यांच्यामधील स्वातंत्र्यमर्यादा व अधिकारक्षेत्र हीं निर्बंधाने ठरविलेलीं असतात.

नागरिकाचे अधिकार रक्षणात्मक व पोषणात्मक स्वरूपाचे असतात. रक्षणात्मक अधिकारांचा संबंध व्यक्तीच्या देहाशीं, प्राणाशीं, कुटुंबाशीं, मिळकतीशीं, घराशीं, मानाशीं व कीर्तीशीं येतो. त्यांच्यामध्यें आत्मरक्षण; विचार, संचार, भाषण, आचार, व्यवहार, लेखन, धर्म, सहवास, सहकार, सभा, संमेलन, देशांतर्गत हालचाली व वसती या सर्वांचें स्वातंत्र्य; गैरकायदा धरपकड, बंदी व कारागृहवास यांपासून मोकळीक; मतदानाचा अधिकार; राज्यकारभारांत समान भाग; न्यायाच्या व निर्बंधाच्या दृष्टीने समानता; व्यापाराचें व कराराचें स्वातंत्र्य; गैरकायदा कर व जुलमाच्या देणग्या यांपासून मोकळीक; योग्य न्यायालयाकडून अपराध्यांची वेळेवर चौकशी, इत्यादि नागरिकांचे अधिकार येतात.

पोषणात्मक अधिकारामध्यें प्रत्येक मनुष्याच्या जीविताला लागणाऱ्या किमान अवश्यक गोष्टींचा समावेश होतो आणि त्याचप्रमाणें मनुष्यानें प्राप्त करण्याच्या सत्ता, समता, संपत्ति, सुख इत्यादि गोष्टींच्या कमाल संग्रहाच्या मर्यादांचा विचार समाजहितदृष्टया केला जातो. त्यामध्यें प्रत्येकाला पुढे यावयाला समान संधि किंवा मोकळीक, व्यवसाय व काम करण्याची संधि, काम न मिळल्यास समाजाकडून किंवा सरकाराकडून साहाय्याची अपेक्षा; वार्धक्यांत, रोगी, पंगु व अनाथ अवस्थेंत विमारूपी साहाय्य; उपजीविकेच्या साधनांचें योग्य प्रमाण; प्राणधारी वेतन, कामाच्या तासाचें योग्य प्रमाण, आरोग्याची परिस्थिति, घरें, हवा व पाणी; आरोग्यरक्षणाचे व औषधाचे उपाय; मुलांचें योग्य पालनपोषण; स्त्रियांची प्रसूतीच्या वेळची काळजी; प्रत्येकाला ठराविक मर्यादेपर्यंत सामान्य शिक्षण; राहावयास आरोग्याचीं व सोयीचीं घरें, देशांतील संपत्तीमध्यें योग्य वांटा व सत्तेमध्ये योग्य भाग ह्या गोष्टी येतात.

अशा प्रकारचे अधिकार प्रत्येक नागरिकाला प्रत्येक राज्यांत मिळतात असें नाही. ते मिळणें तेथील राज्यपद्धतीवर द लोकांच्या सामर्थ्यावर अवलंबून असतें. सुधारलेल्या देशांत सत्ताधिकाऱ्यांच्या धोरणानें व साहाय्याने आणि दुसरीकडे लोकांच्या चळवळीने व राष्ट्रसंघाच्या प्रोत्साहनाने ह्या गोष्टींची जाणीव हळुहळू होऊन नागरिकांच्या पोषणात्मक गोष्टींकडे लक्ष जात आहे आणि त्याबद्दल निर्बंध व उपाय योजिले जात आहेत. हे उपाय शिक्षण, आरोग्य, व्यवसाय, नीति व विमा या संबंधाच्या निर्बंधांच्या रूपाने अमलांत आले आहेत. ह्या सर्व अधिकारांची व स्वातंत्र्याची मर्यादा समाजाच्या नैतिक ध्येयांनी व राज्यघटनेच्या स्वरूपाने बांधलेली असते. त्या नीतीचें व घटनेचें उल्लंघन राज्यसत्ता करून देत नाही.

नागरिकाला राज्यसत्तेच्या दृष्टीनें अनेक कर्तव्यें असतात. राज्यसत्तेचा अधिकार व शासन पाळल्यानेच नागरिकाचे अधिकार व स्वातंत्र्य टिकतें. सामान्यत: तीं कर्तव्यें म्हटलीं म्हणजे प्रत्येक नागरिकाची आपल्या राज्याबद्दल पूर्ण निष्ठा, राज्यसत्तेने केलेल्या अपराध व व्यवहार या संबंधींच्या सर्व निर्बंधांना मान्यता व त्यांचें पालन, नैर्बंधिक कर व आकारणी देणें, न्यायनिर्णय मानणें, मतदान समाजहितदृष्टया करणें, सार्वजनिक सुस्थिति,

आरोग्य व स्वच्छता राखण्यांत साहाय्य करणें, आपल्या अधिकारप्राप्तीसाठी व हितरक्षणासाठी अथवा सरकारी धोरणाविरुद्ध व कृत्यांविरुद्ध राज्यनिर्बंधानुसार राज्यसंस्थांमधून चळवळ करणें, देशांत राज्यक्रांति होत असल्यास अथवा परचक्र आल्यास देशाच्या सुरक्षिततेसाठी सैन्यांत भरती होणें, आपल्या राज्याशीं द्रोह न करणें, त्यांतील शांतता व सुव्यवस्था न बिघडविणें आणि त्याच्या आपत्कालांत स्वार्थत्याग करणें, हीं होत.

नागरिकाला या राजकीय कर्तव्यांबरोबरच कांही सामाजिक व नैतिक कर्तव्येंही असतात. तीं, दरिद्री, रोगी, आपद्ग्रस्त, अनाथ, पंगु यांना सर्व प्रकारें आर्थिक, नैतिक, शैक्षणिक साहाय्य करणें व त्यांचा परामर्ष घेणें हीं होत. शिवाय स्वतःच्या वर्तणुकीमध्यें सहिष्णुता, सेवाभाव, करुणा, मैत्री, स्वार्थत्याग, परोपकारबुद्धि, स्वातंत्र्येच्छा, देशभक्ति व राज्यनिष्ठा यांची जोपासना झाली पाहिजे.

सांप्रत कांही राज्यघटनांमध्यें प्रथमतःच नागरिकांच्या मूलभूत अधिकारांची घोषणा केलेली असते. त्यांचा उद्देश विशेषतः राज्याधिकाऱ्यांनी नागरिकाच्या अधिकाराचें पालन करावें व त्यावर आक्रमण करूं नये असा असतो. पुष्कळ ठिकाणीं अनेक वेळां राजे व राज्याधिकारी नागरिकांच्या अधिकाराची व स्वातंत्र्याची पायमल्ली करतात. म्हणून त्यांना प्रतिबंध करण्यासाठी राज्यघटनेंतच निर्बंध घालून ठेवलेले असतात. त्यांचें उल्लंघन केल्यास न्यायालयाकडून अपराध्यांना शिक्षा होते.

नागरिकांच्या अशा अधिकाराला व स्वातंत्र्याला पोषक गोष्टी म्हटल्या म्हणजे (१) सांप्रतची लोकनिर्मित सत्तेची कल्पना आणि लोकतंत्री राज्यव्यवस्था व राज्यकारभार, (२) निर्बंधानुसार राज्याचें धोरण व कारभार चालविला पाहिजे हीकल्पना, (३) निर्बंधाच्या व न्यायाच्या दृष्टीने सर्व नागरिकांची समान स्थिति व अधिकार, त्यांच्यामध्यें उच्च नीच व क्षम्याक्षम्य असे भेद न करणें, मग ते कोणत्याही वंशाचे, धर्माचे व वर्गाचे असोत, (४) राज्यतंत्र हें जनतेच्या हिताकरतां आहे, जनता ही राज्यतंत्राकरतां नाही–त्याचा उदय, वाढ व उद्देश हीं जनतेच्या कल्याणाकरतां आहेत, (५) राज्याधिकारी हे सामान्य नागरिकाप्रमाणेंच आपल्या कृत्यांबद्दल निर्बंधाला व न्यायाला जबाबदार आहेत. त्यांना नाग-

रिकत्वाचे विशेष अधिकार व मानपान नाहीत आणि केलेल्या अपराधाची माफी नाही. नागरिकांच्या मूलभूत व समान अधिकाराची व स्वातंत्र्याची घोषणा केल्याने जनतेमध्यें आत्मविश्वास, कार्यक्षमता व सामर्थ्य ह्यांची जाणीव होते.

असें झालें तरच नागरिकशास्त्राचे उद्देश योग्य रीतीने साधले जातील. ज्या तत्त्वांप्रमाणें समाजांतील व्यक्तींचे परस्परांतील व्यवहार व्हावे तीं तत्त्वें लोकांमध्यें बिंबविणें आणि सर्वांच्या सामान्य कल्याणाच्या गोष्टी घडवून आणणें हा त्या शास्त्राचा उद्देश आहे. जेव्हा लोक आपापले आचार व व्यवहार दुसऱ्यांच्या आड न येतां करतात आणि दुसऱ्यांच्या योग्य इच्छांना व विचारांना मान देतात व त्यांची आगळीक करीत नाहीत तेव्हाच त्यांना शांततेने व सुखाने राहतां येतें. प्रत्येक मनुष्याने समाजांतील आपलें कार्य व स्थान ओळखलें पाहिजे आणि आपल्या सदाचरणाने दुसऱ्यांचें शील बनवीत व त्यांच्या उपयोगीं पडत व तसेंच दुसऱ्यांच्या चांगल्या उदाहरणाने आपलें वर्तन व व्यवहार सुधारत, इतरांच्या समवेत आपलीं कर्तव्यें केलीं पाहिजेत. प्रत्येकाने स्वतःची अनास्था दूर सारली पाहिजे व तुटकपणाची वृत्ति घालविली पाहिजे. तेव्हांच प्रत्येकांत उत्साह उत्पन्न होईल व तो आपल्या समाजाचा खरा व उत्कृष्ट नागरिक होईल आणि तो आपल्या आयुष्यक्रमांत दुर्बलांना साहाय्य करण्याचा व दुष्टांचें नियमन करण्याचा सतत प्रयत्न करीत राहील.

नागरिकांचे अधिकार व कर्तव्यें हीं अन्योन्याश्रयी आहेत. खरी नागरिकता ही मुख्यतः सामाजिक कारभारांत व व्यवहारांत कळकळीने व कर्तेपणाने भाग घेण्यांत आहे आणि त्याकरतांच अधिकारकर्तव्यांची आवश्यकता आहे. नुसते अधिकार भोगून राहणारा नागरिक हा स्वार्थी होतो आणि नुसती कर्तव्यांची जाणीव ठेवणारा व तीं पाळणारा नागरिक निरुत्साही होतो. त्याचें जीवन सामुदायिक व सार्वजनिक जीवनांत जेव्हा पूर्णपणें मिसळतें आणि समरस व समभागी होतें, तेव्हा तो उदात्त व उत्साही होतो.

नागरिकाच्या व समाजाच्या सुखकारक जीवनाच्या दृष्टीने ते दोन्ही चांगल्या वर्तनाचे, योग्य आकांक्षांचे आणि आवश्यक अधिकार व स्वातंत्र्य असलेले पाहिजेत, आणि त्यांच्या सुस्थितीच्या व वाढीच्या दृष्टीने त्यांच्या

भोवतालची परिस्थिति त्यांच्या उल्हासाला प्रोत्साहक व वाढीला पोषक पाहिजे. आपले न्यायनिर्बंध, आपले नीतिधर्म, आपलें ज्ञानार्जन व ज्ञानदान ह्या सर्वांचा उद्देश नागरिकांचें व समाजाचें जीवित सुखी व सुस्थित करण्याचा आहे.

राज्यसत्तेला व राज्यशासनाला विरोध करण्याचा वैयक्तिक नागरिकाला किंवा संघाला अधिकार नाही, कारण सत्ता व शासन हीं मुळांतच जनतेचीं आहेत. निर्बंध—मग ते न्याय्य व नीतीचे असोत वा नसोत—प्रजेला निमूटपणें पाळलेच पाहिजेत. राज्यसत्तेचे नियम हे अनियंत्रित असतात. लोकसत्तात्मक राज्यतंत्रांत जनतेच्या मताने राज्यधोरण व राज्यकारभार चालतो व निर्बन्ध केले जातात. त्यामुळें चालू सत्तेला विरोध करण्याचें नैतिक कारण व आधार उत्पन्न होत नाही. लोकांचीच सत्ता चालू असते. तरीपण अशा राज्यव्यवस्थेंत बहुमतवाल्यांचें प्राबल्य असल्यामुळें अल्पमतवाल्यांची स्थिति कठीण होते. त्यांना आपल्या मताविरुद्ध असलेले निर्णय मान्य करावे लागतात. त्यांनी आपल्या खऱ्या व नैतिक समजुतीमुळें बहुमताने प्रस्थापित केलेल्या निर्णयाला जर विरोध केला तर तो कितपत —निर्बंधाच्या नव्हे पण नीतीच्या दृष्टीने—योग्य आहे हें ठरवावें लागेल. आपल्या धर्माकरतां व संस्कृतीकरतां विरोध करणारे समाज इतिहासांत सापडतात. आणि ते अल्पसंख्याक असले म्हणून त्यांचे धर्म, मतें अथवा संस्कृति हीन व त्याज्य आहे असें आपणास म्हणतां येत नाही. त्यांच्या विरोधामुळें बहुजनसमाजावर कदाचित् आपत्ति ओढवेल म्हणून त्यांची बाजू चुकीची आहे असें म्हणतां येणार नाही. राज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने देशांत यादवी माजूं नये म्हणून हा विरोध योग्य नसेल, पण नीतितत्त्वाच्या दृष्टीने असें निश्चित म्हणतां येणार नाही. एवढ्याकरतां सध्याच्या राज्यघटनेंत अल्पमतवाल्यांसाठी कांही संरक्षणात्मक निर्बंध व नियम घातलेले असतात. त्यायोगें त्यांच्या स्वतःच्या मतांचें, राहणीचें व संस्कृतीचें संरक्षण होतें.

सध्याच्या काळांत एक दुसऱ्या प्रकारचें मत उत्पन्न झालें आहे. तें साम्यवादी पक्षाचें असून त्याचा राज्याच्या पार्लमेंटी पद्धतीवर व सनदशीर चळवळीवर विश्वास नाही. त्या मताचे लोक तिला श्रीमंत

वर्गाच्या व हाताने काम न करणाऱ्या लोकांच्या मुठींत सत्ता व संपत्ति ठेवणारी कुटिल राज्यपद्धति ठरवून तिचा विरोध व नाश करणें आपलें कर्तव्य व ध्येय समजतात. त्याकरतां ते प्रतिनिधिमार्गाने लोकसभेंत जाऊन व्यर्थ हाकाटी न करतां प्रत्यक्ष व स्वतंत्र मार्गाने जनतेमध्यें सार्वत्रिक संप, बहिष्कार व निरोधन इत्यादि द्वारें राज्यतंत्राचे सर्व व्यवहार व कारभार थांबवून व त्याच्या बळाला विरोध करून राज्यक्रांति घडवून आणूं पाहतात. चालू राज्यपद्धतीला विरोध करणें व ती मोडून टाकणें हा त्यांचा मुख्य बाणाच आहे. तें केल्यावर मग त्या ठिकाणी त्यांच्या कल्पनेप्रमाणें व समजुतीप्रमाणें नवी समाजसत्ता व योग्य समाजघटना निर्माण करणें हा त्यांचा पुढला कार्यक्रम आहे.

ज्या देशांत जुलमी अथवा परकी राज्यसत्ता आहे तेथेंही नैतिक दृष्ट्या जनतेपुढे सत्ताविरोधाचा प्रश्न उभा राहतोच, कारण तो सोडविण्यांत समाजाचें हित, कल्याण व प्रगति आहे. जुलमी राज्यसत्तेला विरोध करणें व तिला काढून टाकून नवी स्थापन करणें हा सर्वमान्य व नैतिक सिद्धांत आहे. तिच्या योगें राज्याचें व लोकांचें खरें संरक्षण व संवर्धन न होतां त्यांचा नाश होतो व वाढ खुंटते.

हा विरोध शांतिमार्गाचा असावा का बलमार्गाचा असावा हा एक नवा नैतिक प्रश्न आहे. सत्ताधीशांनी केलेले आघात व दिलेलीं दुःखें स्वतः शांततेने सहन करून कां सत्ताधाऱ्यांचा बळाने पाडाव करून हा विरोध करावयाचा ह्याचा निर्णय नीतितत्त्ववेत्ते, इतिहासकार व राज्यमंत्री आपापल्या समजुतीप्रमाणें, परंपरेप्रमाणें व परिस्थितीप्रमाणें करतील. परंतु दुसऱ्यांना न मारतां स्वतः आपलें कार्य करीत असतां जितकीं दुःखें, आघात व छळ होतील तितके सहन करून आपला न्याय्य पथ न सोडणें हें केव्हाही उच्च मानवी नीतीचें लक्षण आहे. त्यायोगें कदाचित उद्दिष्ट कार्य लवकर यशस्वी होईल वा न होईल. परंतु त्या मार्गाबद्दल नैतिक दृष्ट्या दोष दाखविणें कठीण आहे. ह्या शांतिमय पण चढाईच्या कार्यक्रमामुळें देशांतील चालू राजकीय व्यवस्था व शांतता बिघडते आणि चालू राज्यतंत्राला व निर्बंधाला धक्का बसतो आणि त्यामुळें लोकांमध्यें बंडखोरीची व राजद्रोहाची प्रवृत्ति पसरते, असा ह्या पद्धतीवर आक्षेप आहे.

कोणत्या राज्यव्यवस्थेविरुद्ध, कोणत्या निर्बंधाविरुद्ध अथवा कोणत्या राज्यकारभाराविरुद्ध आणि कोणत्या प्रसंगीं हा निर्वाणीचा व विरोधाचा खडतर मार्ग पत्करावा याबद्दल मतभेद असूं शकेल. परंतु तो मुळांतच त्याज्य आहे असें ठरविणें सयुक्तिक व न्याय्य नाही. नांवाजलेल्या व पुढारलेल्या देशांत जेव्हा अनियंत्रित व लोकविरोधी राज्यपद्धति नांदत होती तेव्हा मोठमोठीं बंडें व क्रांत्या लोकांनी केल्या. त्याकरतां त्यांनी साम, दान, दंड व भेद या सर्व उपायांचा पण मुख्यतः बळाचा व चातुर्याचा उपयोग केलेला आहे. त्यांचा मार्ग कठोर, रक्तपाताचा व प्रसंगीं अनीतीचा असा होता. तरीपण तो मान्य होऊन त्यांनी घडवून आणलेल्या राज्यक्रांतीला आज महत्त्व व मान आहे. कारण त्यायोगें त्या देशांत लोकसत्तात्मक राज्यपद्धति निर्माण झालेली आहे आणि राजाची व राज्याधिकाऱ्यांची बेबंदशाही नाहीशी झाली आहे. तेव्हा कोणतीही स्वार्थी लोकांना उत्तरदायी नसलेली, जुलमी राज्यव्यवस्था बदलणें अत्यावश्य आहे आणि ती बदलण्याचे तीन मुख्य मार्ग आहेत. एक सामाचा व सनदशीर, दुसरा दंडाचा पण द्रोहाचा आणि तिसरा सत्याग्रहाचा पण शांतीचा. दुसरा व तिसरा हे दोन्ही राज्यक्रांति घडवून आणणारे मार्ग आहेत. जुलमी व स्वार्थी सत्तेला विरोध पाहिजे व ती उलथून पाडली पाहिजे. कोणता मार्ग श्रेयस्कर व यशस्वी आहे हें धुरीणांच्या प्रवृत्तीप्रमाणें आणि देशाच्या परिस्थिति व परंपरेप्रमाणें ठरविलें जाईल.

जेथे लोकसत्तात्मक राज्यव्यवस्था नांदते तेथे सामाचा मार्ग श्रेयस्कर आहे पण जेथे स्वार्थी सत्ता व अनियंत्रित राज्यकारभार आहे तेथे त्या समजुतीच्या मार्गाचा अवलंब करणें वेडेपणाचें व व्यर्थ होईल. क्रांतीचा मार्ग जरी कठोर व द्रोहाचा असला तरी तो देश सुधारण्यास व सामर्थ्यवान करण्यास निर्वाणीचें औषध म्हणून राज्यनीतिशास्त्रकारांनी आवश्यक व न्यायाचा धरला आहे. त्याचा उपयोग प्रत्येक राष्ट्राने आपल्या इतिहासांत केला आहे. मात्र एकदा जुनी जुलमी राज्यव्यवस्था बदलली व नवी लोकसत्तात्मक व्यवस्था चालूं झाली की लोकांनी व्यावहारिक सनदशीर चळवळीचा साममार्ग पत्करला पाहिजे. आपल्या निर्बंधांचें व शासनाचें पालन त्यांनी केलें पाहिजे आणि ते जर बदलावयाची आवश्यकता

असली तर लोकसभेच्या द्वारें व लोकमत वळवून अधिकृत मार्गानें ते बदलले पाहिजेत. लोकांना क्षुल्लक कारणाकरतां निर्बंध व शासन तोडण्यामोडण्याची सवय लागतां कामा नये. तसें झाल्यास राज्यांत कोणतीच व्यवस्था व शांतता टिकणार नाही. परंतु कठिण अवस्थेंत निर्वाणीचे मार्गच पत्करले पाहिजेत. कोणतेही नियम पाळणें हें कांही सात्विक स्वरूपाचें नाही. उलट कांही नियम मोडणें हें कांही तामसिक स्वरूपाचें नाही. नियमाचें महत्त्व ओळखून वर्तन व व्यवहार करावा लागतो. समजुतीचे व विनवणीचे सर्व मार्ग संपल्यावर व थकल्यावर सामर्थ्याचे व विरोधाचे कठिण मार्ग पत्करावे लागतात. चालू शासनाच्या दृष्टीने विरोध हा केव्हाही द्रोहात्मकच आहे. परंतु नीतीच्या व भावी सुखाच्या दृष्टीने तो ग्राह्य आहे. चालू राज्यशासन व निर्बंध हीं कांही नीतीचें व सुखाचें पूर्ण स्वरूप नाही. त्यांचें मोल हें स्थल, काल व कार्य यांना अनुसरून व अनुभवाला धरून बदलतें. त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ प्रतीचें शासन व निर्बंध असतात व असूं शकतात.

येथे आणखी एका प्रश्नाचा विचार केला पाहिजे. तो म्हणजे परराज्याचें महत्त्व व त्याची स्वराज्याशीं तुलना.

परराज्य हें कुराज्य व सुराज्य होऊं शकतें. तें कुराज्य असल्यास नाहीसें करणें सर्व दृष्टीनें न्याय्य व नीतीचें आहे. तें स्ववश व स्वार्थवश असल्यानें राज्याचा खरा उद्देश व कार्य पार पडत नाही. त्याच्यामुळें लोकांचें खरें हित, अधिकार व स्वातंत्र्य टिकत नाहीत. त्यांची सर्वप्रकारें दुःस्थिति होते. त्यांचें संरक्षण न होतां त्यांच्यावर जुलूमजबरदस्ती होते आणि ते आपल्या धर्माला, अर्थाला, कामाला व सुखाला मुकतात.

परराज्य सुराज्य असलें तर तें स्वराज्यापेक्षा चांगलें काय, असा प्रश्न कोणी कोणी उठवितात. परंतु स्वराज्य हें सुराज्य झालें तर स्वराज्य हेंच श्रेयस्कर हें कोणीही सांगेल. तेव्हा प्रश्न राहिला दोन प्रकारांसंबधीचा, एक परराज्य हें सुराज्य असल्यास व दुसरा स्वराज्य हें कुराज्य झाल्यास.

सांप्रत लोकसत्तात्मक राज्यपद्धति पसंत ठरल्यामुळें परराज्य कसेंही असलें तरी तें मान्य धरलें जात नाही. स्वराज्य, मग तें कसेंही असो,

मान्य धरलें जातें. कारण परराज्य हें जरी सुरवातीला अमृतासारखें वाटलें तरी परिणामीं विषासारखें आहे. तें मुख्यतः राज्यकर्त्यांच्या स्वार्थाकरतां चालविलेलें असतें. त्याच्यामुळें देशांतील जनतेला राज्यतंत्रांत व राज्यकारभारांत पूर्ण वाव व स्वातंत्र्य मिळत नाही, आणि त्यांच्या गुणाचा नाश होतो व ते ऱ्हास पावतात. राज्यकर्त्यांच्या कल्पना व हित हें जनतेच्या कल्पना व हित यांच्या विरुद्ध असतें. परराज्य हें बळानें लादलेलें व लोकांना जबाबदार नसतें. त्याच्यामध्यें लोकांच्या स्वातंत्र्याला व सामर्थ्याला प्रोत्साहन व साहाय्य मिळत नाही. त्यामुळें लोकांचें शील व उत्साह बिघडतो आणि देशामध्यें स्वार्थी व देशद्रोही लोकांची वाढ होते. देशामध्यें बेजबाबदार सैनिकांचें, रक्षकांचें, दंडनायकांचें व नोकरशाहीचें प्राबल्य व प्रभुत्व वाढतें आणि नवे आर्थिक व राजकीय स्वार्थी वर्ग उदयास येतात. परदेशी व्यापारी, धंदेवाले, वसाहतवाले व धर्मोपदेशक यांचें खास हित व व्यवसाय देशी व्यवसायांना व आकांक्षांना विरोध करतात. ते सर्व राज्याचा खरा हेतु व खरें कल्याण विसरून सर्व राज्यशक्तीचा उपयोग स्वतःच्या लाभाकरतां व स्थैर्याकरतां करतात आणि तेथील स्वराज्याचे, स्वदेशीचे व सुराज्याचे विरोधी व आक्षेपक बनतात.

परराज्य हें केवळ लोकहिताकरतां पूर्ण रीतीने चालविलेलें कोठेंही दृष्टीस पडत नाही. तेव्हा अशा काल्पनिक परराज्याचा विचार करणें अवास्तव आहे. आणि तो केलाच तर त्याचा उदात्त हेतु परराज्य लवकर काढून घेऊन स्वराज्य पूर्णपणें स्थापणें हाच असला पाहिजे. लोकांना राज्यकारभार स्वतः करूं दिला पाहिजे. तो स्वतः केल्यानेच अनुभव व योग्यता येते. कारभाराची जबाबदारी असली तरच त्याचें ज्ञान व कौशल्य प्राप्त होतें. स्वार्थी व परकीय राज्यकर्त्यांना लोकांना केव्हा स्वराज्य द्यावें हें समजणें शक्य नाही आणि समजलें तरी तें देणें स्वाभाविक नाही. परकीय राज्यकर्ते मालक म्हणून नव्हे पण पालक या नात्याने सुद्धा प्रजेचें योग्य हित व कल्याण पाहूं शकत नाहीत, असें जगाचा इतिहास सांगत आहे. त्यांच्यामध्यें व जनतेमध्यें आपापल्या हिताच्या व मार्गाच्या कल्पना भिन्न असतात.

स्वराज्य हें प्रत्येक ऐतिहासिक व सांस्कृतिक राष्ट्राचा जन्मसिद्ध अधिकार आहे. तो त्याने हरएक उपायाने मिळविला पाहिजे. नाही तर त्याच्या संस्कृतीचा व सुखाचा नाश अथवा ऱ्हास होईल.

सांप्रत साम्राज्याची कल्पना व व्यवस्था त्याज्य समजली जात आहे. जेथे तेथे प्रत्येक राष्ट्राचे लोक आपल्याला स्वतंत्र करूं पहात आहेत आणि साम्राज्याच्या श्रृंखला व बंधनें तोडीत आहेत. परकीय लोकांचा आपल्या राज्यव्यवस्थेंत व कारभारांत हात असू न देणें हें त्यांचें ध्येय व कार्य होऊन बसलें आहे. बळावर उभारलेल्या साम्राज्याला व राज्याला आज राजनीतिशास्त्रांत व उच्च राजकारणांत जागा नाही, कारण त्यामध्यें स्वतंत्र व समान नागरिकत्वाला व नागरिकाला वाव नाही.

कायद्याने प्रस्थापित झालेली सत्ता असें राज्यसत्ताधारी आपणास संबोधितात आणि त्यांच्या विरुद्ध कोणी चळवळ करून त्यांच्याबद्दल द्वेष, तिरस्कार अथवा अप्रीति उत्पन्न केली अथवा करण्याचा प्रयत्न केला तर त्याला राज्यद्रोही ठरवितात. राज्यसत्ता कोणत्याही प्रकारची असो तिच्यामध्यें राज्याचें शासन चालविणारे व कारभार करणारे अधिकारी व प्रतिनिधि यांच्या कृत्यांवर व धोरणावर टीका करणें अन्याय्य नाही. राज्याची घटना बदलण्यासाठी जनतेने चळवळ करणें हें नीति व निर्बंध याविरुद्ध नाही. ती बदलण्याच्या विरुद्ध जे राज्याधिकारी, राज्यप्रतिनिधि व राज्यसेवक आंतून व बाहेरून प्रयत्न करीत असतील त्यांच्या धोरणाबद्दल, कारस्थानाबद्दल व कृत्यांबद्दल निषेध करणें आणि त्यांचीं कृत्यें जगाच्या चव्हाट्यावर आणणें, हें लोकनायकांचें व सामान्य जनतेचें खरें काम व राजकारण आहे. अशा चळवळींना दाबून टाकणारेच राज्यद्रोही व जनताद्रोही समजले पाहिजेत. नाहीतर कोणतीच राजकीय चळवळ व प्रयत्न शक्य व सफल होणार नाही. चालू शासक वर्गाच्या कृत्याला व राज्यघटनेला राज्यसत्तेचे अबाधित अधिपद देऊं पाहणें अन्यायाचें व जुलमाचें होईल.

कोणत्याही शासनव्यवस्थेला धर्म्य (Constitutional) म्हणावयाचें म्हणजे जो शासक वर्ग अथवा अधिकारी वर्ग असेल त्याच्या कृत्यांच्या पद्धती व धोरण यांवर मर्यादा व नियंत्रण घातलेलें असलें पाहिजे.

शासकवर्ग जनतेला अंतिम जबाबदार पाहिजे. तसें नसल्यास ती व्यवस्था धर्म्य व न्याय्य होऊं शकत नाही. तसेंच ती व्यवस्था जर परकीयांना किंवा स्वकीयांपैकी थोड्या लोकांना जबाबदार असली किंवा तिचा उद्देश संकुचित स्वरूपाचा असला तर ती चालू ठेवणें धर्म्य नाही. ती बदलणें हेंच न्याय्य आहे. तिचा उद्देश, धोरण व रचना हीं व्यापक स्वरूपाचीं व बहुजनसंमत पाहिजेत. तरच तिच्याबद्दल आदर राहील व तिचा धर्म्यपणा मानला जाईल आणि राज्याचें काम शांततेने, सलोख्याने व विचारविनिमयाने चालेल. सामान्य जनतेच्या आकांक्षा प्रौढ असल्या व शासक वर्गाचें धोरण स्वार्थी असलें तर राज्यांत असमाधानवृत्ति व विरोधक चळवळ वाढेल. जेव्हा जनतेला वाटूं लागतें की शासनव्यवस्थेचा उद्देश व कार्य हीं अन्यायाचीं व स्वार्थीपणाचीं आहेत तेव्हा तिचा सत्ताधिकाऱ्यांना आवश्यक असलेला पाठिंबा व आधार सुटतो आणि त्यांचें अस्तित्व व कारभार सैनिकसत्तेच्या बळावर चालतो. त्यामुळें त्यांच्या कारभाराचें उघड स्वरूप जाऊन त्याला कारस्थानाचें गुप्त स्वरूप येतें आणि त्यांच्या कार्यपद्धति गौण प्रकारच्या होतात. लोकसत्तेचें अधिष्ठान मान्य केल्यावाचून आणि लोकांची संमति मिळविल्यावाचून अशा शासकवर्गाचा, कारभार व राज्यघटना धर्म्य व न्याय्य राहूं शकत नाही. आणि त्यांनी आपला हट्ट चालविण्याकरतां घातलेले कठोर निर्बंध व आज्ञा न्याय्य पदाला पोहोचतच नाहीत. त्यांच्या विरुद्ध केलेली चळवळ बेकायदेशीर गणतां येत नाही, कारण जनतेला अन्यायाने व असंमतीने चालविलेली शासनव्यवस्था व राज्यकारभार धर्म्य मानतां येत नाही.

शासनव्यवस्थेचा मुख्य उद्देश राज्यकारभार हा लोकांच्या हातून कसा सुलभ व सुखकारक करतां येईल हें पाहण्याचा आहे, त्यापासून त्यांना अलिप्त ठेवण्याचा नव्हे. ह्याकरतां लोकांमध्यें ऐक्याची, सख्याची व सहकाराची भावना पाहिजे आणि सार्वजनिक व राष्ट्रीय हितबुद्धि पाहिजे. त्यांच्यामध्यें आपल्या जातीची, धर्माची अथवा स्थानाची दृष्टि असेल आणि देशहिताबद्दलची पालकबुद्धि व जबाबदार वृत्ति नसेल तर स्वराज्याला अडथळे येतील व ते आपलें कार्य व उद्देश पार पाडणार नाहीत. नागरिकांना अधिकार व स्वातंत्र्य देण्याने त्यांच्यामध्यें जबाबदार वृत्ति उत्पन्न

होते. त्यांना अनुभव मिळतो. त्यामुळें त्यांच्यामध्यें सामर्थ्य व कर्तृत्व वाढतें. तेव्हा त्यांच्या अधिकाराचें व स्वातंत्र्याचें रक्षण करणें हें राज्यतंत्राचें एक विशेष काम आहे. हें काम त्याचें न्यायकारी अंग करूं शकतें.

नागरिकांचे अधिकार व स्वातंत्र्य आणि न्यायालयें, न्यायाधीश व न्यायदानपद्धति यांच्यामध्यें बराच निकट संबंध आहे. न्यायालयाची सुलभता, न्यायाधीशाचें स्वातंत्र्य, न्यायदानपद्धतीचा निःपक्षपातपणा व तत्परता आणि न्यायाचा निर्भीडपणा ह्यांच्यावर नागरिकांचे अधिकार व स्वातंत्र्य बरेंच अवलंबून आहे. नाहीतर जुलमी कारभारी, अरेरावी अधिकारी व गावांतील गुंड व धनिक लोक आपल्या कारस्थानाने, सत्तेने व आक्रमणानें नागरिकांना छळून आपलीं दुष्कृत्यें पचवूं शकतील. त्यांच्या अपराधावर खरें नियंत्रण न्यायालयाचें व त्यांतील योग्य न्यायाचेंच आहे. न्याय देणारी सत्ता ही कार्यकारी सत्तेपासून स्वतंत्र असली पाहिजे. तिचे न्यायाधीश स्वतंत्र प्रामाणिक व बाणेदार असले पाहिजेत. त्यांच्या नेमणुकीवर व काढणुकीवर कार्यकारी सत्तेचा अनिष्ट अधिकार नसला पाहिजे. तरच ते लोकांना योग्य न्याय देऊन त्यांच्या स्वातंत्र्याचें योग्य रक्षण करूं शकतील. न्यायालयाचे व न्यायाधीशाचे अधिकार व न्यायपद्धति ठरविणें हें लोकसभेच्या निर्बंधानेच झालें पाहिजे. तें सर्वांना सामान्यपणें लागू पाहिजे. त्यापासून विशिष्ट शासकवर्गाची अथवा विशिष्ट अपराध्यांची सुटका नसली पाहिजे.कायदे निश्चित स्वरूपाचे व सर्वांना सारखे पाहिजेत. खास न्यायाधीश व खास कोर्टें अधिकाऱ्यांकरतां अथवा विशिष्ट गुन्ह्याकरतां कारभारीमंडळाच्या तंत्राने व तडकाफडकीच्या पद्धतीने चाललीं न पाहिजेत. कारभारी लोकांच्या हातांत न्यायनिवाडा नसला पाहिजे. त्यांनी पोलीसाचीं व न्यायाधीशाचीं कामें करतां कामा नये. न्यायालयें हीं नागरिकांच्या स्वातंत्र्याचा अंतिम आधार आहेत. कोणत्याही दोन व्यक्तींच्या भांडणामध्यें खरा न्याय तीं देऊं शकतात. त्यांची न्यायपद्धति उघड, ठराविक, प्रामाणिक व निःपक्षपाती असते, तेव्हा जनतेला आपल्या अधिकाराची व स्वातंत्र्याची सुरक्षितता वाटते व सामान्य नागरिकांचें जीवन त्रासावाचून व्यतीत होतें.

समाप्त

# कांही संदर्भ ग्रंथ


1. W. H. Hadow : *Citizenship*; 1923. (Clarendon Press).
2. Herbert Fisher : *The Commonweal*; 1924. (Clarendon Press).
3. E. M. White : *The Philosophy of Citizenship*; (George Allen and Unwin) 1921.
4. E. M. White : *The Teaching of Modern Civics.*
5. E. M. White : *The Foundation of Civics*; (Syndicate Publishing Co. London).
6. L. P. Jacks : *Constructive Citizenship*; ( Hodder and Stoughton).
7. Sir Henry Jones : *The Principles of Citizenship* (Macmillan)
8. J. S. Lang : *Citizenship*; (Macmillan).
9. C. C. Tayler and B. F. Brown : *Human Relations*; (Harper and Brothers).
10. J. S. Mackenzie : *Fundamental Problems of Life.*
11. R. M. MacIver : *The Elements of Social Science.*
12. S. V. Puntambekar : *An Introduction to Civics and Politics*; (Indian Press, Allahabad).
13. S. V. Puntambekar : *An Introduction to Indian Citizenship and Civilisation*; *2 Vols.* ( Nandkishore & Brothers, Benares).
14. Benjamin Jowett : *Aristotle's Politics* (Clarendon Press)
15. Stephen Leacock : *Elements of Political Science*; (Constable).
16. H. J. Laski : *A Grammar of Politics.*
17. A. D. Lindsay : *The Essentials of Democracy.*
18. C. Delisle Burns : *Political Ideals.*
19. G. D. H. Cole : *Social Theory*; (New York).
20. F. H. Giddings : *Principles of Sociology*; (New York).
21. महाभारत, शांतिपर्व.
22. मानवधर्मशास्त्र (मनुस्मृति).
23. कौटिलीय अर्थशास्त्र.
24. वात्स्यायनप्रणीत कामशास्त्र.
25. S. Radhakrishnan : *Hindu View of Life.*

# सूची

